# परिहास

[कथासंग्रह]

: लेखक :

शामराव निळकंठ ओक

महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई, ४

# प्रस्तावना

शामराव निळकंठ ओक हे नामांकित विनोदी लेखक आहेत. गेल्या वीस वर्षांत त्यांच्या हास्यकथा, प्रहसनें, नाटिका, प्रथम नियतकालिकांतून प्रसिद्ध होऊन किंवा आकाशवाणीवर क्षेपित होऊन त्यांचे दसकडीहून अधिक संग्रह प्रसिद्ध झाले आहेत. असें असून त्यांनीं ह्या संग्रहाला माझी प्रस्तावना आपुलकीनें मागितली आणि अशा कृतहस्त लेखकाच्या, कृतीस प्रस्तावना लिहिण्याचा मान कां मोडावा अशा बुद्धीनें मी ग्रंथांतील विषयांचा वाचकांस परिचय करून देत आहें.

विनोदात्मक लिहिण्याचा मनोरंजन हा अेक हेतु आहेच. पण दुसरा अेक हेतु व्यंगदर्शन हाहि मुख्यत्वें असतो. अशा प्रबंधांत व्यक्तीच्या किंवा समाजांच्या त्याज्य रूढी, कंटाळवाण्या लकबा, घाणेरड्या संवयी, लुच्चेगिरीनें आणलेली सोंगेंढोंगें, आडमुठे स्वभाव, कजूषपणा, आप्पलपोटेपणा यांसारखे दुर्गुण, यांचा समाचार घेतला जातो म्हणून 'विनोदी लेखकांस कुरूपता तेवढी दिसते' असा पुष्कळांचा गैरसमज झालेला आहे.

विनोदी लेखक कावळ्याप्रमाणें छिद्रान्वेषी असतात म्हणून त्यांस सौंदर्यदृष्टि नसते असें समजणें भोळेपणाचें आहे. उलट विनोदी लेखक, कवी किंवा वक्ते यांची सौंदर्यदृष्टि रसिक समजल्या गेलेल्या त्या त्या वर्गाच्या माणसांच्या दृष्टीपेक्षां अधिक तीक्ष्ण असते. विनोदबुद्धीस कोठेंहि व्यंग असलेलें खपत नाहीं. जें परिपूर्ण नसेल त्याची अपरिपूर्णता तिला बोचते. रसिक गुणग्राहक असतो आणि दोषांकडे डोळेझांक मुद्दामच करितो. तर विनोद-

बुद्धीचा मनुष्य गुणांचा उल्लेख न करितां केवळ अवगुणांचा करतो पण त्याला गुण माहीत असतात. त्यांचा बोभाटा मात्र तो करीत नाहीं. ते पाहिजेतच, त्यांचा उल्लेख कशाला करायचा ?

विनोदी प्रबंध मुख्यतः दोषांवरील भाष्याच्या स्वरूपाचे असतात. त्यांत प्रकट होणारा भाव हास (Humour) हा असतो आणि ह्या हासाचे उपहास आणि परिहास असे दोन भेद असतात. ज्या ठिकाणीं वर्ण्यविषयाची किंवा व्यक्तीची अवहेलना किंवा कुत्सा केली जाते त्या ठिकाणीं प्रकट झालेला भाव हा उपहास होय. उपहास कठोर असल्यामुळें जर एखाद्या व्यक्तीकडे त्याचा रोख असेल तर त्या व्यक्तीस राग येतो किंवा शरम वाटते. उपरोध, व्याजोक्ती, आणि कांहीं रूपकें, कांहीं व्यंगचित्रें, हीं उपहासाची उदाहरणें म्हणून दाखवितां येतील. परिहास हें सहयोगी हास्य आहे. त्याचा प्रहार म्हणजे मित्रानें येऊन दिलेल्या पाठीवरच्या थापेसारखा आनंदजनक असतो. परिहास करणारी व्यक्ती आणि वर्ण्यविषय झालेली व्यक्ती दोन्ही सारख्याच आनंदानें हांसत असतात. शामरावांचा एकंदर कल परिहासापेक्षां उपहासाकडे अधिक आहे. ह्या कथासंग्रहांतील कथांचें वर्गीकरण केल्यास पुढील निर्णय आपल्याला घ्यावे लागतात.

बदली कां झाली, कांटा काढू रुपेरी टोळी, सवामणाचें बखतर' डॉ. माळशिरस, छदामवाडींतील छट, शिंपी वर्गास गंभीर आदेश, सुदैवी दगड आणि तीर्थाच्या घागरी ह्या प्रबंधांस परिहासात्मक म्हणता येईल. पुरंदरच्या पायथ्याशीं प्रवचन, दंग्याचे फायदे, लक्ष्मीधराची शिकवण, यक्षप्रश्न, आणि बंका पिक्चर्स कृत महाभारत ह्या कृती उपहासात्मक म्हणतां येतील. बाकीच्या चार कृती प्रासंगिक आणि संग्रहांत समाविष्ट केल्या नसत्या तर बरें झालें असतें असें वाटण्याजोग्या आहेत.

शामरावांचा मोठा वाङ्मयगुण म्हणजे अनुरूप वातावरणाची निर्मिति हा होय. सिनेमासृष्टींत विशेष संचार झाला असल्यानें त्यांना विविध समाजांची, भाषांची आणि प्रांतांची पक्की ओळख झालेली आहे. अगदीं पहिली कथा बदली कां झाली हींत वाचकाला मुसलमानी अंतरंगांत नेऊन बुडविलें आहे. विनोदाचा एक मोठा आधारस्तंभ म्हणजे चिकट ( बोअर पैशानें नव्हे, तर वर्तनानें आणि बोलण्यानें ) मनुष्य. महेदी मुनवर ही एक गुलाम कादरबट ह्या व्यक्तीला चिकटलेली जळू होती. एकसारखा मुनवर हा गुलामकादरला चिकटून असे आणि एकसारखी त्याची बडबड चालत असे. गुलामकादरच्या लग्नांतदेखील मुनवरनें त्याचा पिच्छा सोडला नाहीं तो इतका कीं वरातीनंतर वधूच्या सांगण्यावरून मुनवरला खेचून बाहेर काढावें लागलें. शेवटीं गुलाम कादर आपली बदली करून घेतो. पण तेथेंहि आपण लवकरच येऊं असें आश्वासन मुनवरमिया गुलामकादरला देतात. संपूर्ण कथेची शैली वाचकाला क्षणभर पाकिस्तानवासी करून टाकिते. कांटा काढू रुपेरी टोळी ही एक गुन्हा-गोष्ट आहे. ह्या गोष्टीच्या मांडणींत देखील गुन्हेगार जगताचें वातावरण लेखकानें कौशल्यानें उत्पन्न केलें आहे. कथेचा शेवट अगदीं अनपेक्षित झाला असल्यानें कथा वाचतांना जश गुदगुल्या होतात तशाच कथा संपल्यावरहि चालू रहातात.

डॉ. माळशिरस यांच्यावरील प्रसंग ही गोष्ट अशीच हास्य-रसानें ओथंबलेली आहे. गेल्या महायुद्धांत दवाखान्यांतले बाटल्या विसळणारे पोरगेदेखील कसे डॉक्टर म्हणून मिरवू लागले होते तें ह्या गोष्टींत वर्णिलें आहे. त्याच्या बरोबरच कोठलीतरी एक साळूबाई शहरांत येऊन शालिनीबाई पपनीस मेट्रन कशी झाली आणि मग त्या दोन पोकळ माणसांत प्रेमसंबंध कसा जडला

आणि डॉक्टरांचा पाणउतारा करणाऱ्या शालिनीबाईचा पराभव कसा झाला तें वाचून बघण्यासारखें आहे. छदामवाडींतील छट गोष्टींत मवाली वातावरणाचें प्रतिबिंब आहे. तसेंच तें महामुंबईत यक्षप्रश्न हींतहि आहे. छदामवाडींतील दादा हद्दपार झाला असतांहि रात्रीचे वेळीं मुंबईत येत असे. हें त्याचें बेंड एका साथीदाराच्या बावळटपणानें कसें फुटतें तें वाचणें गंमतीचें आहे. उपनगरांतील दारूच्या चोरट्या भट्ट्या आणि त्यांचे मख्ख चालक यांचें दर्शन यक्ष प्रश्न ह्या गोष्टीत घडतें. आधुनिक यक्ष प्रश्न आणि त्यांची उत्तरें चटकदार आहेत. उदा. पंचकन्यांचीं नांवें सांगा, हा प्रश्न आणि त्याचें उत्तर ' सुरेय्या, नरगिस, मधुबाला, निम्मी, रेहाना. ज्ञानी कोण ? याचें उत्तर 'ज्याला सर्व चित्रमंदिरें चित्रघरें, निर्माते व नटीचे पत्ते माहीत आहेत तो ज्ञानी जाणावा' उपरोधपूर्ण आहे. हे यक्ष प्रश्न ज्या कथेच्या चौकटींत बसविले आहेत ती चौकट वर्तुळाकार तर प्रश्नोत्तरें चौकोना वाटतात. बंका पिक्चर्सकृत महाभारत ही एक सिनेमा धंद्यावर आणि कनिष्ठ दर्जाच्या चित्रपटांच्या कथानकांवर जळजळीत टीका आहे. तीर्थाच्या घागरी ह्या दारूबंदीविषयक कथेचें मूळ हास्यकारक आणि ऱ्हस्व असूनहि रंगदार पद्धतीनें कथा लांबलचक आणि रसपूर्ण केली आहे.

उपाहासात्मक कथांत पुरंदरच्या पाथ्याशी प्रवचन हें झणझणीत अंजन अलीकडच्या अहिंसावेड्या आचार्यांच्या डोळ्यांत घालण्या-जोगें आहे. ह्या आचार्यांचें ढोंगीपण, त्यांची विपरीत विचार-सरणी आणि त्यांचे रंगढंग यावरील हें रूपक चिरस्मरणीय आहे. हिंदु प्रार्थनांच्या विकृतीचें विडंबन सुरेख साधलें आहे. 'नमो महंमदे वासुदेवाय !' किंवा 'खुदा केशवा, गॉड यहोवा, निधर्मी-यांच्या परमार्था,' ही रचना शामरावांच्या विडंबन शक्तीची

कल्पना आणून देते. दंग्याचे फायदे हा एक संपूर्ण व्याजोक्तिमय निबंध आहे. अलीकडील पोलिस व्यवस्थेवर तें एक मर्मभेदक भाष्य आहे.

ह्या सर्व कथांत शामरावांचा मुख्य गुण त्यांचें कल्पनाशालित्व हा दिसून येतो. जरी त्यांनीं दिलेली नुसतीं नांवें वाचलीं तरी वाचणारा खुश होतो. आचार्य आपल्या सस्थेला संस्थाई म्हणतात, शिवाजीला निंद्य आणि निजामाला वंद्य समजतात. त्यांची शिष्या कन्हावेन असते. सवामणाचें बखत्तरमध्यें चाचेभट उपाध्ये, भाऊ डॉक्टरांचें नांव डॉ. माळशिरस, कवि निश्वास ऊर्फ गोपू सोनटक्के, सोनगांवकर मासिक, बन्याबापू कोशीस्कर, गुंडांचा म्होरक्या दादा मल्लू, आधुनिक युधिष्ठिराचें नांव वाय्. पी, कुरुवंशी, लकी इस्टोन विकणारे प्रो. गोरख मछंदर, महाभारतावरील चित्रपटाचें नांव झगडे का नतिजा वगैरे नांवें विनोदी वातावरण निर्माण करितात. ही नांवें नुसती विविध नसून त्यांत कोणाला ना कोणाला तरी कोपरखळ्या असतात. शामरावांचा भाषाभ्यास मार्मिक असतो. त्यांतल्या त्यांत परभाषी इसम मराठी कसें बोलतात याचा सूक्ष्म अभ्यास त्यांनीं केलेला दिसतो. ह्या भाषाभ्यासाचें उत्कृष्ट उदाहरण सवामणाचे बखत्तरमध्ये आढळतें. "निजामाकडोन वकालत आली. प्राय: निजामाकडील दूत येतात ... अशी यांची कानी येते." (पृ. ४४). शब्दावर कोटया क्वचितच आढळतात. सरकारला लाख पुरविणारा मक्तेदार लाखोपति बनला. (पृ.४१) असे दाखले थोडे आहेत. मराठी जनतेच्या तोंडीं बसलेल्या अश्लील शिव्या फुल्यांनीं दर्शित करण्याचा मोह कथा लेखकांनी आवरता घ्यावा म्हणजे त्या अक्षरांनीं स्पष्ट लिहाव्या असें मात्र नव्हे ! त्या अजीबात वगळाव्या. शामरावांबरोबर सिनेमासृष्टींत, मवाली गुंडांच्या टोळक्यांत, गुप्त दारूभट्ट्यांत, किंवा मोटार

ड्रायव्हर संघांत निःशंकपणें आपण विहार करावा. आपण खात्रीनें बिघडणार नाहीं. सर्व वर्गांत चांगले वाईट गुण असतात त्यांचें निर्लेपपणें अवलोकन करण्यास शामराव आपल्याला शिकवितात. त्यांच्या हातून अशाच हास्यकथा आणखी पुष्कळ वर्षें वाचक वर्गाला लाभोत आणि त्रस्त मनाला उल्हसित करणारें विनोदी वाङ्मय अधिक संपन्न होवो अशी इच्छा प्रकट करून प्रस्तावना पुरी करितों.

३३, नातूबाग पुणे २.
वसंत पंचमी शके १८७६

चिंतामण विनायक जोशी

## : १ :

## बदली कां झाली ?

उडदू भाषेचें प्रतिलखनूरच असें जें हैद्याबाद शहर तेथें हा बनाव घडला. दोन विद्वानांची विद्याविनोदाच्या भरांत मैत्री जमली, ती कांही दिवस गाजली व त्यांतील एका विद्वानाचें लग्न झाल्यावर ती मैत्री थंड झाली, कारण त्या विद्वानाची एकाएकी बदली झाली. महेदी मुनवर आणि गुलाम कादर बट या उडदू भाषेच्या दोन नाणावलेल्या लेखकांबद्दल गोष्ट आहे ही; वास्तविक ही उर्दूतच लिहायला हवी होती, पण विद्वान् तेवढे साऱ्या भाषांतले सारखेच, तेव्हां मराठीतहि अशा गोष्टी ओळखीच्या वाटाव्यात, या भरवशानें हैद्याबादेंतील दोन दोस्तांच्या दरम्यानची ही सुरस आणि मनोरंजक हकीकत येथे देण्याचें योजिले आहे.

हैद्याबादेच्या शायर आणि कलमबाज लोकांत जनाब महेदी मुनवर हे प्रथम एक मामुली दरबारी होते. मसजिद, मद्रेसा आणि मोहल्ला इतक्यापुरती आपली प्रतिष्ठा मर्यादित ठेवून मुनवरमियां तरक्की अंजुमनसारख्या साहित्यसस्थांकडे नुसते दुरून आदरानें पाहात. विद्वत्ता आणि कवित्व या गुणांबद्दल त्यांना विलक्षण हौस; आणि हे गुण स्वतःच्या अंगीं बाणवण्याची यथशक्ति खटपट करतांना, थोर विद्वान् लेखक आणि कवी यांच्या पाळतीवर राहणें,

त्यांचा पिच्छा न सोडणें, सर्वत्र त्यांच्या बरोबर फिरणें, दिसणें आणि काळ घालवणें, हें व्रतहि मुनवरमियां कसाशोनें पाळीत. स्वतःची उन्नति करून घेण्याचा त्यांचा प्रयत्नहि अगदी आंखीव होता. पहिल्यानें त्यांनी 'मुनवरअल्ली असगरअल्ली हकीम' हें आपलें स्वतःचें साधे नांव बदलून 'मुनशी मुनवर' हें आधुनिक व सुटसुटीत नाव घेतलें; त्याच सुमारास मडमांना हिंदुस्तानीच्या शिकवण्या ते करीत असल्यामुळें धंद्याच्या दृष्टीनेंहि या नांवाचा त्यांना चांगला उपयोग होत होता. लौकरच उर्दू शब्दार्थाच्या चोपड्या, फारसी किताबांचे सारांश, आरबी लेखकांचीं चरित्रें, असें बारीकसारीक वाङ्मय मुनशी मुनवर यांच्या लेखणीतून बाहेर पडू लागले. हळुहळू मुनशीसाहेबांच्या लिहिण्यावर इंग्रजी ज्ञानाची छाप पडत असल्याचें सर्वांस कळून येऊ लागलें, त्याबरोबरच जनाब मुनवर यांनी आपली दाढी आस्ते आस्ते खुरपीत सफा करून टाकली, ते मधूनमधून सूट घालूं लागले, काळा चष्मा लावून बोडके हिंडण्याचा रिवाज त्यांनी सुरू केला—आणि एक दिवस गुपचुप मुनशी मजकुरांनी आपल्या मिशाहि उडवून देऊन महेदी मुनवर मुनाव हें धारण केले !

असें नाव बदलण्यांत जनाब मुनवर यांची दृष्टि धूर्त व आंतरराष्ट्रीय होती. मिसर देशांतले मेहदीचें बंड इतिहासांत प्रसिद्धच आहे; त्याखेरीज भागानगरचे नवाब मेहदी यारजंग बहादुर हेहि मशहूर आहेत; या दोन्ही नांवांचा संबंध खुबीनें ध्वनित करण्याचा हेतु मुनवरमियांच्या नवीन नांवांत होता. मोठ्या लोकांबद्दल मियांना मोठी भक्ति! स्वर्गस्थ मुनशी प्रेमचंदांना हुक्का भरून दिल्याची आपली सेवा ते अभिमानानें सांगत; गालीब कवीच्या नातवाला भेटायला ते भर मध्यरात्री स्टेशनवर हार घेऊन गेले होते, बहजाद लखनवीची स्वतःला येणारी पत्रें ते कोणालाहि दाखवायला तयार होते. पैगंबरवासी आगा हश्र काश्मिरी यांची पेन्सिल तर मियांनीं खुद्द आगासाहेबांच्या खिशां-तूनच जशी पळवून आणली ही त्यांची हकीकत नेहमी ऐकण्या-सारखी असे. आजाद, जोश, कृष्णचंद्र, निराला, अशान्त, साघर,

काबिल, नझरूल इस्लाम, शेख गवान, हीं नांवें त्यांच्या बोलण्यांत सर्रास येत असत. जुन्या व सुप्रसिद्ध लेखकांबद्दलच नव्हे तर होतकरू व नव्या लोकांविषयीहि मियां मुनवर याची माहिती आजतागायत होती. कारण ते स्वतःची गणना हळुहळू ज्येष्ठ व वरिष्ठ भाषासेवकांत करूं लागले होते, व साहित्यनभांगणांतल्या सर्वश्रुत ताऱ्यांशीं नुसती तोंडओळख असण्यापेक्षा एखादा नवीनच तारा शोधून काढण्याची आणि त्याची चमक साहित्यनभांत आपल्या एकटयाच्या मध्यस्थीने पाडण्याची मुनवरमियांची अंदरकी तमन्ना होती. आपल्या स्वतःच्या कलमाचा अमर नाही पडला तर न पडो पण एक तरी छुपा रुस्तम आपल्या हातांनी मैदानांत आणावा, थोडक्यांत म्हणजे कुणाला तरी पुढें आणून, कलावन्त नाही तरी निदान कलापारखी म्हणून कीर्ति मिळवावी, अशी सुप्त प्रचोदना महेदी मुनवर यांच्या मनास एकसारखारखी होऊ लागली होती.

आणि त्या सुमारासच त्यांच्या गांवी गुलाम कादर बट आले. हजरते बट अलीगडला असल्यापासूनच विद्वत्ता आणि प्रतिभा या गुणांबद्दल नामांकित झाले होते. दखनी उर्दूच्या खास तालिमीबद्दल त्यांना उस्मानिया युनिव्हर्सिटीनें 'जुबानते उल्तवीव' – का असला कांहींतरी– किताबहि दिला होता. त्यांचे लेख व त्यांची शायरी 'जरदरूल', 'उत्तबस' 'हरमेकरम' 'शमदार' इत्यादी विख्यात उर्दुमासिकांतून छापून येत होती. ते आल्यामुळें हैद्राबादेच्या साहित्य प्रेमी मंडळांत नवा दम आला, विद्वत्तेंत भर पडली आणि मैफलीला रंग येण्याचा मोका दिसू लागला – व मुख्य म्हणजे मुनवरमियांच्या उत्साही उपक्रमांना भरपूर सबब मिळाली! हजरते बट ओबैदुल्ला हायस्कुलचे हेडमास्तर होण्या–साठीं हैद्राबाद स्टेशनावर येऊन दाखल झाल्यापासून त्याना जनाबे मुनवर यांनी जें पकडले तें त्याना जवळजवळ गुंडाळलेच. स्वागत, अगत्य, पाहुणचार, आदाब-अर्जी, तकल्लुफ आणि खिदमत अशा सर्व मार्गांनीं त्यानी बटसाहेबाच्या बटुमूर्तीला इतके घेरून टाकलें की शाळेच्या नोकरीतल्या ५–६ तासांखेरीज इतर वेळ विना–मुनवर असा त्यांना उरलाच नाही, तर [illegible]शी

धरून पुढें आणण्याची मुनवर यांस इतकी निकड लागली कीं, लेक्चर, मुशाइरा, महेफिल, जलसा किंवा नुसती बातें अशा कार्यक्रमांचा अखंड ससेमिरा बिचाऱ्या बटच्या मागे लागला. केवळ साहित्यविपयकच्च नव्हे तर इतर सर्व कार्यक्रमांचे प्रसंगीहि, 'जेथें बट तेथें मुनवर' पाहण्याची सवय हैहयाबादेच्या लोकांना लागली. एका सकाळीं दांत घासायला सुरुवात करतांना जनाबे मुनवर घौसबेगच्या आगेवान् निबंधांचा विषय काढीत, आणि बोलत बोलत थेट रात्री बट घोरूं लागेपर्यंत घोरी जमान्यांतल्या काव्यापर्यंत येऊन ठेपलेले असत. दुसऱ्या दिवशी दुसरें कांहीं; मिळून हजरते बटना त्यांनीं उसंत म्हणून मिळू दिली नाहीं— आणि हा सगळा आग्रह इतका प्रेमानें आणि आपलेपणानें कीं या माणसापासून सोडवणूक करून घेण्याची गोष्ट मनांत आणण्याचा-देखील बटसाहेबाना संकोच वाटायचा !

लौकरच जनाब महेदी मुनवर आणि हजरत गुलाम कादर बट यांची जोडी हैहयाबादेत नर-नारायण, आकण्णा-मादण्णा किंवा लॉरेल व हार्डीसारखी मिरवू लागली, व जनाबे मुनवर यांना गोड गुदगुल्या होऊं लागल्या. 'जशी हुक्क्याला नळी, सुरम्याला सळी व सुराहीला प्याली, तशी बटसाहेबांशी मुनवरमियांची दोस्ती होय' असें हैहयाबादेंतील एक होनहार कवि 'चोंच' ( चिरागाबादी ) यानी जेव्हां लिहिले, तेव्हा ती आपली मश्करी आहे असें न मानतां मुनवरमियांनी त्या शायराला शुक्रियाच आदा केले ! आपली जोडी 'आंग्राद व आसाद' यांच्यासारखी आहे अशी धन्य मानीत असतां मुनवरमियांनी लोक आपल्या जोडीला 'हरून अल्रशीद व जाफर' म्हणतात या बातमीकडे दुर्लक्ष करण्याचें धोरण ठेवले होतें. अबुल फझल व फैझी, हुसेन व हसन, सैयदबंधू, महंमदअली-शौकतअली, यांच्यासारखी आपली जोडी अमर झाली म्हणजे या टवाळ लोकांना आपोआपच समजेल असें मियां मनांत म्हणत होते. बिचाऱ्या बटचे मात्र हाल चालले होते. चुकलों आणि लेखक झालों असें त्याला होऊन गेलें होतें. त्याला एकट्याला स्वस्थपणें बसून विचार करायला वेळच मिळत नव्हता.

बटचा विकास करायचा मुनवरनें असा कांही चंग बांधला होता कीं नको नको म्हणत पळत सुटावें असें बटला वाटू लागलें होतें. नको तें लिहिणें, नको तें वाचन, ती चर्चा, तीं परीक्षणें, संभाषणें, व्याख्यानें आणि सभा, नको तें साहित्य, वाङ्मय आणि ग्रंथमंथन, निवांतपणें माझी जिंदगी मला जगू दे, अशी त्या पाक परवरदिगरजवळ मनांतल्या मनांत काकुळत्या वृत्तीनें प्रार्थना करण्याखेरीज भिडस्त बटला दुसरा मार्गच उरला नाहीं. अल्लाची मर्जी म्हणून मुनवरचा सक्त सहवास सहन करीत रोजचा जीवनक्रम चालवणें बटला प्राप्त होतें. ही मजबूरी निमूटपणें बरदाश्त करीत त्याला हैहयाबादेंत राहवेंच लागत होतें.

पण एक दिवस खुदाला त्याची रहेम आलीसें दिसलें. हजरते बट यांच्या शादीचा मामला उभा राहिला ! आपल्या बोकांडी बसलेला हा मुनवरमियांचा पीर सुटून त्याबदली दुल्हन येणार हें बटसाहेबांना दिसून त्यांना उम्मीद वाटू लागली. वधू अच्छे घरानेकी लडकी व पढी–लिखी होती. बुरखा घेतलेला तिचा फोटो पाहून बटसाहेब संतुष्ट झाले होते व तिचें नांव चश्मिना आहे हें कळल्यावर तर त्यांनी एक सहा ओळीचा गझलच उभ्या उभ्या रचला होता. एकदा शादी नक्की ठरल्यानंतर जोरांत मोहब्बत करायला लागण्याचा साधासीधा स्वभाव बट यांचा होता. त्या खुषींत ते एक गोष्ट मात्र साफ भुलून गेले की प्रेम किंवा प्यार हें जोपर्यंत गुपित असतें, दिलांत छिपून असतें तोपर्यंतच त्याची गोडी. तें चव्हाटयावर आलें की तोच बभ्रा बिचका किंवा बोजवारा. हें विसरल्यामुळे आपलें लग्न होण्याची गोष्ट गुप्त न ठेवतां बट यांनी मुनवर यांजकडे खुल्या दिलानें सर्व कांही सांगितलें–त्यांना कल्पना नव्हती की आपण काय करीत आहोंत–आणि मग मुनवर कसचा कोणाला आवरतो आहे !

मित्राच्या लग्नसमारंभानें मियांना इतका हुरूप आला की त्यांची स्वतःची बिबी पश्मिनादेखील त्यांना खोचून बोलली, "निकले! जैसे खुदही दूल्हा है ! शादी किसीकी और धूमधाम किसीकी !" पण बिबीच्या बोलण्याकडे लक्ष द्यायला मुनवरमियांना अगदीं वेळ

नव्हता. बटसाहेबांचें लग्न हें अगदीं घरचें कार्य मानून मियांची धावपळ चालली होती – अर्थातच कोणत्याहि अंगमेहनतीच्या कामासाठी नव्हे तर चालू गडबडीत आपली शान वाढवून घेण्यासाठीं. कोणत्याहि कामाला हात लावण्यापेक्षा त्या कामावर सल्ला देणें, देखरेख ठेवणें किंवा हुकूम सोडणें असली कामें मुनवरमियांना उत्तम साधत. परीटघडीची शेरवानी आणि तंग तुमान घालून समारंभांत ते गंभीरपणे इकडून तिकडे फिरताना दिसत होते. सुरवातीला वधूपक्षाकडचे लोक मियाना हजरते बट यांचे चचाच समजले, नंतर कांही वेळ हे जावईबुवांचे बडे भाई अशी समजूत कोणाची झाली. एका भिकारणीने तर त्यांनाच दूल्हासलामत समजून मुबारक चितून दुवाही दिली. एकंदर बट–मुनवर दोस्तीचा आज शिखरांक आहे असें जनाबे मुनवर यांस एकसारखें वाटूं लागलें. जीवन – नाटकाच्या एका काव्यमय अंकांत आपण भाग घेत आहोत, आपली आजच्या समारंभांतली भूमिका माहित्येतिहासांत संस्मरणीय ठरण्याचा संभव आहे, असे रोमांचकारी विचार त्यांच्या मनांत नाचू लागले.

पण हाय ! मनोराज्याचा मुलूख कावीज करीत जात असतां जनाबे मुनावर प्रत्यक्ष जिंदगीतली हुकमत मात्र नकळत हरत चालले होते. त्यांचे प्यारे दोस्त हजरते बट ब्याह करीत होते आणि या उत्सवाप्रीत्यर्थ परस्पर कृतार्थ होणारे खुद्द जनाबे मुनवर मात्र दोस्तीच्या दिलदार दुनियेपासून कदम कदम दूर जात होते. असें होण्याचें कारण मुनवरमियाच्या लक्ष्यांत येत नव्हतें पण कुदरतचा अटळ क्रम हेंच तें कारण होतें. जवानीला साथी म्हणून एकदा औरत आल्यानंतर निबळ दोस्तीला मागेच राहावें लागणार. मुनवरमियासारखा अगदी वाली किंवा पुरस्कर्ता दोस्त जरी असला, तरी एकदा बिबीचा हात हातांत आल्यानतर पुन्हा दोस्तीच्या रस्त्याला पाऊल वळविण्याचें बटसारख्या शौकीन नौजवानाला कारण काय ? पण हें मुनवरअल्ली असगरअल्ली हकीम या इसमाच्या मामुली बुद्धीस सुचलें नाही, आणि त्यामुळेंच बटसाहेबांच्या शादीप्रसंगी ऐन रंगांत मुनवरमियांवर अनवस्थाप्रसंग ओढवला.

म्हणजे ते असें झालें कीं मुल्लासाहेबांसमोरचे सर्व विधी आटो-पल्यानंतर काजीचा आशीर्वाद, मुफ्तीचा उपदेश, उलेमाचें मार्ग-दर्शन आणि एका ख्वाजाचें मानपत्र हे सर्व समारंभ पार पडून, मेजवानी, नाचगाना, बंदगी आणि मुजरे उरकल्यावरहि मुनवर-मियांनी बटसाहेबाची साथ सोडली नाहीं. सावलीसारखें ते त्या नवऱ्या मुलाला चिकटलें होते. त्यांच्या गांवींहि नव्हतें कीं आता आपली साथ संपली आहे, आपली लुडबुड पुरे आहे. आता आपण येथून सरकावें, आपल्या दोस्ताला आता कायमके लिए साथ मिळाली आहे, आता त्याची कायदेशीर सावली वेगळीच सुरू झाली आहे, आता आपली जरूर नाही, असा नुसता शकदेखील विचाऱ्याच्या मनाला शिवला नाहीं. आजुबाजूचें वातातरण अस्वस्थ आहे ही जाणीवहि त्यांना होत नव्हती. त्यांचा चालला होता काव्यशास्त्र-विनोद. सरस्वतीचा अखंड उडदू ओघ मियांच्या मुखांतून वाहत होता. शादीचा दिवस सुरू झाल्यावर सकाळीच फिरदौसीच्या शाहनाम्यांतील शाहपूरच्या शादी–दिनावरील दोन ओळी मुनवर यांनी बट यांस ऐकवल्या. नंतर हाफीझ, सादी, उमर खय्याम, यांच्या काव्यांतील प्रणयप्रसंगांची उजळणी झाली. अंग्रेज शायरांनीं शादीवर फारसें लिहिलें नसल्याबद्दल मियांनी बटमजकुरांजवळ तीव्र नापसंती व्यक्त केली. लग्नाचा समारंभ सुरू होईपर्यंत ' तुर्की इतिहासांतील लग्नें ' या विषयावर आपलीं अनुमानें बट यांना मुनवर यांनी सुनावली. लग्नविधीनंतर, आरबी कवीच्या कवितें-तील गालावरचे तीळ मोजण्यास जनाबे मुनवर यांनी नुकतीच सुरुवात केली होती.

हजरत गुलाम कादर बट एका मुग्ध समाधानांत सगळ्या गोष्टी करीत होते. आज त्यांच्या आयुष्याचा थोर उत्सव होता. आज त्यांचें घर सुरू होणार होतें, सखी सहवासाला येणार होती, नई दुनिया फुलणार होती. वेड न पत्करतां केवळ अंगच्या काव्याची आग पेटवून ते मजनू बनायला तयार होते, कारण लैला अगदीं हाताशींच होती. वधूला शिरीन मानून ते फऱ्हादसारखा कालवा खणण्यासदेखील राजी होते, इतकी हुषारी त्यांना वाटत होती.

शाहजादा कामर्लजेमान राजकन्या बदुरेशीं विवाहबद्ध होत आहे अशा ' सपनेमें ' ते सगळे विधी यंत्रासारखे करीत होते – आणि एकीकडे जनाबे मुनवर यांची सारखी टकळी सुरू होती. हजरतांचा स्वभाव मूळचाच सहनशील, भिडस्त आणि मुर्वती ; त्यांतून उद्यापासून मुनवरमियांची ब्याद टळणार आहे या अंधुक आशेनेंहि त्यांच्या धीमेपणाला नेट दिला होता. ते मधूनमधून " जी हाँ " " बिलकुल बिलकुल, " " वाह " वगैरे ठराविक उद्‌गारांनी मियांची दखल घेत होते. दिवस संपून रात्र सुरू झाली होती. कार्यक्रम संपत आले होते.उरली होती फक्त एकच बात! सहेली बाजूला होती, दोघांचेहि फुलांचे पोषक बहरून दरवळत होते, दोघेजण आपल्या महालांत जाण्यास निघाली होतीं. एकेक उपरी माणूस मागे मागे राहूं लागलें होतें. मुनवरमियांनाहि कोणीतरी एकदोनदा बाही थोडी खेचून इशारा दिल्यासारखे करून पाहिलें; ' वस्लकी रात ' कोणी गुणगुणलें, पण मियां कसचे ऐकतात, त्यांचा बकवा चालूच होता.

" रशीद अल् खोरीच तेवढा डाव्या गालावरच्या तिळाचें वर्णन करतो, बाकी इब्न रिहानी, अबदुल अझीझ कुवेती, शेख शुवेब हे सगळे उजव्या गालावरच्या तिळाचा निर्देश करतात ; आता आणखी एक– " " सही बात है " हजरते बट पुटपुटत होते, त्यांचा दिल आवाज देत होता, " बेटा गुलाम कादर, आज तुझ्या जिंदगीचा सहारा ओलांडून शादीच्या हिरवळीवर तू येऊन ठेपलास. दुनियेंतली सारी शायरी आज जान घेऊन तुझ्या आसपास खडी आहे. जी तुझा संसार एक बगीचा करणार ती तुझी प्यारी दूल्हन तुझ्याबरोब मंद पावलांनी रंगमहालाकडे येत आहे. सुभानल्ला तिच्या बुरख्याआडची तिची सूरत आजच्या मौक्याला मिलती जुलती निघो. ओहो, आलाच की महाल–आणि ती फुलांची शेज...पण गुलाम कादर, तुझी नई बिबी अशी मूं फिराकर कां उभी आहे ? शरमिंदी म्हणून कां घुस्सेसे ? बेटा, तिला मनाव, बिचारी बावरली असेल. " हजरते बट यांनी मोठ्या हळुवारपणें आपल्या नववधूकडे पाहून म्हटलें,

" अब शरमानेकी कोई बात नहीं–"

वधूने हलकेच मान उडवली. जनाबे मुनवर म्हणत होते,

" दमिश्क–एश–शाम किंवा सीरियाच्या गालावरचा तीळ या दमास्कस गांवाच्या नांवांत तो तीळ कोणत्या गालावरचा, उजव्या कीं डाव्या हें साफ साफ –"

" और क्या " हजरते बट कबुलीच्या आवाजांत गुणगुणले व लगेच वधूकडे वळून प्रेमानें म्हणाले,

" नव्या दुनियेच्या उंबरठ्यावर आपण उभे आहोंत–पण मेरी जॉ, तू नाराज कां ? प्यारी चश्मिना, मी हा तुझा शौहर तुला विचारीत आहे, बोल–"

" माफ कीजीए " जनाबे मुनवर म्हणत होते, " पण चेहऱ्याला दोन गाल असतात, कोठेंहि पाहा–"

" चश्मिना ! " कळवळून आर्जवानें गुलाम कादर बट विचारीत होते.त्यांचीं बोटें नाजुकपणें त्यांच्या बिबीचा बुरखा उचलींत होतीं.

एकाद्या विजलीसारखी उसळून मुनवरमियांकडे बोट दाखवून चश्मिना तीव्र स्वरांत उद्गारली,

" आपकी शादी इनसे हुई या मुझसे ?"

आणि असें म्हणून तिनें मुसमुसत, पुटपुटत, तरातरा जाऊन बिछान्यावर अंग टाकलें. बटसाहेब जागींच खिळल्यासारखे झाले जेव्हां दारांतून डोकावणाऱ्या कोणी थोरणी तिऱ्हाईतानें मुनवरमियांचा हात धरून त्यांना त्या मदनमहालाच्या बाहेर काढलें तेव्हांच कुठे बटला आपल्या बिबीचा समझोता करण्यास प्रथम अवसर मिळाला.

*　　*　　*

घरांतून हात धरून बाहेर काढल्यानंतरहि दुसऱ्या दिवशीं कांहींच न झाल्याप्रमाणें त्याच घरांत सलगीच्या हक्कानें निगरट्टपणें शिरणारांपैकी मुनवरअल्ली ( बिन असगरअल्ली ) हकीम हे शक्स होते. बट-द्वयांचा संसार सुरू झाल्यानंतरहि मुनवरमिया आपला निढावलेला चेहरा घेऊन रोज सकाळपासून संध्याकाळ–

पर्यंत तेथें हजरच. बिचाऱ्या चश्मिनेस हा त्रास असह्य झाला; तिचा नवरा तिच्या वांटयाला येईनासा झाला, इतकेंच नव्हे तर मुनवरमियांची बिबी पश्मिनाहि आपला पति सदैव त्यांच्याकडे रमतो म्हणून चश्मिनेवर विनाकारण जळू लागली. अखेर मुनवर मियांचा असा जाच असह्य झाल्यावर ( आणि या बाबतींत आपला नवरा जोरदारपणें कांही करील ही आशा नसल्याची खात्री झाल्यावर ) चश्मिना एक दिवस आपला नवा बुरखा घालून मुख्य शिक्षण-अधिकाऱ्याच्या बायकोला जाऊन भेटली व तिच्यापुढे पदर पसरून म्हणाली की, ' बाई, माझा नवरा मला मिळू दे. ' त्यानंतर थोडयाच दिवसांनी हजरते बट यांची बदली बांसबरेलीच्या बाजूला कुठल्याशा कुग्रामात इन्स्पेक्टर म्हणून झाली. जनाबे मुनवर दुःखाने हैराण झाले, त्यांनी बटसाहेबांना झालेल्या निरोपसमारंभांतून इतकी भाषणें केलीं कीं त्यांचा आवाजदेखील बसून गेला. हजरते बट मात्र इतकेसे दिलगीर दिसले नाहीत — आणि बेगम चश्मिना बट तर खुषीतच दिसत होती—ती इतकी चमकदार कधीच दिसली नव्हती. स्टेशनावर पोहोचविण्यास आलेली बेगम पश्मिना मुनवर हिची कळीहि खुललेली दिसत होती— एकदा ही गाडी गेल्यानंतर आपला ओढाळ नवरा आहे व आपण आहोंत या आत्मविश्वासांत पश्मिना चश्मिनेबरोबर अगदी गुलुगुलु गोष्टी सांगत होती. चश्मिनेचा चेहरा बाहरिस्तानच्या गुलाबाप्रमाणें फुलला होता — पण तो कोठपर्यंत — जोपर्यंत मुनवरमियांनी गाडी सुटतांच ' आपणहि शक्य तितक्या लौकर बांसबरेलीस येतो ' हें भात्यासारख्या आवाजांत पुकारले नव्हतें तोंपर्यंत !

✦✦ ✦✦

: २ :

## पुरंदरच्या पायथ्याशीं प्रवचन

' आज जमलेल्या बंधुभगिनींना मला एक विशेष सूचना अशी द्यायची आहे की, आजचें बोलणें अतिगुप्त आहे. आपल्या पक्षांत गुप्तपणें कांहीं विचारविनिमय करणे आजकाल किती कठिण झालें आहे याची साऱ्या कार्यकर्त्यांना कल्पना आहेच. अनुयायांना वरिष्ठ गोटांतून जी खबर मिळत नाहीं ती विरोधी पक्षाला अगोदर मिळते. सदस्यांची गळती तर चालूच आहे, पण खुद्द संस्थेंत राहून श्रेष्ठांचा विरोध करणारे घरभेदे पक्षाच्या प्रत्येक शाखेंत निपजत आहेत--'

वक्त्यानें पाण्याचा एक घोट घेऊन, चष्म्याच्यावरून कठोर व सखेद दृष्टि श्रोत्यांवरून फिरविली. थोडीशी चुळबुळ झाली. कांहीं लोक पूर्वीपेक्षां अधिक मेषमुद्रा करून बसले. प्रवचनाच्या अगोदर ' नमो महंमदे वासुदेवाय ' ही गंभीर प्रार्थना खुद्द वक्त्यानें केली होती. संगमाबाईनीं

अहुर्मज्द परवरदिगार तू बसवेश्वर, जिन सिद्धार्था
खुदा केशवा, गॉड, यहोवा निर्धर्मियांच्या परमार्था

हें भक्तिपर गीत गोड गळ्यानें गाइलें होतें. जमलेल्या लोकांनीं

बुद्ध ख्रिस्त हरी
जय जिनराज बसव वली

असें भजन सुरू करून

नारायण महावीर झर्तुष्ट्र बसवा
गौतम येशू महंमदा

या नवीन नामसंकीर्तनानें उपासनेचा उपसंहार केला होता. प्रवचन श्रवणासाठी लागणारा भक्तिरस असा पुरा सिद्ध झाला होता, तरीहि प्रवचनकार विषय सुरू करण्याला थोडा कचरत आहे असें एखाद्या पाखंडी तिऱ्हाइताला वाटलें असतें. पण तेथें जमलेले सगळे निष्ठावंत होते. ते हात जोडून उघडया तोंडांनीं आणि श्रद्धेच्या डोळ्यांनी प्रवचन ऐकत होते. किंचित् विचार केल्यासारखें करून महनीय प्रवक्त्यानें निरूपण सुरू केलें.

'पक्षाची बळकट पुनर्संघटना करणें हें सध्या संस्थाईपुढें मुख्य कार्य आहे. अशा वेळीं पक्षाच्या तत्त्वांशी निष्ठा नसलेल्यांना दूर होण्याची विनंति करणे, इतकेंच करून भागणार नाही. केवळ संस्थाईच्या सदस्यांच्याच नव्हे, तर आम जनतेच्या दृष्टिकोणांत आमूलाग्र क्रांति घडवून आणणें अवश्य आहे. इतके दिवस देश, राष्ट्र, स्वातंत्र्य इतकीच आपली मर्यादित दृष्टि होती, तोंपर्यंत देशप्रेम, राष्ट्रीय वृत्ति, आणि बंधनाविरुद्ध झगडा हीं तत्त्वें योग्य होती. आतां देश स्वतंत्र झाला आहे. देश आपला आहे. भारत संघराज्य हें आपलें राष्ट्र आहे. बंधनें आनंदानें स्वीकारणें हे आजचें आदर्श तत्त्व आहे. पण त्याबरोबरच आपण आपल्या राष्ट्राच्या संकुचित सीमा पुसून टाकण्यास व इतर राष्ट्रांनाही तसें करण्याची विनंति करण्यास सुरुवात केली आहे. आतां देशसीमेच्या पलीकडे आपली नजर आहे. सर्व देश एकमेकात विलीन होऊन पृथ्वीतलावर एकच राज्य, देश, किंवा राष्ट्र राहावें, हा आपल्या व जगाच्या पुढाऱ्यांचा प्रयत्न आहे. मीं तर त्याही पुढें जाऊन म्हणेन कीं मंगळावर वस्ती असेल, शुक्रावर प्राणी असतील, किंवा चंद्रलोकावर जीवन असेल, तर तेथील रहिवाशांचेही आपण बांधव आहोंत. ही आंतरराष्ट्रीय वा जागतिक दृष्टीच्याही पलीकडची वैश्विक दृष्टि आपण ठेवली पाहिजे. साऱ्या सूर्यमालेंत जर उद्यां दळणवळण सुरू झालें तर 'मी पृथ्वीवरचा' ही कोती भावना सोडावी लागेल तद्वत् पृथ्वीच्या

संयुक्त राज्यांत 'मीं भारतीय' ही देखील संकुचित वृत्ति ठरेल; मग भारताच्या संघराज्यांत 'मीं अमक्या संघाचा', किंवा त्याहूनही 'या भाषिक प्रदेशाचा', अशी विचारसरणी किती क्षुद्रपणाची दिसेल, हें मी सांगावयास पाहिजे काय ?

'बंधूहो, मीं नुकताच नव्या दिल्लीहून आलों. कार्यकारिणी, अखिल भारतीय समिती आणि लोकसभा यांचीं अधिवेशनें पाहिलीं. थोरामोठ्यांशीं माझा संपर्क आला. महान् पुढाऱ्यांनीं माझ्याशीं संभाषण करून मला धन्य केलें. अन्यप्रान्तीय बंधूशीं माझी थोडीबहुत बातचीत झाली. आणि या सर्व अनुभवांनंतर माझ्या मनावर एकाच गोष्टीची अशी छाप पडली कीं, बाकी सर्व कार्यक्रम सोडून आधी याबाबतीत कांहीतरी करायलाच पाहिजे अशी निकडीची जाणीव मला झाली. माझ्यावर छाप पडली ती या गोष्टीची की, महाराष्ट्राबद्दल संस्थाईच्या महामंडळाला बेभरंवसा आहे; महाराष्ट्रानें नेतावर्गाची निराशा केली आहे. महाराष्ट्र मागासलेला आहे, पण आपल्या मागें मात्र नाहीं असें सर्वसत्ताधारी सरकारभाऱ्यांना वाटतें. महाराष्ट्रीयात निष्ठा नाहीं. स्वत.ला विसरून अनुयायित्व करण्याचा समजुतदारपणा नाहीं. वेळेनुसार वर्तन ठेवण्याचें मुत्सद्दी धोरण नाहीं. मिळतें घेण्याची तयारी नाही. स्वभावांत आर्जवीपणा नाही. आदेशपालनांत निमूटपणा नाही. पुढाऱ्यांचें कौतुक करण्याची वृत्ति नाहीं. महत्तम व्यक्तीची भक्ति नाही.

'तुम्हाला वाटेल की दिल्ली राज्यांत साडेतीन महाराष्ट्रीय मंत्री, एक राज्यपाल, तीन सेनापतीच्या हुद्द्याचे अधिकरी आणि महत्त्वाच्या जागांवर असंख्य वरिष्ठ अंमलदार असतांना नेतृत्व-समितीला असें कसें वाटत असेल ? पण आपण लक्षांत ठेवलें पाहिजे कीं हे सर्व मध्यवर्ती संस्थेचे पगारी नोकर आहेत. संस्थाईचें लेकरूं म्हणतां येईल. मुख्य पुरुषाला ज्याची खात्री वाटेल कीं हा माणूस आपला मराठीपणा विसरू शकेल, असे किती आहेत ? मीं महाराष्ट्रीय, महाराष्ट्र माझा देश, मराठी माझी भाषा, अशी प्रांतीय, एक प्रकारें जातीय, किंबहुना धर्मवेडी, भाषाबाज, फुटीर

प्रवृत्ति पूर्णपणें मारून टाकलेले कोण निघतील ?

'टीचभर मराठी मुलुखाच्या अभिमानासाठी हिंदच्या हिताकडे, आशियाच्या श्रेयाकडे, पृथ्वीच्या किंवा मानवजातीच्या भल्याकडे दृष्टि न ठेवतां आपल्या पुढाऱ्यांच्या जगद्विख्यात मार्गदर्शनाकडे पाठ फिरवणे हे धोक्याचें आहे. संकुचित राष्ट्रीयत्वाची भावना गेल्या २।३ पिढ्या ठीक होती. आतां आम्ही कोण ? तर मराठे नाहीं; भारतीय किंवा हिंदुस्थानी नाही; आशियाई नाही. तर पृथ्वीवासी – आणि उद्यां ग्रहांशी व्यवहार सुरू झाला तर आम्ही विश्वनिवासी – अशा विशाल जाणिवेचें हें युग असतांना आम्ही, आमचा महाराष्ट्र, आमची मराठी, असें म्हणणें चुकीचें आहे. कारण, विश्वकारभारांत एका लोकोत्तर नेत्याचे आम्ही अनुचर असतांना दुसऱ्या कोणत्याहि – विशेषत: स्थानिक देशभक्तीसारख्या मागासलेल्या – भावनांना थारा देतां कामा नये. 'हरहर महादेव', 'शिवाजी महाराज की जय', 'शिवाजी आमुचा राजा. भवानी आमुची माता' या घोषणांची मनोभूमिका मध्ययुगीन आहे. पाश्चात्य देशांशी बरोबरीच्या नात्यानें बोलणीं करणाऱ्या आमच्या-सारख्या उन्नत प्रजेला या गोष्टींची आतां गरज नाहीं. हिंदला आझादी मिळेपर्यंत संस्थाईनें देशप्रेमाच्या सर्वसाधारण जागृतीसाठीं शिवाजी आणि तदनुषंगिक प्रतीकांना पन्नास वर्षे मान्यता दिली. ब्रिटिशांनीदेखील मराठ्यांना हिंसक लढाईचे प्रसंगीं वरील नारे पुकारण्याची मुभा दिली. आतां जमाना पालटला आहे. आतां शिवा-जीचें काम संपलें. आतां विघटनेचा कालखंड संपून संघटनेचा चालू झाला आहे. आतां देशांत एकता आणणाऱ्या प्रवृत्तींना पोषक अशी बिरुदें पाहिजेत. एकवेळ भारतांत एकचक्री अधिराज्य करण्याच्या उच्च हेतूने खटपट करणाऱ्या मोगलांपैकी कोणाचा जय पुकारणें वस्तुस्थितीशी सुसंगत ठरेल, पण दिल्लीशी द्रोह करणाऱ्या शिवाजीचा जय बोलता येणार नाही. औरंगजेबाचा जय बोलाल, तर समजण्यासारखें आहे. त्यामुळे तुमची उदार व सत्त्वदर्शी वृत्तीच शाबीत होईल. पण शिवाजीचा जय ? तो आतां नको.

'शिवाजी, त्याचें नांव, त्याची आठवण, त्याचा इतिहास, त्याचें

व्यक्तिमत्व, त्याचें कार्य, या गोष्टी आज प्रजेच्या जाणिवेंत असणें भारताच्या सार्वदेशीय हिताला विघातक आहे. ‘ माझा महाराष्ट्र देश ’, ‘ माझी मराठी भाषा ’ या कोत्या वृत्तीचा उगम आमच्या इतिहासांत आहे आणि केवळ त्या एका शिवाजीमुळें आमचा इतिहास वेगळा होऊन आज अखिल–भारतीय–जनसंप–र्कात आम्ही खड्यासारखे वेगळे पडत आहोंत. शिवाजीनें आमचा इतिहास व्यापून, आमच्या प्रांतावर आणि स्थानिक भाषेवर अनिष्ट पगडा बसवला आहे. इतकें सांगितल्यावर मी जरा पुढें जाऊन म्हणेन कीं, ‘ शिवाजी ’ हा मराठी मनाला जडलेला एक भयानक रोग आहे व तो निष्ठुरपणें महाराष्ट्रमानसांतून काढून टाकल्याखेरीज भारतांत महाराष्ट्राला मिसळून जातां येणार नाहीं. मीं जाणतों की माझें हे म्हणणें आपल्याला अप्रिय, अवास्तव, अतिशयोक्त वाटेल; भावड्या वृत्तीला तें पाखंड वाटेल; माथेफिरूंनी तें ऐकलें तर माझ्यावर बलिदान होण्याचा प्रसंग येईल; सामान्य प्रजेलादेखील माझी उपपत्ति दुष्ट वाटेल. कारण, ‘ शिवाजी ’ या कल्पनेनें महाराष्ट्राला भलतेंच ग्रासून टाकलेलें आहे.

‘ भाई हो, संस्थाईच्या महाराष्ट्रातील कार्यकर्त्यांची ही जी गुप्त सभा हिचें हे ठिकाण, पुरंदर किल्ल्याच्या दक्षिणेची ही काळदरी, आणि इथल्या वाडीपासून दूर असलेलें डोंगरावरचें बहिरोबाचें हें पडीत देऊळ हे स्थळ मी मुद्दामच आजच्या मध्यरात्रीच्या सभेसाठी निवडले आहे, कारण मला व्यक्तिमहात्म्या-बरोबरच स्थलमाहात्म्याचेंही थोतांड थांबवायचे आहे. आपल्या पश्चिमेकडे रोहिडखोरे, हिरडसमावळ, तोरणा – रायगड, आणि रायरेश्वराचा डोंगर आहे. तिथल्या देवळांतच शिवाजीनें आपल्या पहिल्या सवगड्याकडून आणाशपथा घेववल्या होत्या. त्या विभागाला स्वराज्याचा पाळणा म्हणतात. आज इथल्या या डोंगरावर या देवळांत आपण त्याच शिवाजीच्या कल्पनेचा निरास करण्याच्या मोहिमेची मुहूर्तमेढ रोवणार आहोंत. ’

श्रोत्यांकडून अपेक्षेप्रमाणें प्रतिसहकार मिळत नाही हे निरूप-

काच्या लक्षांत येत होतें. थोडी चुळबूळ होत होती व लक्ष इकडे तिकडे जात होतें. बाहेरून चमत्कारिक गार वारा येत होता व देवळाच्या चंद्रमोळी छपरांतून आकाशांत धावणारे काळेभोर ढग दिसत होते. दूर पश्चिमेकडे डोंगरदऱ्यांत मेघगर्जना घुमत होती. प्रवचनकारापुढची विझलेली पणती एका सेविकेनें पुन्हा लावली व संगमाबाईनी दिलेलें जाडेभरडें उत्तरीय लपेटून, आसन पुन्हां स्थिर करून चष्म्यावरून सभोंवार पाहात प्रवक्त्यानें विषयसूत्र पुन्हां उचललें.

'महाराष्ट्राच्या मनांतून शिवाजीला पुसून टाकण्याखेरीज संघराज्यांत मराठ्यांना गति नाही ही माझी पुरी खात्री झाल्या-मुळेंच मी प्रजेचा मोहनिरास करण्याची योजना आज येथें आपणापुढें ठेवीत आहें. प्रथम कार्यकर्त्यांचा मोहनिरास, मग रयतेचा, या धोरणानें मी आज शिवाजीच्या बाबतीत आपले डोळे उघडण्यासाठी, कान झटकून टाकण्यासाठी आणि मनें साफ करण्यासाठी, शिवाजीला पद्धतशीरपणें बरखास्त करून दाखवणार आहे व आपल्याला पटवून देणार आहे कीं, शिवाजीपूजकवृत्ति राष्ट्रद्रोही आहे. शिवाजीवर आपण प्रेम करता कामा नये. अतःपर शिवाजीचा उदोउदो बंद करून त्याचें नांवहि आठवणीत न येईल अशी व्यवस्था करणे जरूर आहे.

' तसें पाहिलें तर जागतिक दृष्ट्या शिवाजी कोण एवढा मोठा होता ? विजापुर दरबारच्या शहाजी नामक सरदाराचा उच्छृंखल मुलगा. किती लहानपणी त्यानें हिंसेला सुरुवात केली ! विजापूर दरबारशीं पुण्डगिरी आणि भोंवतालच्या बांधवांना उपद्रव करून किल्ले मिळवले. त्यांतल्यात्यात बरे काय केलें, तर आदिलशाही, कुतुबशाही वगैरेंच्या विलिनीकरणांत दिल्लीश्वराला मदत केली. पण स्वतःचें वेगळे राज्य ठेवण्याचा हट्ट किती ! शाइस्तेखानाचीं बोटें तोडणें, अफझलखानाची व चंद्रराव मोऱ्यांची हत्या इत्यादि क्रूर कृत्ये करणाऱ्या या अत्याचारी मनुष्याला मोगलांच्या एक-छत्री साम्राज्यांत सामील होण्याची सुबुद्धि कांहीं झाली नाहीं ! या शिवाजी राजानें जर स्वतःला राज्याभिषेक करवून स्वतंत्र

राज्य स्थापण्याचा अविचार केला नसता, तर दिल्ली साम्राज्याला जो प्रतिकार शेवटपर्यंत करून मराठ्यांनीं हिंदुस्थानावर मोठा अपकार केला, तो मुळांतच थांबला असतां. पचहजारी सरदारी पत्करली असती तर आज दक्षिणेंतला राजप्रमुख निजामाऐवजीं शिवाजीच्या घराण्यांतला मनुष्य दिसता. ( अर्थात् निजामहि वंदनीय आहेच. पण आपली एक राजकीय शक्यता सांगितली. ) औरंजेबाचें हिंद–एकीकरणाचें विशाल धोरण विफल करण्यास मराठे कारण झाले, ते मूळच्या त्या शिवाजीच्या विघाडामुळें. जर अप्रतिकाराचें शांततामय धोरण त्याला सुचलें असतें, तर मोंग–लांचा एकसंधी राज्याचा वारसा इंग्रजांना व क्रमशः आपल्या राज्यकर्त्यांना मिळाला असता व त्यामुळें राज्यकारभाराची उत्तम सोय झाली असती. शिवाजीच्या फुटीर धोरणामुळें त्यानें मध्यवर्ति सत्ता खिळखिळी करून तेव्हां देशाच्या सुरक्षिततेस बाध आणलाच व आजहि देश विस्कळित करणाऱ्या ज्या प्रवृत्ति फोफावत आहेत त्यांची मूळ जबाबदारी शिवाजीपर्यंत पोहोंचते.

'शेजारच्या प्रांतांबद्दलही शिवाजीचें धोरण आक्रमक वृत्तीचें. सुरत, हुबळी, कारजा अशा बाजारपेठा लुटून त्यानें महागुर्जर, महाकर्नाटक आणि महाविदर्भ या प्रांतांच्या बांधवांना उपद्रव दिला. गोब्राह्मणप्रतिपालनाचा प्रतिगामी कार्यक्रम पुढें ठेवण्यापेक्षां त्यानें व्यापारी व अल्पसंख्यांक यांना सांभाळण्याचें श्रेयस्कर ध्येय कां ठेवलें नाहीं ? शस्त्रसंभारावर इतका भर देण्यापेक्षां नैतिक हत्यारें उजळण्याचें त्याला कां सुचलें नाहीं ? त्यानें साधनांची शुचिता सांभाळली काय ? त्यानें स्त्रियांना राज्यकारभारांत स्थान दिलें काय ? त्यानें अस्पृश्यतानिवारणासाठीं काय केलें ? विद्येच्या प्रसाराचा काय प्रयत्न केला ? खेडीं सुधारण्याकरितां रचनात्मक कार्यक्रम त्याला कधीं आठवला होता ? अशोकाचें नांव तरी त्यानें ऐकलें असेल तर वानवा, मग अकबरासारखा एकादा सर्वसंग्राहक नवा धर्म काढणें दूरच राहिलें.

'तुम्हीं म्हणाल, ते दिवस वेगळे होते. पण कुठलेही दिवस असले तरी निदान अखिल भारतीय दृष्टि ठेवायला खऱ्या थोर

पुरुषांना कधीच अडचण पडली नाहीं. अशी अखिल भारतीय दृष्टि आल्याखेरीज आंतरराष्ट्रीय दृष्टीच्या वरच्या इयत्तेंत जाण्यास मनुष्य पात्र होत नाहीं. आणि आंतरराष्ट्रीय दृष्टीच्याहि पलीकडची वैश्विक दृष्टि तर त्याच्या कल्पनेंतही येणें शक्य नाहीं.

'किमान देशव्यापी दृष्टि ऐतिहासिक सम्राटांना होती; मोगलांना होती, इंग्रजांना होती; व आतां आतां आपल्या प्रिय पुढाऱ्यांना आहे. ती शिवाजीला नव्हती. आणि त्या आम्हीं शिवाजीच्या आहारी गेलों म्हणून त्याच्या मागून तीनशें वर्षांनीसुद्धां आम्हीं त्याच्यासारखेच मंददृष्टीचे राहिलों. 'दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो' ही उत्तरभारतीय पंडितांची भाविक वृत्ति आमच्या अंगीं आम्हीं तेव्हांपासून बाणवली असती, तर हिंदच्या अधिराज्याचे एकनिष्ठ पाईक म्हणून इतर प्रांतीयांप्रमाणें आमचीही आज बूज राहिली असती. कुशल केरळीय, तरबेज तामीळ, कामसू कन्नडिग, आनंदी आंध्र, गोजिरे गुर्जर, राबणारे राजस्तानी, विद्वान वंग, पटाईत पंजाबी आणि कर्तबगार काश्मिरी यांच्या बरोबरीनें मनमिळाऊ महाराष्ट्रीय म्हणून मानानें व आपुलकीनें आपण आम हिंदच्या मजलशीत बसू शकलो असतों. पण आज आम्ही विसंवादी सूर काढणारे अडेल मरहट्टे, देशाच्या, भाषेच्या आणि इतिहासाच्या फाजील अभिनिवेशानें दिल्लीच्या आणि सर्व पुरोगामी प्रजेच्या नामर्जीस पात्र झालों आहोंत—याला कारण तो शिवाजी !

'हें शिवाजीचें स्तोम माजविण्याचें खूळ, मला सांगायला दुःख होतें, ज्यांना महाराष्ट्राच्या व हिंदच्या आधुनिक वैचारिक जागृतीचा उगम मानतात त्या न्यायमूर्ति रानडयांनीं प्रथम सुरू केलें. इतक्या समतोल मनाच्या विद्वानानें त्यावेळीं औरंगजेबाची बाजू घेतली असती तर शिवाजीचा पुनरुद्धार होण्याचें टळून मराठ्याची आपोआप अखिल भारतीय दृष्टि राहिली असती व आजच्या आमच्या पुढाऱ्यांचा मार्ग सोपा झाला असता. पुन्हां शिवाजीचा पुरस्कार करणारे दुसरे गृहस्थ लोकमान्य टिळक. त्यांना मी सर्वांत जास्त दोष देतों. त्यांनी या कल्पनेचा फैलाव इतक्या जोरांत केला कीं, इंग्रजांनीं ब्राह्मणेतर पक्षाला हातीं

धरून त्या जहाल देशभक्ताकडून शिवाजीला हिसकावून घेतला नसता तर त्या दैवताची भक्ति भारतभर पसरण्याचा धोका होता. सुदैवानें इंग्रजांनीं शिवाजीला मान्यता दिल्यामुळें त्याचें माहात्म्य थोडें कमी झालें व मराठी मनावरचें पटल थोडें विरळ झालें. लवकरच महात्मा गांधीचें युग आलें. प्रांतांच्या सीमा पुसून जाऊं लागल्या. आतां पंडितजीची कारकीर्द असतांना त्या सीमांचा मागमूसही राहातां कामा नये आणि जर आपल्याला आपल्या जगन्मान्य पुढाऱ्याचा हात बळकट करावयाचा असेल, तर 'एक मुलुख, एक राज्य, एक भाषा, एक विचार, हिंद उर्फ भारत' हें ध्येय ठेवून, भारतांत स्वत्व विसरून संपूर्णपणें विलीन होण्याची मनोभूमिका महाराष्ट्रांत तयार केली पाहिजे; व त्यासाठीच आपल्या कार्यक्रमांतलें पहिलें काम शिवाजीचें संपूर्ण निराकरण. (कन्हाबेन, तो पेला जरा माझ्या जवळ ठेवा.)

'शिवाजीविरुद्ध करण्याचा प्रचार आपल्याला फार खुबीनें करावा लागेल. परवां दिल्लीत काकासाहेबांच्या बासष्टीच्या दिवशीच त्यांच्या नव्या अपत्याचें बारसें होतें. त्यावेळेला त्यांना ही कल्पना सांगितली असता ते म्हणाले, 'ही मार खाण्याची लक्षणें आहेत.' त्यांचा आशय असा की, दृढमूल झालेल्या भोळ्या भ्रामक भावना कितीही वेडसर असल्या तरी त्यांना धक्का लावणे म्हणजे अडाणी जनतेचा रोष ओढवून घेणे होय. तरी आपल्याला फार दूरान्वयानें, बेताबेतानें, वळणावळणानें, सभाळून काम केलें पाहिजे. उदाहरणार्थ, 'शिवाजीचा धिक्कार असो' वगैरे घोषणा आपल्या स्वतःच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें धोक्याच्या आहेत. आपण अभ्यासमंडळांतून वगैरे 'शिवाजी खरोखरच नांव घेण्यासारखा होता काय?' अशा चर्चा सुरू कराव्या (व अर्थातच प्रश्नाचें उत्तर नास्तिपक्षी नावीन करावें) त्याचप्रमाणे 'कम्युनिस्टांनीही शिवाजीला जवळ केला आहे', 'गुजराथेंत व पाकिस्तानांत शिवाजी–उत्सव सुरू झाले आहेत.' अशी कुजबूज चालू करावी. म्हणजे शिवाजीबद्दल अंधभक्तांच्या मनात विकल्प येऊं लागतील व त्यांची चुकीची श्रद्धा दुरुस्त होईल. तसेंच, शिवाजीचे विरोधी

लोक जे बाजी घोरपडे, चंद्रराव मोरे, अफझुलखान ईत्यादि यांचा जोरदार पुरस्कार आपण आरंभला पाहिजे. औरंजेबाजाचा तर मीं आधीं म्हटल्याप्रमाणें फारच पद्धतशीर पाठपुरावा करून, शिवाजी-च्या कल्पनेला अलमगिराची प्रबल प्रतिस्पर्धी कल्पना उभी केली पाहिजे. रायगडाइतकें औरंगाबादनजीकच्या रोझा या खेडयाला तीर्थस्वरूप आलें पाहिजे. (जवळच्या पेल्यांतला एक घोंट घेऊन)

'तर मंडळी, बोला! आपल्या नव्या मोहिमेचा नारा–'महात्मा औरंगजेबकी जय ! अलमगीर झिंदाबाद ! हरहर सुलेमान !'

महनीय प्रवक्त्यानें अपेक्षापूर्वक श्रोत्यांकडे पाहिलें. पण श्रोत्यांची प्रतिक्रिया कांही वेगळीच दिसू लागली. समोरच्या कार्य कर्त्यांच्या मेपमुद्रा पालटून गेल्या होत्या. कित्येक तर लांडग्यां–सारखे उग्र वाटू लागले होते. हे लोक इंग्रजाच्या संगिनीपुढें निजणारे सौम्य सत्याग्रही दिसत नव्हते, तर भटांची घरें जाळ-ण्यास निघालेल्या निश्चयी गांधीभक्तांसारखा त्यांचा नूर होता. त्या भक्तांचें समर्थन करणाऱ्या समाजवादी पुढाऱ्यांसारखे अजी-जीचें चेहरे करून संगमाबाई व कन्हाबेन प्रवचनकराला ' चला, निघा ' असा आग्रहाचा इशारा करीत होत्या. लोकांत कुजबूज सुरू झाली होती. तीन चळवळींत दिसले नव्हते असे हिंस्र भाव त्यांच्या चेहऱ्यावर आले होते.

बाहेर शिवापुराच्या बाजूचें वादळ आतां काळदरीला येऊन पोहोंचलें याची साक्ष पटत होती. पावसाचा मार देवळाच्या अपुऱ्या पत्र्यावर जोरानें पडत होता. आकाश काजळासारखे झालें होतें. विजा चमकत होत्या. कानठळ्या बसण्यारखें कडकडाट होत होते.

समोरचे लोक आपल्यावर चाल करून येत आहेत हें पाहून वक्ता उभा राहिला,

' तत्त्वासाठी मी आत्मसमर्पणाला–'

तेवढ्यांत दोघी सेविकांनी त्याला मागें ओढलें. तो व्यासपीठा-वर धडपडला व पणतीच्या ज्योतीनें त्याची दाढी होरपळली. तितक्यांत समोरून कुणी ओरडला, ' मंडळी, बाहेर पडा !

देवळावर वीज पडेल–'

रोख वदलून सगळे बाहेर धावले––

देवळावर वीज पडली तेव्हां सर्व मंडळी बाहेर पडली होती. गडबडींत सर्वांच्यापुढें वक्ता पळाला होता–एका कांटेरी झुडुपानें त्याची छाटी ओढून धरली ती तशीच टाकून तो पळतच राहिला–मंडळींना अस्पष्टपणें दुरून आणखी आरोळ्या ऐकूं आल्या.

'जय श्री दिल्लीपतीकी !' 'मोगले आझम झिंदाबाद !' पण काळोखांत व पावसांत तो दिसेनासा झाला होता. अजूनही शिरवळच्या मोटरतळावर अशा घोषणा करीत सदरहु प्रवचनकार फिरतांना दिसतो, असे सरकारी वाहतुकीच्या वाहनांचे प्रवासी सांगतात.

✦✦ ✦✦

## कोल्हा आणि द्राक्षें

एकदा एक कोल्हा द्राक्षांच्या मळ्याजवळून जात असता, द्राक्षाचा एक भरघोस घड पाहून त्याच्या तोंडास पाणी सुटलें. त्याने अनेक उड्या मारून तो घड तोडण्याचा यत्न केला, पण व्यर्थ. अखेर त्याने विचार केला, की द्राक्षें आंबट नाहीत, मिळाली तर गोडच आहेत. मग त्याने जाऊन जाहिरात दिली 'गोड द्राक्षें मिळविणारी कंपनी–शेअर्ससाठी अर्ज करा. थोडे उरले आहेत!' अर्जदारांतून एक बोकड व एक करकोचा असे दोघे निवडून कोल्ह्याने बोकडास द्राक्षाच्या घडाखालीं बसविले, त्याच्या शिंगावर करकोच्याला चढविलें व घडाचा देठ तोडण्यास त्याला सांगितले. देठ तुटताच पडणारा घड कोल्ह्याने झेलला व 'ही माझ्या व्यवस्थापनाची बिदागी किंवा मॅनेजिंग एजन्सी कमिशन' असें म्हणून त्याने रस्ता सुधारला.

तात्पर्य:–एकट्याला दुर्लभ असलेली गोष्ट निर्बुद्धाच्या नकळत मदतीने सुलभ होते.

: ३ :

## काटा काटूं रुपेरी टोळी

परवां आमच्या नाक्यावर दिवसाढवळ्या एक खून झाला. रविवारी सकाळी मी इराण्याच्या हॉटेलांत रस्त्याकडे पाठ करून बसलों असतां समोरच्या आरशांत मला दिसलं की, बाजूच्या रस्त्याला उभ्या असलेल्या मोटारजवळ एका माणसावर तिघांनी येऊन एकदम सुरीहल्ला केला आणि तिघे तीन दिशांना पळून गेले. यावेळी पलीकडच्या फूटपाथवर नुसता बसलेला एक पाटीवाला झटकन् पाटी तोंडावर घेऊन भिंतीकडे वळून झोपी गेला. थोडा आरडाओरडा झाला, थोडी पळापळ झाली, तेथें वावरणारे लोक नाहींसे झाले, पोलिसांच्या शिट्या वाजल्या, पोलीस आले, जीप आली, अॅम्ब्युलन्स येऊन मुडदा घेऊन गेली. थोडासा तपास करून पोलीसही गेले व नंतर खून झालेल्या ठिकाणी लोकांच्या झुंडीच्या झुंडी जमा होऊन चर्चा करूं लागल्या. या वेळेपर्यंत नाक्यावरचा नेहमीचा पोलीस पलीकडच्या बिल्डिंगमध्यें संडासला गेला होता, तो परत आला व आपल्या गैरहजेरींत उडालेल्या गडबडीची हकीकत ऐकून त्याला मोठी गंमत वाटली.

दरम्यान पलीकडच्या फूटपाथवरचा पाटीवाला रस्त्याकडे पाठ करून आरामांत तसाच झोपलेला होता. त्याला जवळून पाहण्याची

मला इच्छा झाली. शिवाय मला एक पाटीवालाहि हवाच होता. मी जाऊन त्याला उठविलें व मजबरोबर माझ्या दुकानांत घेऊन गेलों. ' जवाहर पीठ गिरण ' आणि 'वल्लभ बूट हाऊस'च्या मधलें दुकान माझें. त्याच्यावर 'धी सुभाष टीचिंग वर्क्स, श्री सुभाष शिक्षण कार्यालय' अशी पाटी आहे. तेथील शिकवण्याचा कारखाना किंवा घाऊक व झटपट विद्यादानाचें केंद्र चालविण्याची खटपट मी आतां सोडून देण्याच्या तयारीत होतों. मी त्या संस्थेचा सोल प्रोप्रायटर किंवा प्रिन्सिपॉल, आचार्य हणमंत नानाजी पावगे, पंजाब एम्. ए. प्रभाकरपासून मद्रास 'हिंदी रामेश्वर'पर्यंत सर्व परिक्षांची तरतूद, नापासांना पुन्हां फी माफ, प्रत्येक विद्यार्थ्याकडे जातीनें लक्ष, विद्यार्थिनींना खास सवलती, पुस्तकांची गरज नाही, वगैरे वगैरे सर्व सोयी करूनदेखील माझ्या पटावरच्या अठ्ठ्याऐंशीं विद्यार्थ्यांपैकीं आठाचे वर विद्यार्थी फी देणारे निघेनात. उलट कांहीं भयंकर कुरूप विद्यार्थिनी फुकट शिकण्याच्या सबबीवर तेथें बसून कोंवळ्या सुकुमार विद्यार्थ्यांना भिववून दूर मात्र ठेवूं लागल्या. तेव्हां शिक्षण संस्था बंद करून घासलेटची एजन्सी घेण्याचा माझा विचार होता. माझ्या क्लासचीं बाकें, डेस्कें, फळे, नकाशे व पुस्तकें विकुन रॉकेल विकण्यासाठी लागणारी साधन-सामग्री खरेदी करण्याचा माझा बेत होता.

दुकानांत आल्यावर पाटीवाल्याला चहापाणी वगैरे देऊन मी सांगितलें कीं, 'इथलें हें सामान जरीपुराणावाल्याला विकायचें आहे, पण तें काम मागाहून. अगोदर पाटीवालेदादा, हें सांगा कीं, डोळ्यांसमोर खून होत असतां तुम्ही पाठ का फिरविलीत ?' त्यावर क्षणभरच माझ्याकडे तीक्ष्ण नजरेनें पाहून तो पाटीवाला किंचित् हंसला व म्हणाला, 'अन् मास्तर, तुम्ही ? तुम्ही ज्या कारणासाठी पाठ फिरविलीत, ज्या कारणाकरितां लोक तेथून नाहींसें झाले, त्यासाठींच मीही पाठ फिरविली. कुठल्या भानगडींत सांपडायला नको, साक्षीपुराव्यांत गुंतायला नको. सुरेवाल्यांच्या भांडणांत आपण मधें नको म्हणून. आज ज्याचा खून झाला, तो पोरी पळविणाऱ्या टोळीचा दादा होता. त्याचे मारेकरी खोटीं नाणीं

पाडणाऱ्यांच्या टोळीचे, तेही चार महिन्यांत सुरे खाऊनच मरतील. पुन्हा त्यांना मारणारे त्याच मरणानें मरतील! सुरेबाज एकमेकांची कत्तल करीत राहतील, पोलीस मुडदे उचलून नेतील, त्यांत आपला मुडदा कशाला ? आपण वाटेंतून बाजूला व्हायचें, मिळेल तें काम करायचें, कुणाच्या लफड्यांत सांपडायचें नाही–'

मी पाटीवाल्याला विचारले, 'काम न मिळेल त्यांनी काय करायचें ? कायमचीच रस्त्याकडे पाठ करून झोंपायचें ? आतां हाच पहा माझा लिहिणेंवाचणें शिकविण्याचा धंदा, सपाट झाला आहे. कारण, लिहिणारेवाचणारे फार झाले. त्याची आतां जरूर नाहीं कोणाला. आतां मलाही खांद्यावरचें मास्तरीचें उपरणें कमरेला बांधून एकाद्या टोळीत काम बघायला पाहिजे !' मी कडवटपणे हसून म्हणालों. त्यावर पाटीवाल्यानें अगदीं सहज म्हटलें, 'तुमच्यासारख्या पांढरपेशांची देखील एक टोळी आहे, मास्तर ! तुम्हाला खरोखरच गोडी असेल तर त्या लोकांची ओळख करून देईन मी तुम्हाला. तयारी असली तर आज रात्रीं पावणेबाराला इथें तयार रहा, मी तुम्हाला तिकडे घेऊन जाईन. रामराम.' असें म्हणून पाटीवाला चटकन् उठून चालू लागला.

रात्री पावणेबाराला 'रायक्लब अथवा सोनेरी टोळी' या पुस्तकाची उजळणी करीत असतां मला डुलकी लागली होती. दुकानापुढे एक टॅक्सी उभी राहून तिचा हॉर्न दोनदां वाजला. मी बाहेर डोकावलों, तों टॅक्सीड्रायव्हरच्या शेजारून पाटीवाल्यानें हांक मारली, 'मास्तर, चला !' चटकन् दुकान बंद करून मी टॅक्सीत मागच्या बाजूला जाऊन बसलों. पलीकडच्या कोंपऱ्यांत एक व्यापारी पेहरावाचा मनुष्य झोंपी गेला होता. टॅक्सी थेट माटुंग्याकडच्या एका कॉलेजच्या मागे आवारांत जाऊन थांबली. मला घेऊन पाटीवाला जिना चढू लागला व टॅक्सीवाला आणखी एका माणसाच्या मदतीनें माझ्या टॅक्सीतल्या शेजाऱ्याला उतरवून आस्ते आस्ते आमच्यामागून आणतांना दिसला. दोन जिने चढून आम्ही एका दिवे असलेल्या दालनाकडे गेलों. दारावर एका माणसानें माझ्याकडे बारकाईनें पाहून आम्हाला

आंत सोडलें. गॅलरींतही दोनतीन लोक सावधपणें चारी बाजूंवर लक्ष ठेवीत होते.

आंत दहाबारा मंडळी होती. तो एक रिकाम्या वर्गाचा हॉल होता. बहुतेक लोक विद्यार्थ्यांप्रमाणें आपापली टिपणे पहात होते. क्वचित् हलकेंच एकमेकांशीं बोलत होते. माझा पाटीवाला त्या लोकांशी जाऊन कांही कुजबुजून आला. दोघांतिघांनी माझ्याकडे पाहिलें. नतर पाटीवाला परत आला व आम्ही दोघें वर्गाच्या जरा मागच्या बांकावर बसलों. थोड्याच वेळांत एक गंभीर मनुष्य एक वही घेऊन प्रोफेसराच्या जागेवर जाऊन बसला. त्यानें दरवाजावरच्या माणसाला खूण केली. दारें बंद झाली. पहारेकरी बाहेर उभा राहिला व एकाद्या अभ्यास मंडळाचा वर्ग सुरू होण्याची तयारी दिसूं लागली. सभापति झालेल्या मनुष्यानें टेबलावर हलकेंच दोन ठोके मारले व तो म्हणाला, ' सर्व सभासद हजर आहेत. आज नायक रूपा यानें सभेची सूत्रें माझ्याकडे सोंपविली आहेत, म्हणून मी उपनायक अण्णा कामकाजास सुरुवात करतों. कुणाची हरकत? नाही. चिटणिस बापू, कार्यक्रमपत्रिका वाच.'

वयस्क विद्यार्थ्यासारख्या दिसणाऱ्या एका माणसानें उठून वाचलें. ' सर्वत्र अगाऊ पोहोंचविलेल्या तोंडी निरोपानुसार आज, रविवार, तारीख एकोणीस, जुलै एकोणीसशेंत्रेपन्न, या दिवशीं अनौपचारिक रीतीनें दरबार कॉलेजच्या सायन्सच्या वर्गात टोळीची अकरावी मासिक सभा भरत आहे. येथे टोळीच्या नांवाबद्दल मला असें सुचवायचें आहे कीं समाज कटक निर्दालन संघ, लोकपीडा-शासकदल किंवा दुर्जन शिक्षा मंडल अशा भव्य व बोजड नांवाचा विचारही मनात न आणतां, शहरांतल्या इतर टोळीवाल्यांनीं आपल्याला शिफारसवजा दिलेलें सुटसुटीत नाव ' कांटा काढू रुपेरी टोळी ' आपण धारण करावें—' त्यावेळीं पाटीवाल्यानें उठून म्हटलें, ' एक उपसूचना कीं ' काकारुप्याची टोळी ' मात्र कोणीही म्हणायचें नाहीं, त्यामुळें एका माणसावर फार लक्ष जातें. ' उप-सूचना व मूळ सूचना सभासदांनी पेन्सिली वाजवून पसार केल्या. सभासदांत साधारणपणें लोकलच्या थर्ड क्लासमध्यें सकाळीं दहा

अकराच्या सुमाराला दिसणाऱ्या लोकांसारखे बहुतेक होते. टॅक्सी-वालाही त्यांत होता व एक दूधवालाही. बापू पुढें म्हणाला,

'आज अमीचंद नेमीचंद प्रकरण पुरें करणें, हें सभेपुढील मुख्य काम आहे. या प्रकरणाची प्रगति पायरी पायरीनें होत गेली आहे. सभासदांचा त्यांत जसजसा संबंध येत गेला, तसतसें त्यांनीं उठून आपापल्या हकीगती सांगव्यात.' बापू खाली बसला. अध्यक्ष अण्णांनी वहीकडे पहात 'दाजी' हें नांव घेतलें व जाड चष्मा लावणाऱ्या एका गृहस्थानें उठून वाचण्यास सुरुवात केली.

'एक मार्च रोजी व नंतर दोनतीन दिवस सर्व मुख्य वृत्तपत्रांत मुलगा हरवल्याची एक जाहिरात व ती देणारा अमीचंद नेमीचंद हें नांव आपल्या डोक्यांत घोळत राहिलें. मगनलाल नामक पंधरा-सोळा वर्षांचा मुलगा २७ फेब्रुवारीपासून बेपत्ता आहे त्याचा पत्ता देणाऱ्यास इनाम वगैरे मजकूर इंग्रजी 'डेली डायल' व 'इंडियन बनियन' या पत्रांत, गुजराती 'जयखबर' व 'बेपारवार्ता' या छाप्यांत व मराठीच्या 'मान्यचौकट' व 'कूटसत्ता' या दैनिकांत लागोपाठ दोनतीन दिवस छापून आला. नंतर आठवडाभर अमीचंद नेमीचंद कोण, याची चौकशी केली. शेठजी एक बडा सट्टेवाला आहे. शेअर, सोनाचांदी, लोखंड, सिमेंट, कपडा, कपास, अळशी, एरंडी, रेस, डेली फिगर अशल्या सर्व बाजारांत तो उलाढाली करतो. त्याचें दलाल स्ट्रीटला ऑफिस, काळबादेवीला पेढी नि लालबागला एक जुगारी अड्डा आहे. मरीन ड्राईव्हला बिल्डिंग, भुलेश्वरला हवेली, अंधेरीला वाडी. नांवावर एकंदर आठ टेलिफोन नंबर व खाजगी लायनी दोन. घरी बेकायदा रेडिओ ट्रान्स्मिटर ठेवण्याबद्दल, हजार रुपयांच्या नोटांचा व्यापार केल्याबद्दल, परदेशी लोकांशी बेकायदा व्यापार करण्याबद्दल, असे अनेक वहीम पोलिसांना त्याच्याबद्दल आहेत, पण पुरावा हाती लागत नाहीं. घरी तीन मोटारी, एक बायको तिची मुलगी व लहान मुलगा आहे. ठेवलेली कलावंतीण पेडर रोडला आहे. बेपत्ता मुलगा मगन हा शेठजीच्या परलोक-वासी पहिल्या बायकोचा. त्याचा एक वर्षापूर्वी पांच लाखाचा विमा उतरला आहे. इन्कमटॅक्सकडून शेठजीकडे अकरा लाखाची मागणी

आहे. ही माहिती मी मार्चच्या सभेंत प्रथम दिली.'

अण्णांच्या आदेशाप्रमाणें दाजी खालीं बसल्यानंतर तात्या उठून सांगू लागला कीं, दाजीनें आणलेली बातमी मिळाल्या-नंतर आपण अमीचंद नेमीचंद यांच्या हालचालीवर लक्ष ठेवलें व ते रोज पोलीस 'मोर्ग' किंवा मुडदेखाना येथे जाऊन तेथील प्रेतें पाहतात हें मला कळलें. शेठजीच्या आसपासच्या लोकांकडून, नातेवाइकांकडून, शाळासोबत्यांकडून व नोकरचाकरांकडून मगनची मिळेल तितकी माहिती काढली. त्याचा एक फोटोदेखील मिळाला. तो थोडासा वावळट व भित्रा आहे. त्याच्या तोंडावर कांहीं देवीचे वण आहेत. उजव्या हातावर मगन म्हणून गोंदलेलें आहे. डाव्या डोळ्यात फूल आहे व त्याला 'र' म्हणतां येत नाहीं इतका तपशील मिळाला. तो हरवला त्या दिवशीं लॅमिंग्टन रोडच्या कैसरटॉकीजमध्यें 'धक्के धून' नांवाची जोरदार उर्दू फिल्म पाहण्यास गेला होता. त्याच्या अंगांत लाल बुशकोट व पांढरी पॅन्ट होती. तो इंटरव्हलमध्ये बाहेर आला, तो पुन्हां आंतच गेला नाही.

पांच मार्च रोजी शेठजींनीं मुडदेखान्यांतलें एक प्रेत आपल्या मुलाचें म्हणून ओळखलें. त्या प्रेताच्या नवराचे जे कपडे होते, तेहि लाल बुशकोट पांढरी पॅट—मगनलालचेंच निघाले. शेठजींनी व त्यांनी बोलाविलेल्या डॉक्टर के. सी. मेहता नांवाच्या फॅमिली डॉक्टरनें तें प्रेत मगनचेंच म्हणून ओळखलें, ताब्यांत घेतलें व त्याचें क्रियाकर्म केलें. परंतु मोर्गमधल्या लोकाकडे पुन्हां पुन्हां गप्पा मारून मला दोन गोष्टी कळल्या कीं, प्रेताचे कपडे सांभाळणारा कारकून रजेवर आहे व गैरहजेरीत कांही कारणासाठी सस्पेंड झाला आहे. त्याच्याकडे शेठ अमीचंद नेमीचंद नेहमी येऊन बोलत. एकदां तर तो त्यांच्या मोटारींतूनहि बसून गेला होता. दुसरी गोष्ट, प्रेतपालक किंवा मुडदेवाला यानें अशी सांगितली कीं, मगनच्या म्हणून ओळखलेल्या प्रेताच्या तोंडावर देवीचे वण नव्हते, डोळ्यांत फूलही नव्हतें व हातावर कांहीं गोंदलेलेंही नव्हतें.

इतकें सांगून तात्या खाली बसला व 'भाऊ' म्हणून अण्णांनी म्हणतांच टॅक्सीड्रायव्हर उठून सांगूं लागला कीं, शेठ अमीचंद नेमीचंदचे ड्रायव्हर व इतर नोकर यांची दोस्ती करून आपल्याला शेठजीच्या गेल्या ४।५ महिन्यांतल्या बऱ्याच हालचाली कळल्या. गोंदिया स्टीमर लाईन आणि कोस्टल एअरवेजच्या ऑफिसांत शेठजी तासन् तास जात असत. मार्च एक तारखेस शेठजीचें दोन ड्रायव्हर रजेवर होते व तातपुरते बदली दोन गाड्यांवर होते. एक गाडी कैसर टॉकीजपाशीं व एक संध्याकाळीं जूहू–पारल्याच्या रस्त्याला दिसली होती.

भाऊनतर नानाचें नांव आलें, त्यानें उठून सांगितलें कीं, अमीचंद नेमीचंदचा टेलिफोन–ऑपरेटर, मद्रासी टाइपिस्ट शेठजींच्या सॉलिसिटरकडचा एक कारकून, अशा व इतर लोकांशीं गप्पा मारून आपल्या अशी माहिती मिळाली की, नॉर्थ ॲण्ड साउथ इन्शुरन्स कंपनीकडे शेठजींचा पांच लाखांचा क्लेम दाखल झाला आहे. पण अजून रक्कम देण्यांत आली नाही. डॉ. के. सी. मेहता यांचा रजिस्टरमध्ये पत्ता मांगरूळ म्हणून आहे. पण तेथें चौकशी करतां तो कित्येक महिने तेथें नाही, असें समजलें. कोस्टल एअरवेजच्या खबायत नांवाच्या विमानांत मार्च एक रोजीं दोन पोरबंदरच्या सीटस् रिझर्व होत्या.

नानाच्या पाठोपाठ भैय्यानें सांगितलें की, गोंदिया स्टीमर लाईनच्या कचेरीत वशिला लावून अशी खबर मिळाली कीं, मार्च सतराला मोंबासाला पोहोचलेल्या 'भारवाहा' या कंपनीच्या बोटीवर केबिनची दोन तिकिटे एम्. ए. नाणावटी व के. सी. माधवजी या नांवावर राखीव होती व उतारू तीन मार्च रोजी पोरबंदरला बोटीवर यायचे होते. हे कळतांच मी नायरोबीला माझ्या मित्राला तांतडीनें कळविलें की, भारवाहा बोटीनें मोंबा-साला सतरा जून रोजी पोहोंचलेल्या के. सी. माधवजी व एम् ए. नाणावटी यांची वर्णनें, फोटो व साधल्यास छोटी फिल्म काढून पाठविणें. मागच्याच आठवड्यांत त्याच्याकडून तें सर्व कांहीं आलें व तीं वर्णनें व फोटो मगन व डॉक्टर मेहता यांचेच आहेत, हें

आपण तपासून पाहिलें.

अण्णा चष्म्यावरून सर्वांकडे पहात म्हणाले, 'केस जवळ जवळ पूर्ण तयार झाली आहे. आरोपीबद्दल आजचा रिपोर्ट काय आहे ?' त्यावर टॅक्सीड्रायव्हरनें उठून रिपोर्ट दिला कीं, शेठ अमीचंद नेमीचदची मोटार वर्तमानरोडला अंधाऱ्या कोपऱ्याजवळ गांठून आपण आपली टॅक्सी तिला आडवी घातली. बाजूच्या पाटीवाल्यासह दोघें त्यांच्या मोटारजवळ गेलों. त्यांना व त्यांच्या ड्रायव्हरला रामराम करून दोघांच्या तोंडावर एकदम अमोनियाचे फवारे मारले. ड्रायव्हरला तेथेंच राहूं देऊन शेठजींना आपल्या टॅक्सीत घातलें. पाटीवाल्यानें त्यांना सहा ग्रेन मॉर्फियाचें इंजेक्शन दिलें व येथें आणून आता पलीकडच्या खोलीत पहाऱ्यांत ठेवलेलें आहे.

अण्णा म्हणाले, 'नॉर्थ ॲण्ड साउथ इन्शुरन्स कंपनीची चौकशी चालू झाली आहे, त्या अगोदर आपल्याला हें प्रकरण निकालांत काढलें पाहिजे. आरोपीला हजर करावें.'

पाटीवाला व टॅक्सीड्रायव्हर यांनी बाहेर जाऊन एका झोंपेंतून उठल्यासारख्या दिसणाऱ्या माणसाला आणलें. टॅक्सीत माझ्यापलीकडे झोंपी गेलेला तो हाच, हें मी ओळखलें. प्रथम तो कांहीं कुरकूर करू लागला, तेव्हां टॅक्सीवाल्यानें जवळच्या बॅटरीमधून त्याला थोडा धक्का देतांच शेठिया ओरडून गप्प बसला. त्याला मधें बसवून दोघे त्याच्या दोन बाजूला बसले. अण्णा एकाद्या न्यायाधिशाच्या गंभीरपणें त्याला उद्देशून म्हणाले,

'शेठ अमीचंद नेमीचंद, आज एका बिनसरकारी पंचायतीपुढें तुम्हीं आरोपी आहांत. तुमच्यावर आरोप ठेवणारे, तुमचा इनसाफ करणारे आणि सजा देणारे आम्हींच आहोंत ! तुम्हीं सरकारी पोलिसांना भारी झालांत, पण आज आम्ही तुम्हाला भारी आहोंत. तुमचा गुन्हा असा आहे कीं, गेल्या मार्च महिन्यांत स्वतःच्या मुलाला गुप्तपणें पळवून तुम्ही दूर पाठवून दिलेंत आणि पोलिसांना सांपडणाऱ्या प्रेतांतलें एक आपल्या मुलाचें म्हणून ओळखून विमा कंपनीकडे मेलेल्या मुलासाठीं क्लेम लावतात.'

'झूट ! तद्दन झूट ! एकदम खोटा सांगते तुमी ! ए बनवा–

बनवी–गलापडू मामला हाय ! धमकी दावून पैसा काढाच्या काम करते ? मग पोलीसमंदी कपलेंट कां देत नाहीं ? तर आमी देते–पोलीस, पोलीस ! '

अण्णा कठोरपणे हंसले. ' ओरडून कांहीं उपयोग नाहीं !' ते म्हणाले, ' येथें आम्ही नाटकांच्या तालमी घेतों, हें आजूबाजूंच्या लोकांना माहीत आहे. शेठजी, पोलिसांची भीति आमच्यापेक्षां तुम्हाला जास्त आहे. विमा कंपनीला पांच लाखाला फसविण्याचा तुम्हीं कट केला आहे. '

' कोण सांगते ? पुरावा काय ? ' शेठजी गुरगुरला.

'दाखवितों पुरावा ! ' अण्णा म्हणाला. ' भैया, रील दाखीव. '

भैय्यानें एक सोळा मिलीमिटर फिल्मचा प्रोजेक्टर टेबलावर ठेवला, विजेला जोडला व दिवे मालवून वर्गामागच्या भिंतीवर सिनेमाचें चित्र सुरू केलें.

एक अनोळकी मूलखांतले शहर, रस्त्यावर काळे लोक, साहेबी पोषाखांत काळे, गोरे व हिंदुस्थानी लोक वावरत होते. एक काळा चष्मा लावलेला मुलगा व त्याच्याबरोबर एक किडकिडीत मनुष्य यांनी मधेच थबकून कॅमेऱ्याकडे पाहिले. कॅमेरा त्यांच्याजवळ गेला. मुलाने चष्मा काढला; पण तितक्यांत दुसऱ्या माणसानें त्याचें तोंड फिरविले व सशयी मुद्रेनें कॅमेऱ्याकडे पहात तो दूर गेला.

फिल्म बंद झाली. दिवे आले व भैय्यानें २।३ फोटो शेठजींना पाहायला दिले. शेठजी फिके पडले होते. अण्णानें विचारलें,

' काय शेटजी, ओळख पटली ? नसली तर सांगतों. ऐका, हे दोघे मोंबासा मुक्कामचे पाहुणे, के. सी. माधवजी व एम्. ए. नाणावटी किंवा आपल्या देशांतले डॉ. के. सी. मेहता आणि मगनलाल अमीचंद नेमीचंद. एक तुमचे फॅमिली डॉक्टर आणि दुसरे ज्येष्ठ चिरंजीव–जे हयात असून त्यांच्या मरणाची ग्वाही देऊन तुम्ही नॉर्थ अ‍ॅण्ड साऊथ कंपनीकडून इन्शुअरन्समध्यें पांच लाख मागत आहांत –'

' बस् ! बस् ! अरे, कबूल केला ! मग काय मांगते ते सांग भई ! कटकट ना कर ! ' शेठजी वैतागून म्हणाले.

अण्णा हंसून म्हणाले, ' आम्ही विमा कंपनीला माहिती दिली, तर कंपनी नुकसान टळल्याबद्दल तुमच्या क्लेमचा दशांश म्हणजे पन्नास हजार रुपये आम्हाला खुशीनें देईल व तुम्ही सक्तमजुरीला जाल. आतां जर तुम्ही आम्हाला एक लाख रुपये देऊन कंपनीला मुलगा जिवंत सांपडल्याचें कळविलें व पोलिसांना गैरसमजूत झाल्याचें पटवून मुलगा पळून गेला होता असा कांहीतरी खुलासा केलांत, तर तुमचं जेल टळेल. मग काय म्हणतां ?'

' एक लाख रुपिया ? अरे, आमचीवर अग्यार लाखच्या तर इन्कम टेक्षच्या डिमांड हाय. चार दिवसांनीं बझार सेटलमेंटला आम्हाला साडात्रण लाख भरायच्या. आम्ही आणेल कुठून एक लाख रुपिया ?' अमीनचंद कांगाव्यानें म्हणाला.

अण्णा उत्तरले,पांच वर्षे खडी फोडायला जायचें असेल तर आमची हरकत नाही ! पण खरोखर शेठजी, तुम्हाला एक लाख कांही फार नाहींत. तुमची धनदौलत किती आहे याची आम्हाला पुरेपूर माहिती आहे. सर्वनाश टाळण्यासासाठी तुम्हीं एक लाख सहज देऊं शकाल. इन्कम्टॅक्सदेखील तुम्हाला फार झीज देणार नाही. आणि सेटलमेंटचे अडीच लाख नुसते इकडचे तिकडे करतां येतील. सारे देऊन तुमची कितीतरी इस्टेट शिल्लक राहील. तुमची घेलाबादची प्रॉपर्टी, घीपूरची जायदाद, अंधेरीची वाडी, भुलेश्वरची हवेली, मरीन ड्राइव्हवरची बिल्डिंग, तीन बॅंकांत मिळून सुमारे साडेचार लाखांच्या ठेवी, त्याखेरीज बनिया सेफ डिपॉझिटमधले सोन्या–चांदीचे पाटले, न्यात मंदिराच्या ट्रस्टीकडे ठेवावयाला दिलेल्या मोहरा–'

'बस् ! पुरे ! खामोश! अरे भाईशाब, आमाला काय नागा करून दावते ? कुणी दिला आ समदा खबर तुम्हा लोकला ? मारा बाप ! साला नोकर जेटला बद्दा हरामी –'

' जाऊं द्या शेटजी. तुमच्या निरपराधी नोकरांना कशाला बदनाम करतां ! शा. अमीचंद नेमीचंद, हरामचा पैसा कोणी

सांगावा लागत नाहीं, तो ओरडून बोलतो. लढाईपासून तुम्हीं तांदूळ, साखर, राकेल, काडयाच्या पेटया अशा जिनसांचे सांठे अडवून भरमसाठ भाव खाल्लेत, तेव्हांपासून तुमची कमाई लोकांच्या नजरेंत आहे. तुमच्यासारख्या लुटारूंच्या संपत्तीचा बिनचूक हिशेब लोकांजवळ आहे. तुमच्या साऱ्या हालचालींवर जनतेचें लक्ष आहे. तुमचे उद्योग, उलाढाली, कारभार, फार काय खाजगी विचारदेखील तुमच्यावर राखण ठेवणाऱ्या प्रजेला माहीत आहेत. जाऊं द्या, तुम्ही आपले आतां मंदिर ट्रस्टीला इथून टेलिफोन करून एक लाखाचा नगद ऐवज म्हणून दोन हजार मोहरा येथें आणून द्यायला सांगा कसे ! म्हणजे पहांटे तुम्हाला तुमच्या घरी नेऊन सुखरूप सोडतां येईल.'

' पण दोन हजार मोहरा ? गिनीचा भाव साडेसत्त्यावन आहे ! काय पंधरा टक्का खोट देते ? '

पाटीवाला माझ्याजवळून उठून म्हणाला,

' दोन हजार मोहरा, गिन्या, सावरीन–नाहींतर उद्यां विमा कंपनीला वर्दी ! ' इतरांनींही या शर्तीला पाठिंबा दिला व जिकीरीनें शेठजी कबूल होऊन टेलिफोनकडे जाण्यास तयार झाला.

* * *

मोहरा दाखल झाल्यानंतर शेठजींना घराजवळ सोडून टॅक्सींतून माझ्या पाटीवाल्यानें मला दुकानाशी आणून सोडलें. मी विचारलें, ' खरेंच पाटीवालेदादा, तुमचें नांव काय ? तें विचारायचें राहिलेंच या गडबडींत ! '

टॅक्सी चालू झाली. पाटीवाला बिनआबाजी हंसून म्हणाला, ' माझें नांव रूपा.' टॅक्सी भुर्रकन निघून गेली.

✦✦ ✦✦

: ४ :

## सवा मणाचे बखतर

चाचेभट उपाध्ये यांच्या रोजनिशींतील यादी

कागद जुन्नरी सुडाचा, उभी आठघडी, शिऱ्याच्या शाईनें वाळबोधींत लिहिलेला मजकूर. तपकीर गल्लीतील नागवेकर सावकाराच्या घरांतून निघालेल्या रद्दींतले बरेचसे जुने कागद रा. राजाभाऊ कुडचीकरांच्या तंबाकू गुदामांत वर्षानुवर्ष पडून होते. गेल्या लढाईत रद्दीला भाव आला असतां रा. गोविंदराव कासीद यांच्या किराणा दुकानानें हे कागदपत्र मिळवले. नंतर आमचेकडे साप्ताहिक शिध्याच्या पुड्या अस्सल ऐतिहासिक कागदपत्रांतून गुडाळून येत असलेल्या पाहून सदर्हू कासीद यांचेकडे चौकशी केली. तेव्हां कागदांचा वरील पूर्वेतिहास कळला व सुसंगत असा एकूण खालील तेवढाच मजकूर हाती लागला ( सबब संशोधकांनी अधिक विचारपूस करूं नये )

'चाचेभट उपाध्ये दस्तुर खुद्द' ही सही प्रत्येक पानावर आलेली, मारवाड्याच्या वहीसारखी दिसणारी, बाळबोध अक्षरांत

लिहिलेली ही रोजनिशी शके १७३४–३५ च्या कालखण्डांतील एक अपूर्व इतिहासलेख ठरेल. 'आद्य रोजनिशीकार आमचा साम्युएल पेपिस होता,' अशी प्रौढी आतां इंग्रजांनीं मारावयास नको, कारण या नवीन प्रत्यक्ष पुराव्यानें सिद्ध होणार आहे कीं, आमच्या महाराष्ट्रांतहि वे. शा. सं. भैरवशास्त्री भिवंडीकर उर्फ चाचेभट उपाध्ये या रावबाजीच्या मर्जीतील वैदिक गृहस्थ ब्राह्मणानें दीडशें वर्षांपूर्वी केवळ स्वतःच्या करमणुकीसाठीं रोजनिशी लिहिण्याचा क्रम ठेवला होता. प्रस्तुतचे कागद हाती पडून ते वाचून पाहतांच आम्हीं धावत कासीद यांच्या किराणा दुकानी बाकीच्या कागदांसाठी गेलो; पण दुर्दैवाची गोष्ट अशी की आमच्या अगोदरच एका फुटकळ तंबाकू विकणाऱ्या दुकानाच्या मालकाची नजर कासीद यांचेकडील त्या जुन्या कागदांकडे गेली होती व त्यानें दुप्पट भावानें ते कागद खरेदी करून तिथल्या तिथे प्रत्येकाचे चार तुकडे करून तंबाखूच्या पुड्या बांधायला नेले होते देखील. अर्ध्याच तासानें आम्ही येथें पोहोचलो; असो. ईश्वरेच्छा बलीयसी म्हणून कृतकृत्य होणे प्राप्त आहे.

चाचेभट अुपाध्ये याच्याबद्दल शक्य तितकी माहिती काढण्याचा प्रयत्न आम्ही केला, पण ते व्यास ब्राह्मण, कपिगोत्री, अथर्ववेदी, रावबाजीच्या खास कृपेतले ( 'गारपिरावर राजश्री चाचे भटजी यांचे नाटकशाळेसाठी माडी बांधणेस दोन गठे जागा' अशी नोंद देणगी खाती आढळते ), संगीत नृत्यकाव्यनाटयादि कलांचे चाहते व पुरस्कर्ते होते, यापलीकडे अधिक माहिती मिळाली नाहीं. भैरवशास्त्री भिवंडीकरांचा चाचेभट अुपाध्ये कसा झाला हें कदाचित वरील त्रोटक तपशिलावरूनहि लक्षांत येण्यासारखें आहे, तथापि 'चाचे' या टोपण नांवाबद्दल मात्र कांहीं अनुमाने करतां येतात.

(अ) भिवंडी या आपल्या गांवी भटजीच्या घराण्याकडे कुलाबकर आंग्रे यांची अुपाध्येगिरी असावी. ( ब ) ब्राह्मण अितरांकडून जशी दक्षिणा घेतात तशी ब्राह्मणांकडून वसूल करणारे ब्राह्मणांचे ब्राह्मण या अर्थी; किंवा ( क ) आपल्या पोटजातीला अितर सर्व ब्राह्मणांपेक्षां श्रेष्ठ समजणारी अेकादी अुत्तरभारतीय टोळी दक्षिणेंत

स्थाअिक झाली, 'व आम्हीं सर्वांचे काका' या आविर्भावानें ते स्वतःला चाचे ब्राह्मण म्हणवून घेऊं लागले असावे.

मिळालेल्या रोजनिशीच्या पानांवरून दिसतें की, चाचेभट यांनी मारवाड्याच्या वहीमारखी नव्हे, प्रत्यक्ष मारवाड्याच्या वहीचीच पानें आपल्या रोजनिशीला वापरली आहेत, आणि तीही मारवाड्याच्या दुकानांतच बसून. उपलब्ध असलेल्या स्फुट गंद--भांत असा एक भाग आहे की, चाचेभट यांना एकदां थकबाकीचा तगादा इतका लागला की त्यांना रोज सध्याकाळी (किंवा सकाळीं) दरबारांतून परत आल्यावर मारवाड्याच्या दुकानावर वह्या लिहिण्यास जावें लागत असे. त्याच्यासारख्या रसिक माणसाला वहीखात्याचे हिशेब लिहिण्याच्या नीरस कामाची वेठ असह्य होऊन त्यांतून सुटका म्हणून मनोविनोदनार्थ तें हिशेबवह्यांच्या शेवटच्या पानावर रोजनिशी लिहू लागले असल्यास नवल नाही.

चाचेभटजीच्या रोजनिशीत केवळ रोजच्या ठराविक हालचालींची नोंद नसून मुख्यतः दरबारी हकीगतीचें उल्लेख व विशेष महत्त्वाच्या गोष्टींचें तपशीलवार वर्णन आढळून येतें. प्रथम किरकोळ मुद्याचे टांचण देऊन खाली आडवी रेघ मारून, 'यादी' या शीर्षकाखाली सविस्तर मजकूर कित्येक पानें चालू ठेवलेला आहे. प्रस्तुत यादीला 'सव्वा मण वजनाचें बखतरप्रकरण' असा पोटमथळा दिलेला आहे. निवेदनांत घडलेले प्रसंग इ. स. १८१०--११ च्या सुमारास घडले होते असे दिसतें. चाचेभटांच्या रोजनिशीचे संपूर्ण कागद मिळते, तर रावबाजीच्या कारकीर्दीतील दरबारी जीवनावर विदारक प्रकाश पडला असता. ते नष्ट झाले तें एकप्रकारें बरेंच झालें अशा मताचा एक पक्ष आहे हें आम्हांला माहीत आहे. पण साधेल तितकें सत्यान्वेषण, हे कठोर कर्तव्य असल्यामुळे सदरहू रोजनिशीतील यादीचा सगतवार मिळालेला मजकूर पुढे प्रथमच प्रसिद्ध करीत आहोंत. जरूर तों विरामचिन्हें व अर्थ सुस्पष्ट होण्यासाठीं किरकोळ शुद्धलेखनविषयक दुरुस्त्या शुद्धलेखनसमितीच्या अगोदरच्या प्रघातास धरून केलेल्या आहेत. प्रसंगी ( पूर्वाचार्यांच्या पायंड्यास अनुसरून ) रसनिष्पत्तीसाठीं

थोडा वर्णनविस्तारहि केला आहे, तो तज्ञांच्या लक्षांत येईलच. ]
निजामाकडोन वकालत आली. प्राय: निजामाकडील दूत येती ते हिशेब लिहिणाऱ्या कारकुनांची मागणी करण्याकारणें. सांगतात कीं मोगल आंकडेमोडी करणें कमीपणा मानतो. तथापि कधीं दरवेशाचा खेळ, कधी दूर देशीचे सोदागर, कुठें जादूगार, क्वचित कळवंतिणी असेंही धाडतात.नाना होते तोंवरी बुद्धिचातुर्याची पारख होणेंसाठीं निजाम शिंदे गायकवाडांकडोन माणसें येत.बहादुरीचीहि कसोटी पुणें राजधानीत लागे. पहिलवान, लढवय्ये, तलवारबहाद्दर असे बहूत परदेशी, तुरुक, रोहिले, अरब, फिरंगी येत. हत्तीस पुढील पायांस धरोन उचली असा सिद्दी पीलखान्यांत चाकरीस ठेविला होता. बैल उचलोन पाठीवर वाहोन नेणारा भिवा पांडुरंग यास तर नानांनीं खुराक–खर्चीसाठी नेमणूक करोन दिल्ही होती. नानांच्या मागोन सारें पालटलें. सांप्रत नट, विट, गायक, विदूषक, मध्यस्थ, अंगमर्दक, नर्मसचिव, अशांमच्च केवळ राजाश्रय-अशी कुरकूर जयांची दरबारी वरणी न लागेल अशीयांची कानीं येते.

निजामाची वकालत एक चिलखत घेऊन आली आहे. सोबत चिठी आहे की ‘ सवा मण वजनाचें बखतर पाठवित आहोंत. तालिकोटच्या लढाईत आमचे थोर पूर्वज* (?) मरहूम अहमदनगरकर निजामशहा हुसेन बहिरी मराठा याणी जिकोन आणिलें होतें तें कालांतराने आमचे संग्रही दाखल झालें. सवा मण वजनाचें चिलखल घालोन लढेल असी असामी आमचे राज्यांत मिळत नाहीं. मराठी मुलुखांत बहाद्दर बहुत, यास्तव तिकडे पाठविलें असे. हें बखतर चढवोन त्याच्याबरोबर असलेल्या हत्यारानी लढेल असा कोणी मर्द तुमचेकडे असल्यास त्यास आमचेकडे धाडावें, आम्ही त्याची बहुत कदर करूं व त्याचे बदली तीन निवडक इराणी कनीजा आपणांस देऊं, त्याच्या तसबिरी पाहणेस पाठविल्या आहेत. जबाबाची उत्कण्ठेनें वाट पहात आहोंत. ’

दिवाण अताजी माणकेश्वर यानी पत्र वाचले, चिलाखताची

* जुन्या नगरी निजामशाहीला हैद्राबादकराने आपल्या वशात सामील करून घेतलेले दिसते !

पाहणी अव्वल मानकरी रंगराव खजानें यानें केली, व खुद्द श्रीमंत पंतप्रधान भट पेशवे यवनदासीच्या प्रतिमांचें रसिकपणें अवलोकन करूं लागले. लौकरच आज्ञा केली की ' बखतर घालून मनुष्य पाठवीत आहोंतच, दरमियान फारसी कुणबिणी पोहोचत्या कराव्यात ' असा लखोटा निजामास द्यावा.

अंताजीपंतांनी प्रार्थना केली कीं सवामणाचे चिलखत अंगावर घालणेंच काय पण उचलणेंहि कठिण, तस्मात् तें धारण करणारा वीर मिळेपर्यंत निजामास जबाब धाडो नये. त्यावर स्वामी नाखुषीनें बोलिले ' तुम्हांला काय त्याचें, दासी येवोन पडो द्याव्यात, माणसाचा शोध चालू ठेवावा. ' त्यावर धोंडभट कामशेतकर यांनी सूचना केली की निजाम अति धूर्त, केवळ शृगाल, त्याणें दासी पाठविणे महादुष्कर, नामुनकीन शर्त आपणास घातली ती या दरबारची परीक्षा पाहणेसाठी. तो जाणतो की सव्वामण बखतर वाहून युद्ध करील असा लढवय्या वर्तमानकाळी सापडणें मुशकिल. याप्रमाणें इतर दरबारी तसेंच मानकरी यांनीं श्रीमंतांस बहुत विनविलें, की अशक्यप्राय गोष्टीची अट घालून निजाम आपणास नादीं लावू पाहतो. वाटल्यास अन्यत्र इराणी दासी खरेदी कराव्यात व बखतर सरकारजमा करावें, बाकी येविषयी ईर्ष्येस पेटणें व्यर्थ. हे ऐकोन श्रीमंत नाराज होऊन दरबारांतून उठोन गेले व मागाहून आज्ञा आली कीं ग. भा. ताई घरगळे व वेणू बारटाकीकर यांचे खेरीज कोणालाहि दर्शन मिळणार नाही.

दिवाण अंताजी माणकेश्वर यांचेवरी हा बिकट प्रसंग. नुकतेच कोठें हरदासी पेशा सोडोन राजकारणी जाहाले, तों असी हे स्वामीची इतराजी. त्यांनी श्रीमंतांच्या इच्छेनुसार निजामाकडे मोघम उत्तर धाडिलें, पण तें जाणून राहिले की पण जिंकणारा सांपडोन त्याच्या बदली इराणी दासी येओन श्रीमंतांचें चित्त प्रसन्न करतील हे आशा न कामाची. कोण्याप्रकारें श्रीमंतांचें रुष्ट मन फिरून सहर्ष होईल तें पाहाण्याची सिकस्त करतात. त्या कारणें शहरांत दवंडी पिटवून मोहरांचा तोडा इनाम ठेविला, कीं जो कोणी सवा मणाचें चिलखत चढवून हत्यारांचे हात करील

त्यास मिळेल, जो हरेल तो हत्तीचे पायीं जाईल.

त्याखेरीज सेनापति बापू गोखले यांस बोलाविलें. पण त्यांचा जबाब आला की, लढाईचे प्रयोजन असेल तेव्हांच आमंत्रणाला मान देऊं. खुशमस्करीचा पेशा आमचा नोहे. त्यानंतर कोणाला स्मरण जाहलें की विसाजीपंत खासगीवाले हे मोठे ताकदीचे म्हणून महशूर. त्यांचे घरी हरकारा गेला तेव्हां समजलें विसाजीपंत कैलासवासी होऊन वर्षे लोटली, व त्यांच्या परिवारांत कोणी नवा शक्तिशाली पुरुष अद्यापि तयार जाहला नाही. मागाहून शेख सल्ल्याचे म्हशीदीजवळ कोणी अवाढव्य देहाचा गुल्या खाटीक म्हणून आहे असी वार्ता मिळाली. शिपाई पाठवून त्यास धरोन आणलें. तो नको नको म्हणत असतां त्याचेवर बखतर चढविलें व हत्यारें दिली. परंतु त्याला तिघा चौघांनी उभा केला होता, त्यांनी सोडतांच तो तोल जाऊन धाडकन् भूमीवर आडवा पडला. बहुत प्रयत्नांनीदेखील पुन्हा उभा राहणे असाध्य, त्यास मूर्च्छाही येऊं लागली. तेव्हां पाणी शिपडून त्याला चिलखतांतून सोडविलें व हाकलून दिलें. अताजी माणकेश्वर कोणातरी मोठाड माणसाच्या चौकशीत आहेत, त्या माणसास चिलखत घालून हत्यार चालवावें लागेल हे सर्वत्र कळतांच पुणे मुक्कमाहून वडे वडे पहिलवान दुसरीकडे निघोन गेले. इतकेच नव्हे तर धिप्पाड अंगाचे गवळी, रंगारी, तेली, महार, वेरड, आणि वडरदेखील पुण्याहून दृष्टिआड झाले. मोहरांच्या तोड्याचा मोह कोणासी पडला नाही. हत्तीच्या पायीं जाणेचें भय सर्वासच.

याप्रमाणे एक सप्ताह जाहला. काल रोजी एक विस्मयकारक मामला पडोन आला. घुमरी गावचा कोणी बाळा पहाडे बखतर घालून दाखविणेस तयार झाला. 'हत्यार चालवतों आणि हत्तीच्या पायीं जाणेस राजी आहोत,' असे बरोबर आलेल्या माणसाचे मुखे सांगता जाहला. खुद्द वज्रदेही, राक्षसापरी धिप्पाड, तथापि सौम्य, हास्यमुख. दरबारांत बहुत खळबळ उडाली. श्रीमंतांची स्वारी अंतःपुरातून बाहेर पडोन इतके दिवसांनीं प्रथमच मनसदीवर विराजमान झाली. बाळा पहाडे यास कौतुकानें

निरखोन स्वामींनीं विचारलें कीं, हाच तो वीर पुरुष काय ? तो स्वतः कांहींच न बोलतां नुसता हात जोडून स्मितमुखानें स्वामीं-कडे व्यस्त नेत्रांनीं पाहात राहिला. ते प्रसंगी अंताजी पंतांनीं स्वारीचे कानांत सांगितलें कीं, उमेदवार बहिरा, मुका, व तिर्यक दृष्टीचा आहे. तसाच बुद्धीचेंबाबत अंमळ मंद, तथापि देहावरोन वाटतें कीं हा खचित पण जिंकील. मग हत्यारखान्यांतून निजा-माकडील बखतर व शस्त्रें आणविलीं. तिघा चौघांनीं सदर बाळा पहाडे यांस सज्ज केलें व हातांत फिरंग दिल्हे. श्रीमंतांनी फर्माविलें कीं आतां यांस लढणेस सांगावें. त्यावर त्याच्या बरोबरच्या लोकांनीं खुणांनीं आणि ओरडून त्यास प्रोत्साहन दिलें. त्यासरशीं सदर बाळा पहाडे याणें उभय हातांनी फिरंग फिरविण्यास सुरुवात केली. त्याला थोपवीपर्यंत त्याणें एक झुंबर, दोन हंड्या, तीन चार कांच गोळे इत्यादियांचा नाश केला. नंतर त्याची नजर त्यास अडविणेस आलेल्या तुळचा काकडे नामें हुजऱ्यावर गेली व शस्त्र उचलून मोठी गर्जना करीत त्याचे अंगावर धावोन गेला. तथापि चिल-खताचें वजनानें त्याला तोल सांभाळतां न येऊन तो नीट जाऊन मोठ्या बिलोरी आरशावर आदळला. अयन्याचे शतशः खंड जाहले. बाळा पहाडे आडवा पडला, त्याचेवरी पांचसहाजण चढून त्याला दाबून धरून बसले. तो शांत जाहला तेव्हां त्याला सर्वांनीं उठविला.

श्रीमंतांना बहुत संतोष जाहला, आज्ञा केली की, याच पावलीं यास निजामाकडे पाठवावा व त्याच पावलीं येतांना इराणी दासी आणाव्या. तथापि अंताजीपंत दिवाणांनी प्रर्थना केली की यासी दरबाराचे दिवाणखान्यांत लढण्यास जागा नाहीं, मैदानांत लढवावें व तशी पारख झाल्यावरज निजामाकडे धाडण्याचा मनसुबा करावा. स्वामींनीं नाखुषीनें मंजुरी दिली.

बाळा पहाडे याला जोड बहुत शोधिली. याचे संगे लढावें कोणीं ? हा तर प्रति घटोत्कच, जीवेंच मारावयाचा. म्हणून कोणीही तयार न होई. स्वामींनीं आज्ञा केली की याचे अंगांत चिलखत आहे व हा पर्वतप्राय देह, तरी कोणीही कांहीही हथि-यारांनीं याचेवर चालून जावें. मात्र मारूं नये. कारण अजून यास

निजामाकडे पाठविणें आहे. तरीही कोणी धजेना. गाडदी, रोहिले, आरब सर्वांसी सांगोन पाहिलें. गाडदी नुसता हल्ला करण्यास माणसीं दहा मोहोरा या हिसाबें पन्नासजणांसाठीं पांचशें मागूं लागले. रोहिले फुकाचा वाद घालूं लागले, म्हणाले याचें बखतर काढा अथवा आम्हांस तरी बखतर द्या, अन्यथा अंगावर जाणार नाही. अरबांचें मुखत्यारें जबाब दिल्हा की पगार थककेला, तो मिळाल्याशिवाय याचेवर बंदुकाच्या गोळ्या देखील चालविण्यास तयार नहोत.त्यांना पुष्कळ चेतविले,'हा बाळा पहाडे तुमच्या धर्माची नालस्ती करतो, याला कापून काढा' सांगितलें तरी हलेनात. त्यांचा सरदार मुहम्मद इबन रैसुली बोलिला की पगार हाती पडेपर्यंत जेहाद देखील पुकारणार नाही, काफरासी मुफत कोण मारितो ?

ते समयी श्रीमंतांनी स्वताची कंठी काढून आरबास दिल्ही व बोलिले–निदान या किमतीच्या तरी गोळ्या झाडाव्या. आरब मान्य जाहला व त्याचे सात आठजण आपापल्या कडाविणीत दारु ठासू लागले. बखतरधारी बाळा पहाडे यास ढाल तरवार बरची भाला या आयुधानिशीं तयार करून पर्वती रमण्याचे कोटांत दोनशें कदमांवर उभा करून आरबाणी फैर झाडिली. तो भूमीवर पडला. आरब आपापली हत्यारें बांधोन मुजरा करोन गेले. खासा श्रीमंत स्वारी कारभारी अंताजी माणकेश्वर, चगूभट चोखट, गहेन्या सुरगी, आणि इतर मानकरी मंडळी पडलेल्या इसमाभोवतीं गोळा झाली. *भस्माचार्य हिरडेशास्त्री याणी बाळा पहाडे याची नाडी पाहून निर्णय दिला की जिवंत आहे. बख्तर उतरलें. त्यावर गोळ्यांची निशाणी मात्र नाही. तर्क जाहला की गोळियांच्या आघाताआधींच तो पडला. खुद्द बाळा पहाडे यास बखतराच्या किरकोळ खरचटीपलीकडे जास्त इजा कांही नाही. केवळ भोंवळ येऊन पडलेला. वैद्यराजांनीं अधिक परीक्षा करून सांगितलें कीं, यास क्षुधेची जबर व्यथा आहे. रुग्ण कित्येक दिवस अन्नभक्षण केलेला दिसत नाही. बाळा पहाडेचें पोट खपाटीला लागलें होतें. श्रीमंतांनी चौकशी केली याचे बरोबरचा मनुष्य कोठें आहे ?

*हे कोण ? समकालीन कागदपत्रात याचा निर्देश नाही.

तितक्यांत तो मनुष्य रडत ओरडत ऊर पिटीत दाखल जाहला. कोतवाल पंछूलाल याणें प्रथम त्यास एक आसूड हाणोन विचारिलें कीं, या बहिऱ्या मुक्या प्राणियास त्वां उपाशी कां ठेविलें? थोडचाबहुत चौकसीनें अखेरी उलगडा जाहला की बाळा पहाडे यास सरकारस्वाधीन केल्यानतर परत दोन दिवस त्याचें बरोबरचे मनुष्यास दर्शन जाहाले नाही.

बाळा पहाडे यास दिल्ली दरवाजावर चौघडचाच्या माडीत पहाऱ्यांत ठेविले होतें. त्याचा अन्न–खर्च कोणत्या खात्यामधून, खानगी, शिबंदी की कोतवाली, याचा कारकुनांनी निर्णय करीपर्यंत त्याला अन्न मुळीच पोहोचलें न होतें. दयाळू पहारेकऱ्यांनी दिलेल्या उदकप्राशनावर दोन तीन दिवस कंठावे लागले–आणि तेही श्रीमंत पंतप्रधान भट पेशवे सरकारच्या राजधानीत, राजप्रासाद शनिवारवाडचाच्या दिल्ली दरवाज्यावर, नगारखान्याच्या ऐन मेघडबरीत ! खरोखर श्रीची लीला अतर्क्य आहे.

"चांदीचें पंजरी हस्ती भुके झुरे" हें श्रीपतीचे बोल स्मरतात. तेथें सनई चौघडा वाजवणेस येणारे तीन प्रहरचे वाजंत्री त्याला जी काय पानतंबाखू देत होते तोच त्याचा आहार. येणेंप्रमाणें सर्व खुलासा होईपर्यंत श्रीमंत स्वारी मध्यान्ह भोजनासाठी वाडचावर परत गेली. बाळा पहाडे यास बरोबर नेले. पोपाक देऊन भोजनासी खासे पंक्तीस बसविले, पंचपक्वानें भक्षणास देऊन बहुत विचारिलें.

दरमियान पर्वतीचे पायथ्याशी कारभारी अंताजी माणकेश्वर यांनीं बाळा पहाडे याचे बरोबरच्या त्याचा भाऊ म्हणविणाऱ्या इसमाची पुढे चौकशी चालविली. सदरहू पहाडे पहाऱ्यात असला तरी तू त्याची तेथें जाऊन वरचेवर विचारपूस कां केली नाहीस, असें श्रीमुखांत देऊन पुसतां, तो बोलला की याला आणून वाडचावर हजर केल्याबद्दल मिळालेली एक मोहर खर्च करण्यासाठी मी गुण्या हुजऱ्याबरोबर थोडा पुणें शहर पहात फिरत होतों. कारभाऱ्यांनीं गुण्या हुजऱ्याला गालिप्रदान करोन त्याणे या इसमास सायंकाळी दरबारांत हजर करावें असा हुकूम दिल्हा व स्वतः भोजनास गेले.

वामकुक्षीनंतर सायंकाळच्या खास दरबारी खुद्द स्वामीपुढें बाळा पहाडे याच्या बरोबरचा, त्याचा पालक, भाऊ म्हणविणारा पण मार खाल्ल्यानंतर खरें नांव चंद्रोजी घाटगीर असें कबूल करणारा इसम याची चौकशी चालू झाली. तोंच धाडसीपणानें एक भव्य मजबूत बांध्याची स्त्री दरबारांत थेट मनसदीपर्यंत आली. आणि स्वामींचे पाय धरोन म्हणू लागली की 'माझ्या पतीला जीवदान द्यावें.' निद्रा मनसोक्त जाहलेकारणानें स्वामींची प्रकृति प्रसन्न होती. त्यांणी आवतीभोवतीं कटाक्ष टाकून सस्मित प्रश्न केला, 'बाई, तुमचा भ्रतार कोण?' त्यावर बाईनें बाळा पहाडे, म्हणून गिरफदार चंद्रोजी घाटगीराचा जावोन दण्ड धरीला, व धीटपणें त्याला बिलगून उभी राहिली. पंछूराम कोतवाल यांचे चेहऱ्यावर विस्मय व क्रोध दिसो लागला. तो बोलणार इतक्यांत स्वामींनीच बाईस प्रश्न केला. उजवे हाताकडे बसलेल्या अस्सल बाळाजी पहाडे याचेकडे दृष्टीक्षेप टाकून श्रीमंत बोलिले 'हे बाजूचे असामी कोण माहीत आहे काय?' त्यावर 'नाही' म्हणोन खाली पाहों लागली. दरबारात हास्य जाहलें, कुजबूज चालली. सरकारचे बाजूचाच पुरुष तो बाळाजी पहाडे हे कळल्यावर मात्र बाई लगबगीनें त्याचेकडे आली व रुदन करोन म्हणो लागली की 'हा हाच खरा माझा नवरा, मघा उन्हांतून धावत आले तेव्हां नेत्रांपुढें अंधेरी आली होती, आतां स्पष्ट दिसों लागलें. स्वामींचें बाजूचा हाच माझा पती, सवामणाचें बख्तर घालून लढणारा जवान मर्द बाळा पहाडे घुमरीकर, मोहरांचा तोडा जिंकणारा,' म्हणून मृगनेत्र करून श्रीमंताकडे पहात राहिली. स्वामींनी सस्मित पुसलें 'बाई त्वां पूर्वी कधी तुझ्या पतीस पाहिलें होतें काय?' त्यावर ती नम्रतेचा महान् आविर्भाव करून उत्तर देते की 'ते स्वतः नाहीं पाहिलें,पण काल रात्रौ हे अटकेनले इसम व गुण्या हुजऱ्या भेटले होते.'

इतका वेळ गप्प राहून कोप करून रक्तवर्ण झालेल्या कोतवालाने एकदम पुढे होऊन म्हटलें 'सरकार बेअदब माफ, ही बाई झूट बात करते. ही नुकतीच ब्ऱ्हाणपुराहून आलेली राणी परदेशीण, बाळा पहाडेनें जिंकलेल्या मोहरांच्या तोड्यावर डोळा आहे

हिचा. बाळा पहाडेनें मोहरांचा तोडा जिकला हें कळतांच 'दरबारांत स्वयंवर करीन, वाटेल तें करीन, बाळा पहाडेचें इनाम त्याच्याकडोन मिळवीन, निदान पक्षी श्रीमंतांच्या नजरेस पडेन ' असा पैजेचा विडा उचलून ही आज सकाळीच कसब्यांतून निघाली आहे. '

तिचें छद्म उघकीस आलें तरी ती टकमका स्वामींकडे पहात उभी राहिली. इतक्यांत कारभारी अंताजी माणकेश्वर यांनी नवी नच नेमलेला हेर सुकुमार कलाल तांतडीचा निरोप घेऊन दरबारीं आला. तो दत्तोबा घुडीराच्या कानांत कायसें कुजबुजला. दत्तोबानें कारभाऱ्यांचे कानांत व कारभाऱ्यांनी श्रीमंतांचें चरणीं कांहींतरी सांगितलें. खलबत-खान्यांत ते तिघे चौघे गेले. दोन घटिका दरबार तहकूब झाला. चंद्रोजी घाटगीराप्रमाणेच राणी परदेशीणही कच्च्या कैदेंत पडली. पण दरबारी मानकऱ्यांत तिच्या ओळखी बहूत निघाल्या. ती ज्याला वरिण्यास निघाली तो बाळा पहाडे मसनदीचे उजवे बाजूस बसल्या बसल्या निद्रा घेत होता व त्यास बखतर चढवून हैद्राबादकराकडे केव्हा रवाना करणार येविषयीं चर्चा सुरू जाहली होती. तितक्यांत हुसन्या हुक्केभऱ्यानें सेवकाचे कानांत येऊन सांगितलें, की स्वामींनी बोलावलें नसलें तरी जावें, कारण समस्या बिकट.

जावोन हात जोडोन विश्रामभग केला व अर्जी की दासास सांगावें, श्री काय बुद्धी देईल ती मुखीं येईल. श्रीमत बोलिले अंताजी यांना सांगा. सुकुमार कलालानें निरोप आणला होता की निजाम-अलीनें जणो खोडाच खोदून ठेविला आहे, तस्मात पण जिंकिणें अधिक धोक्याचें. जर सवामण बखतर पेहरून हथियार चाल-विणारा मर्द गडी मराठी मुलुखांत निघालाच तर एखाद्या नबा-बाच्या अमर्याद जनानखान्यांतून बाद झालेल्या दोन तीन म्हाताऱ्या इराणी बटकी निजाम पाठवून देईल आणि तमाशा पाहात राहील. वरती त्याचे जे ताम्र खावंद त्यांसही सांगेल. अविधाबरोबरच टोपीकरहि पुणें दौलतीस हांसेल, ही आपत्ती टाळणें बहुत अगत्याचें, तत्राप मार्ग सुचवावा.

त्या प्रसंगीं ध्यान करून मनःपूर्वक श्रीस्मरण केलें आणि मतीस चालना प्रार्थिली. परम भाग्य कीं बुद्धीचे ठायी श्री कृपेनें चेतना स्फुरली व श्रीमंतांना पडलेल्या अडचणीवर तोडगा या पामरास सुचला. सुचविले की, मव्वामण पेलणारा वीर मराठ्यांत निघाला नाही तरी इभरत जाते; मिळाला तर तीन निकामी इराणी बटकी पदरांत येऊन डोंगरासारखा आपला मनुष्य परक्याला जातो. सुदैवानें एक युक्ति सुचते. आतांच दरबारांत आलेली परदेशीण महाकाय आहे, अपराधी आहे, कुटिलहि आहे, तिलाच ते बखतर चढवून निजामाकडे धाडावें. कळवावें कीं, हिला जोड न मिळाल्यास परत पाठवावें, व यवनदासी द्वादशवर्षा असतील तरच पाठवाव्यात. अन्यथा वाटल्यास टोपीकरास आमचे सलामासहित पेश कराव्यात. आम्हांस नकोत. भाग्यवशेंकरून माझी सल्ला सर्वांस पसंत आली. श्रीमंतानी टाळी देवोन प्रेम व्यक्त केले, अंताजीपंतांनी आपली शालजोडी काढून पांघरली, आणि रंगराव खजाने याणी कानांत सांगितलें कीं, आज रात्री पर्वतीचे तळ्यावर पूर्णिमेचे नौकाविहारास हजर राहावें.

ते शुभ रात्री श्रीमंत पंतप्रधान भट पेशवे राववाजी साहेब सेवकावर विशेषच प्रसन्न होते. पंछुराम कोतवालाचे मेहुण्यानें सादर केलेली वाराणसीची दासी नामें अन्नपूर्णा श्रीमंतांनी सेवकास बहाल केली. केली. तिच्या खर्चीपोटी गारपिरावर घर दिलें, व किवाडीचें वतन माझें नांवें करून दिले. तसेंच अंताजीपंतांनी कर्जवामाचा हवाला घेतल्याने वेणीचंद मारवाड्याची वही लिहिण्याची हेच समाप्ती. माझे विनंतीवरोन चंद्रोजी घाटगीरास समज देऊन सोडोन देण्याचा हुकूम जाहला. राणी परदेशिणीची पाठवणी चिलखतासह एका वृद्ध हस्तीवरोन हैदराबादेकडे केली. ती सुखरूप परत आली तर तिचें बाळा पहाडे याचेशी लग्न लावोन देऊं व त्यास भूमी देऊं असें आश्वासन खासा स्वारींनें दिलें. दरमियान बाळा पहाडे यास वेताळ टेकडी वस्तीस देऊन मणाचा खुराक चालू केला आहे. आजतागायत तो पाठीवर रेडा घेऊन डोंगरावरून दौडत जातांना दिसतो.

✦✦ ✦✦

: ५ :

## दंग्याचे फायदे

अगोदर मेहेरबान कोतवालसाहेब यांच्यासाठीं अदबीनें खुलासा करण्यांत येत आहे कीं दंगे हे प्रकार चांगले असें ठरविण्याचा येथें हेतू नाहीं; दंग्यांपासून फायदे होतात म्हणून दंगे करावे असा प्रचार करण्याचा यत्किंचितही इरादा नाहीं. जातीजातींत वैमनस्य वाढविणें, हिंसेला उत्तेजन देणें, अशांति माजवणें इत्यादि प्रक्षोभक ध्येयांनी प्रेरित होऊन हा मजकूर लिहिला जात नाही.तर दुर्दैवानें जे दंगे होतात, सरकार, अधिकारी व पोलिस यांच्या दक्षतेस न जुमानतांही ज्या मारामाऱ्या सुरू होतात, शहरांतून जें तेढीचें, धास्तीचें, संशयाचें आणि अस्वस्थपणाचें वातावरण उत्पन्न होतें, आणि त्या गोष्टीचे जे दुष्परिणाम नागरिकांना भोगावे लागतात, त्यांतूनच कांही सुपरिणामही दृष्टोत्पत्तीस येतात, त्यांचाच निर्देश येथें करण्याचे योजिलें आहे.

शहरांतून दगे कां होतात, केव्हां होतात, कसे होतात वगैरे प्रश्नांचा मीमांसा करण्याचे बाजूस ठेवलें, त्याचप्रमाणें दंग्यांचें विविध स्वरूप, दंग्यामागील मानसशास्त्र, दंग्याचें निदान, अर्थ, महत्त्व अथवा सूचकत्व यांची साधकबाधक चर्चा करणें वर्ज्य केलें, तसेंच दंगे आणि राजकारण, दंगे आणि समाज, दंगे आणि स्त्रिया दंगे आणि अध्यात्म वगैरे स्थूल प्रमेयांची उपपत्ती लावण्याचा

नाद सोडून दिला, म्हणजे केवळ दंगे आणि त्यांच्या पासून निर्माण होणाऱ्या आपत्तीमधून अभावितपणें आढळून येणारे अनुकूल परिणाम, या सुटसुटीत बाबीपुरताच आपला विषय मर्यादित राहतो हें दिसून येतें. आणि त्या विषयाला सुरुवात करण्यावाचून आतां गत्यंतर राहात नाही.

कांही वर्षांमागें कलकत्ता, ढाका, अलाहाबाद, आग्रा आणि मुंबई अशा शहरांतून दंगे चालू राहून असंख्य निरपराध नागरिकांची हत्या व अपरिमित दौलतीचें नुकसान झालें, यावर उपाय म्हणून त्या त्या ठिकाणचे अधिकारी पोलीस व लष्करी बंदोबस्त, सभा मिरवणुकी व हत्यारबंदी, संशयास्पद लोकांना अटक व सर्वसाधारण जनतेला सूचना, असे नाना मार्ग अवलंबीत होते. ' कर्फ्यू ऑर्डर ' अथवा ठराविक तासांपुरती पूर्ण नाकेबंदी या हुकमाचीही कडक अमलबजावणी होत होती. या उपायांचा सर्वसाधारण नगरावर व नागरिकांवर होणारा परिणाम सूक्ष्मपणें अभ्यासून असें आढळून आलें की प्राय: दंगा जरी वाईट तरी त्याच्या अनेकविध दुष्ट फलांबरोबर अल्पांशानें सुष्ट फलेंहि दृगोचर होतात. घराला आग लागली म्हणजे उपयुक्त वस्तू जळतात खऱ्या, पण ढेकुण, डांस, झुरळें, उंदीर वगैरेही खाक होतात. असेच कित्येक गौण फायदे दंग्यामुळे घडून येतात.

प्रथम पोलीस व लष्करी बंदोबस्ताचा विचार करूं : शांततेच्या काळांत रहदारीविषयक चुका, बेशिस्तपणातून उद्भवणारे अपराध आणि असलेच इतर क्षुल्लक गुन्हे तपासण्यांत आणि हटवण्यांत पोलिसांचा वेळ जातो. शांतता आणि सुव्यवस्था या स्थायी अवस्था असल्या म्हणजे पोलिसाला अशांतीचें निवारण व अव्यवस्थेची सोडवणूक अशी निव्वळ नकारात्मक कामगिरी असते, व त्यामुळें त्याच्या लढाऊ गुणावर गंज चढण्याचा संभव असतो. पण दंगा चालू असला म्हणजे पोलिसाची कामगिरी कितीतरी पटीनें वाढते; त्याच्या अंगी दक्षता, चपळपणा, धाडस, कल्पकता, अंगमेहनत वगैरे गुण बहुगुणित होतात. त्याच्या प्रतिकारात्मक व आक्रमक गुणधर्मांना झिलई मिळते, बुद्धिला तजेला येतो, त्याच्या दंडुक्याची

लाठी होते, पगडीचें लोखंडी शिरस्त्राण बनतें, कर्तबगारीची मर्यादा अफाट होते.

तीच गोष्ट लष्कराची. बराकीत राहून हडेलहप्पी, घासणेपुसणें, धंदेशिक्षण किंवा रोमन उर्दू असले बिनलढाऊ उपक्रम करीत माशा मारीत बसणारे शिपाईगडी दंग्याच्या भागांत आणण्यात येतात तेव्हां त्यांना एकादी तरी फैर झाडण्याची संधी उपस्थित होते, एरवी ते नागरिकांच्या कुतूहलाला, पौरस्त्रियांच्या विस्मयाला आणि पोराबाळांच्या करमणुकीला कारण होतात, पण जरा दंगेखोराची गडबड झाली कीं तेच खाकीबहादूर जवान सज्जनाचें कैवारी आणि दुर्जनाचे कृतांतकाळ या भूमिकेंत शोभू लागतात सैन्य जवळ आहे म्हणून नेहमीच कोणी लढाया काढीत नाही; अशा परिस्थितीत दंगे नसते तर आमच्या बंदुकधाऱ्यांच्या नळ्या तापण्याची वेळ कधी आली असती ?

दंग्याच्या निमित्ताने सभाबंदी ही तर निरुपद्रवी नागरिकांना मोठीच देणगी होय. बोलण्याची सुरसुरी असणारे कांही वक्ते आणि ऐकण्याचे रिकामपण असणारे श्रोते एवढ्या सामग्रीवर नेहमी निमित्त मिळालें की ज्या सभा होतात—पुष्कळदा निमित्ताशिवाय देखील— त्यांपासून सामान्य रयतेस सुटका मिळाल्यास दंग्याचा निःसंशय उपयोग आहे. सभातून व्यर्थ दवडलेली तोंडाची वाफ एक गिरणी रात्रंदिवस चालविण्याइतकी भरेल असें एका आंकडेशास्त्र्याचें मत आहे; त्याचप्रमाणें प्रत्येक व्याख्यात्याची टकळी ही खरोखरच सूत काढती व व्याख्याता हा पेळू असता, तर त्या गिरणीला धाग्याचाही कायम पुरवठा होता, असेंही सदर अंककोविदाचें अनुमान आहे. परंतु ज्यापक्षी व्याख्यानांतून वांया जाणारी अश्वशक्ती उत्पादनाच्या कारणीं लागत नाही त्यापक्षीं सभाबंदी मग ती दंग्यासारख्या आपत्तीमुळें का मिळेना स्वागतार्हच होय असें म्हणणें अपरिहार्य आहे.

मिरवणुकीवरील निर्बंधही स्वधर्मी रत असलेल्या शांतताप्रिय नागरिकांना पसंत पडण्यासारखा आहे. शेकडो लोकांनी एकादी उत्सवमूर्ति पकडून आरडा ओरड करीत वाजत गाजत शहराच्या

क्रमरस्त्यांतून जाणें या उपक्रमानें नेहमींची रहदारी, नित्याचे व्यवहार, चालू निःस्तब्धता आणि एकंदर जगरहाटी या व्यापारांत किती व्यत्यय येतो हें मुद्दाम वेगळें सांगण्याची गरज आहे काय ? मिरवणूकीच काढावयाच्या असल्या तर त्या गांवापासून दूर राना वनांत काढाव्या, शहराच्या अगोदरच्या गर्दीत ती भर कशाला ? मिरवणुकीनी नागरिकांचें लक्ष आपल्या कामाकडे लागत नाहीं, पोरें धडा सोडून खिडक्यांकडे धावतात, स्त्रिया आमटीत मीठ टाकण्याचें विसरतात, नोकर काम सोडून पळतात, कुत्रीं भुंकू लागतात आणि एकंदर हलकल्लोळ उडतो. दंग्याच्या कारणानें मिरवणुकी बंद होऊन अशा प्रकारांपासून उसंत मिळते.

हत्यारबंदीबद्दल बोलायचें म्हणजे प्रथम हत्यारें कोणतीं हें ठरविले पाहिजे; दयाळू इंग्रज सरकारनें हत्यारबंदी केव्हांच केलेली आहे. शस्त्रें आपल्याला फक्त अजबखान्यांतून आणि लष्कराकडे पाहायला मिळतात. तोफा, बंदुका, हातगोळे, तरवारी, भाले, जबिये, पिस्तुलें अशीं हत्यारें आपल्याला रस्त्यांतून क्वचि-तच दिसतात. दंग्यामुळें हत्यारबंदी येते ती वरील दुर्मिळ हत्यारां-खेरीज लाठ्या, सुरे, चाकू अशा आपद्धर्मीय हत्यारांवर. आम्हां पापभीरू व हिंसाहीन हिंदू प्रजेला अशा हत्यारांची देखील भीति वाटते तेव्हां त्यांचीही बंदी योग्यच होय. याहीपेक्षां अधिक दक्षतेचा मार्ग म्हणजे जाड आंगठ्या, लांब नखें, बाहेर येणारे दात, जड पायताणे, चालतांना फाजिल परजली जाणारी कोंपरें, गुडघे व टणक डोकी अशा शक्य हत्यारांवरही बंदी घालण्यांत यावी म्हणजे निर्भयता वाटेल, असे एका अहिंसा-पंडिताचें म्हणणें आहे. सरकार तिकडे लक्ष देईल काय ?

संशयित इसमांची धरपकड हा दंग्यावरील इलाज फारच उपकारक आहे. अशा धरपकडीत नुसते पोलिसांच्या यादीतले गुंड, खुनी, हिंसाप्रवृत्त असेच लोक नव्हेत तर प्रसंगी दिसण्यांत उग्र, अमुक एका रस्त्याने चाललेले, खून घडलेल्या ठिकाणच्या आस-पास राहणारे, हेवादावा किंवा चहाडीस बळी पडलेले, दंग्याशीं संबंध नसणारे देखील सांपडतात. त्यामुळें प्रजेंत दैववादाचा प्रचार

होतो, कशाचाही नेम नाहीं या जाणीवेनें एक प्रकारचें उच्च औदासीन्य जनतेच्या अंगीं बाणतें, वाईटाबरोबरच चांगल्यालाही झळ लावणाऱ्या विधिघटनेची चुणुक मिळून त्या दयाघन प्रभूच्या अतर्क्य लीलेचा विचार करण्यांत मन गुंग होतें. मनुष्य परमार्था-कडे झुकतो, अध्यात्माचा विचार करूं लागतो, नैतिक पातळी वाढते आणि भौतिक जाडी कमी होतें. धरपकडीच्या धास्तीनें हें होतें आणि धरपकड दंग्यामुळें होते, तेव्हां या सर्व सुधारणांचे श्रेय दंग्यालाच मिळतें.

'सर्वसाधारण जनतेला सूचना' या दंगानिवारक उपायाखालीं 'रस्त्यांतून हिंडू नका' 'जमाव करूं नका' 'गुंडांना पकडून द्या' 'निर्भय व्हा' 'संघटित व्हा' 'अफवा पसरवूं नका' इत्यादि सूत्रांचा समावेश होतो. त्यांचा परिणाम दंगा थांबण्याच्या कारणीं किती होतो हा प्रश्न जरी बाजूला ठेवला तरी, तीं चाळीचाळींतून आणि वर्तमानपत्रांतून चर्चेला आणि टीकेला विषय म्हणून उपयोगी पडतात व रयतेच्या मनांत दंग्याची जाणीव सदैव ताजी ठेवतात हें लक्षांत घेण्यासारखें आहे. या सूचनांबरोबरच सरकारी रीतीनें दंग्याच्या ज्या बातम्या देण्यांत येतात त्यांचाही विचार करणें युक्त आहे. दंगा कोणाकोणाच्या दरम्यान झाला, कोणत्या कारणावरून झाला, नक्की कसा झाला, बरोबर कोणत्या ठिकाणीं झाला, कोणत्या पक्षाचे किती मेले आणि जखमी झाले अशा गोष्टींचा तपशील अगदी गुप्त ठेवण्याचें सरकारचें धोरण आहे. 'सुमारें गेल्या आठवड्यांत दोन जमातीच्यामध्यें कांही मतभेदावरून, तीक्ष्ण व बोथट हत्यारांचा उपयोग होऊन, शहराच्या ईशान्य व नैऋत्य भागाच्या दरम्यान दंगा होऊन दोन्ही पक्षांचे मिळून वीस ते चाळीस मेले व लोकसंख्येच्या एक शतसहस्रांश प्रमाणांत जखमी झाले' इतपत स्पष्टपणे दंग्याच्या बातम्या अजून मिळतात. दोन पक्ष म्हणजे पारशी – यहुदी, वैष्णव – शैव, देशस्थ – कोंकणस्थ, ओस्वाल – आगरवाल, शिया – सुनी, काळे – गोरे, उंच – बुटके, कांहींही समजावें. तशाच कल्पना हत्यारें, स्थळ, इत्यादि तपशिला-बद्दल करण्यास जनतेस मुभा आहे. अजून शहरांचीं नांवें देण्याचें

धाडस सरकार कसें करीत आहे हें मात्र आश्चर्य आहे. तीहीं लोकांच्या कल्पनाशक्तीवर सोंपवण्यास वास्तविक हरकत नाहीं. अशा सरकारी बातम्यांनी व सूचनांनीं लोकांच्या तर्कशक्तीला चालना मिळते; स्थल, काल व व्यक्ति यांचा भरंवसा राहात नाहीं, शत्रु कोण व मित्र कोण हें समजत नाहीं व एकंदर अनिश्चित वातावरण निर्माण होऊन प्रत्येक नागरिक दक्ष, वाटेल त्या प्रसंगाला तयार आणि कशावरही विश्वास न ठेवणारा बनतो, हाही दंग्या-पासून मिळणारा एक महत्त्वाचा फायदा आहे.

येथपावेतों आपण कर्फ्यू ऑर्डर अथवा मुदतीची नाकेबंदी या दंगाशामक उपायापर्यंत येऊन ठेपलों. तज्ञांच्या मतें नागरिकांचें 'मोराल' अथवा हिंमत वाढविण्यापेक्षांही कर्फ्यूचा उपयोग 'मोरॅलिटी' किंवा नीति वाढविण्याकडे अधिक होतो. कित्येक आग्रही नीतिबाजांचें म्हणणें तर अंधाराच्या काळापुरती शहरांतून कायमची कर्फ्यु ठेवावी असें आहे.

नागरिक स्वातंत्र्याची गळचेपी म्हणून कर्फ्यू कोणाला अप्रिय वाटो, पण तिच्या योजनेनें समाजशत्रु गुंडांचाच नव्हे पण स्वतःचे -च शत्रु असे गुंड त्यांचाही बंदोबस्त होतो हें कर्फ्यूचे सुपरिणाम उघड सांगत आहेत. शहरांतील गुंडांच्या हालचालीखेरीज ज्या घडामोडी दिवेलागणीला सुरू होतात त्यांना कर्फ्यूमुळें आळा बसतो. दिव्यांच्या झगझगाटांत ज्या चैनीच्या वस्तूंची विक्री होते ती बंद पडून इच्छुक ग्राहकांचे पैसे आपोआप वाचतात. नाटकें, सिनेमा, तमाशे इत्यादि करमणुकींचे फड थंड पडून तेथें होणाऱ्या द्रव्याचा आणि पावित्र्याचा व्यय थांबतो. दारूचे गुत्ते, जुगाराचे अड्डे व वेश्यांच्या माड्या येथील शक्य खर्चाची बचत होते. पर्यायानें वीज, गॅस, घासलेट, पाणी, रस्ते, वाहनें वगैरे सार्वजनिक उपयोगाच्या गोष्टींचा वापर कमीं होऊन एकंदर शहराचा फायदा होतो. ओढाळ लोक सक्तीने घरीं बसले म्हणजे संसार सुखी होतात, घरें भरतात, कुटुंबसंस्थेला तेजी येते व सार्वत्रिक शांततेची प्रवृत्ती वाढते. यावर कोणी असा आक्षेप घेतील कीं करील उपद्व्याप दिवसा होणार नाहींत काय? किंबहुना कर्फ्यू सुरू झाल्यावर

रात्रीचे व्यापार दिवसाउजेडीच्या कार्यक्रमांत जुळवून घेण्यास शहरी शोकिनांनीं विलंब लावला नाहीं अशी उदाहरणेंही दाखविण्यांत येतात. पण त्या व्यर्थ खटपटी होत. काळोखाच्या पडद्यावर ज्या रंगांना खुलावट येते ते सूर्यप्रकाशांत फिक्के ठरतात हें उघड आहे. रात्रिजीवनांत परमार्थ मानणारे निशाचर दिवसा रंगांत येणें दुरापास्त. तेव्हा कर्फ्यूच्या नीतिस्थापक कार्याला दिवसाची रात्र करूं पहाणारांकडून बाध येणें अशक्य. म्हणूनच कर्फ्यूद्वारां नीति प्रसार हा दंग्याचा सर्व श्रेष्ठ फायदा ठरतो.

दंगे आणि त्यांजवरील इलाज यांतून उद्भवणाऱ्या नुकसान, त्रास, गैरसोई, धोका इत्यादि आपत्तींबरोबरच कित्येक चांगल्या गोष्टीही कशा सांपडतात हें आतां वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. पण दंगे ( व उपाय ) या इष्टापत्ती नव्हेत हेंही त्यांनी लक्षांत ठेवलें पाहिजे. महापुरांत लव्हाळे वांचतात खरीं, पण झाडें जातात हें नुकसान राहतेंच. वाईटांतून चांगलें निघतें, पण तें कधीं कधीं. हें ध्यानांत धरून दंग्यापासून निष्पन्न होणाऱ्या उपयुक्त मुद्यांचें रसग्रहण करतांना दंग्यांचा निषेध, व उपायांची तारीफ करण्याची वाचकांनी खबरदारी घ्यावी. वैचारिक दृष्टीनें तें योग्य ठरेल इतकेंच नव्हे तर पोलिसांच्या दृष्टीनेंही.



## गप्पीदास

मुंबईचा एक मनुष्य दूरदूरच्या देशांचा प्रवास करून परत आला आणि 'अमक्या देशांत मी यंव केलें, तमक्या देशांत त्यंव केलें' अशा भरमसाट बाता मारूं लागला. तेव्हां ऐकणारांपैकी एकानें त्याला सांगितलें, 'भल्या गृहस्था, तूं कुठल्याहि देशांत काही केलें असशील; पण थापा मारण्यास मात्र गडया, त्वां चुकीचें शहर निवडलेंस. कारण आमच्या या मुंबई शहरांत साऱ्या दुनियेंतील पहिल्या नंबरचा थापेबाज आहे हें तुला माहीत नाहींसें दिसतें.'

तात्पर्य : ऐट दाखवायची तो चढाओढ नसेल अशा ठिकाणींच दाखविलेली बरी.

: ६ :

## डॉ. माळशिरस यांच्यावरील प्रसंग

आज खांद्यावर तीन फुल्या मारलेल्या लढाऊ पोषाकांत डॉ. माळशिरस यांना पाहून ते पूर्वी कसे दिसत असतील याची कल्पना कोणाला कधीच आली नसती. काल ते नानाच्या पेठेंतले बुलाखचंद मारवाड्याच्या अर्ध्या दुकानांतल्या दवाखान्याचे लोकप्रिय मालक भाऊराव माळशिरस उर्फ भाऊ डॉक्टर होते. परवां ते ' दवाखाना बंद करून राउळपिंपळगांवी आपल्या शेतीवर जाऊन रहावें नी गोरगरिबांना त्यांच्या सोयीने औषधपाणी द्यावें कीं काय ? ' हा विचार करीत होते. तरवां ते दवाखान्यांत शर्ट काढून टाकून जमिनीवर बैठक टाकून चार रिकामटेकड्या मित्रांबरोबर बिझिक खेळत होते— आणि दर अवस्थेंत ते अगदी वेगळे दिसत होते.

भाऊरावांची डॉक्टरी हें एक ' मटीरिया मेडिका ' एवढें मोठें आणि ' ग्रेज ॲनोटॉमी ' एवढें सुरस प्रकरण होईल. एखाद्या साहित्यपुरवठा कारखान्याच्या जास्तींत जास्त कागद खपविणाऱ्या मासिकांत भाऊरावांचें उद्बोधक चरित्र शोभण्यासारखें होतें. " कंपाउंडरचा कॅप्टन कसा झाला ! " या परिणामकारक मथळ्याखालीं भाऊरावांचा एखादा उदात्त फोटो दिसणें अगदीं शक्य

होतें. आमचे मित्र कवि निश्वास ( उर्फ गोपू सोनटक्के ) यांनीं एकदा ' सोनगावकर ' मासिकांत तसें चरित्र छापून आणण्याची कामगिरी देखील अंगावर घेतली होती. पण त्यासाठी होणारा पांच रुपये खर्च भाऊडॉक्टरनी मंजूर न केल्यामुळे ती मोहीम तशीच राहिली. भाऊराव तेव्हां म्हणाले, " नानापेठेतील माझ्या पेशंटांत तें मासिक कोण वाचणार ? माझी गिऱ्हाईकी सारी मारवाडी परदेशी, नी कलाल दलाल असल्या लोकांत त्यापेक्षा पांच रुपयांत पांचशे हॅन्डबिल काढून भोंवताली घरोघर वाटलीं तर पांच रुपयाची केस तरी येईल. "

भाऊडॉक्टर पक्का व्यवहारी. पहिल्यापासून हिशेबी व धोरणी. त्याचप्रमाणे बीमा गेल्या महायुद्धानंतर तो डॉक्टरीच्या मार्गाला लागला, पण त्याच्या तपश्चर्येला फळ येण्यास दुसरे महायुद्ध व्हावें लागलें. भाऊराव माळशिरस आजकाल जरी आपल्या नांवामागे ' डॉ. ' व नांवापुढें एल्. जी. पी. ' ( लायसेन्सड् जनरल प्रॅक्टीशनर ) हे किताब लावीत असले तरी जवळ जवळ वीस वर्षापूर्वी त्यांनीं आपल्या संस्मरणीय कारकीर्दीला सुरुवात केली होती. भाऊरावांचें गांव मोंगलाईत कोठें तरी असल्याचे फार खोदून विचारणारास ते सांगत. ते स्वतःबद्दल फारसे कधी बोलत नसत. त्यांच्याबद्दलची जुनी माहिती झालीच तर अगदी जवळच्या मित्रांना, आणि ती देखील भाऊडॉक्टर आपल्या गाफील क्षणी कधी बोलून गेले तर. भाऊरावांच्या पूर्वचरित्राबद्दल अशी सर्व–साधारण माहिती मिळते की, त्यांचा कल लहानपणीच दवापाण्याकडे असल्यानें ते मॅट्रिकला पोहोचण्याच्या आधीच कोठल्यातरी निजामी इस्पितळांत ड्रेसर म्हणून राहिले. लवकरच आपल्या अंगच्या चिकाटी, उत्साह, दीर्घोद्योग वगैरे गुणांच्या बळावर ते मद्रास इलाख्यांतील एका तालुका डिस्पेन्सरीत ' स्टोअर बॉय ' या पदावर शोभू लागले. त्यांनंतर मद्रासच्या एका इस्पितळांत ते पुरुष नर्स होते ही आश्चर्यकारक माहिती तर त्यांनीं स्वतःच एकदा खुशीत आले असतांना सांगितली होती असें कळतें कीं, या जागेवर असतानांच त्यांच्या मनांत पदवीविषयी कल्पना घोळू

लागली. थोड्याच दिवसांत विंध्य सातपुड्याकडील कुठल्याशा संस्थानांत 'हॉस्पिटल असिस्टंट' होण्याच्या इयत्तेंत ते दाखल झाले व या काळांत आपल्या नांवापुढें आय्. एम्. डी. हीं अक्षरें बेधडक ठोकून देण्यास ते कचरले नाहीत. या सुमारास त्यांचा वऱ्हाडांतील एका गांवी जम बसण्याचा चांगला संभव होता, पण तिथल्या एका दुष्ट पोलीस अधिकाऱ्यानें त्यांच्या डिग्र्यांविषयीं रिकामटेकड्या चौकशा सुरू केल्या. त्या वेळी भाऊरावांनीं दडपे-गिरीही जरा जादाच केली होती : 'आय्. एम्. डी. (निजाम)' 'एस्. एम्. ओ. ( स्टेट मेडिकल ऑफीसर ) जाळी स्टेट, एफ्. सी. डी. ए. (फर्स्टक्लास ड्रेसिंग असिस्टन्ट) मद्रास. या डिग्र्यांवर संतुष्ट न राहतां त्यांनी 'बी. पी. एन् ए. (ऑन)' ही अक्षरेंही जेव्हां आपल्या पाटीवर बेछूटपणें लिहिली, तेव्हां गांवांतल्या साळूबाई नर्सला राग येऊन तिनें आपला राग गांवच्या फौजदारा-वर काढला, आणि त्या चिडीवर फौजदारानें येऊन 'पाटीवरच्या साऱ्या डिग्र्यांवर डांबर फासा नाहीं तर खटला भरतों' असा भाऊडॉक्टरला दम भरला. बिचाऱ्या भाऊरावांना निमूटपणें प्रॅक्टीस गुंडाळून एकाद्या बऱ्याच दूरच्या गांवी जाणें जरूर पडलें.

असें ते पुणें शहरीं आले. हें महायुद्ध सुरू होण्याच्या सुमरास भाऊडॉक्टर नाना पेठेंत नुकता कोठें जम बसवूं लागले होते. त्या आधीची तीनचार वर्षें त्यांना बरीच कष्टाची काढावीं लागलीं. गांवीं जाऊन बसावेंसें वाटणें व दवाखान्यांत पत्ते खेळणें असल्या प्रकारापर्यंत युद्धपूर्व मंदाईच्या काळांत दिवस आले होते. पण अखेर जवळ जवळ वीस पंचवीस वर्षें त्यांच्या पासून दूर राहिलेल्या नशिबाला त्यांची दया आली. नानापेठेंत उघडलेल्या दवाखान्यांत शक्यतर बायाबापड्या व पोरेंसोरें ह्यांच्या पुरतेच आपले उपचार मर्यादित ठेवून डॉक्टरी करण्याची युक्ति त्यांनी सुरुवातीपासून काढल्यामुळें (व औषधाचे दरही अगदींच माफक ठेवण्याची खबर-दारी घेतल्यामुळें) भाऊडॉक्टर नाना पेठेंत आस्ते आस्ते कायम झाले.

हिटलरनें पोलंडवर हल्ला केल्यापासून भाऊ डॉक्टरांच्या प्रॅक्टीसमध्ये जी धुगधुगी येऊं लागली तिचें रूपांतर जपाननें

पर्लहार्बरवर हल्ला करण्याच्या सुमारास हुषारींत झालें. आतां दोस्त राष्ट्रांच्या सरशीच्या सुमारास ती प्रॅक्टीस चांगलीच नांवारूपाला आलेली होती. हें होण्यास परिस्थितिही अनुकूल होती. काळजी करण्यासारख्या आजाराला आसपासचे लोक मोठ्या डॉक्टरकडे जात असत, खास रोगांसाठीं खास तज्ञांचा सल्ला घेत असत; पण मामुली रोग—आणि त्यांतून बायाबापड्या व पोरेंसोरें यांचे—यासाठीं मोठे डॉक्टर नी इस्पितळें शोधण्याच्या भानगडींत पडणारे लोक भोंवतालच्या नाना पेठेंतले नव्हते. 'सरसकट डॉक्टर' या दृष्टीनें भाऊराव माळशिरस त्या सर्व मोहल्यांत नुसते पसंतच नव्हेत तर लोकप्रियही होते. तशांत ओषधाची किंमत चार आणे व व्हिजीट फी एक रुपया या मर्यादेच्या आंत आपले दर ठेवण्याची सावधगिरीही त्यांनी बाळगल्यामुळें त्यांच्या लोकप्रियतेला कांही बाध येण्याचीही भीति नव्हती. आतां तर लढाई सुरू झाल्यापासून पुणें शहरांत नोकरीवाल्या लोकांची गर्दी होऊं लागलेली, आणि मंगल कार्यांना तेजी आल्यामुळें असंख्य नवे संसार चालू झालेले, या बाजाराच्या परिस्थितीनं भाऊरावांच्या केसिसमध्यें हळूहळू बाळंतपणाच्या संख्येचें प्रमाण वाढत जाणें व कळत न कळत डॉक्टर भाऊराव 'प्रसूति तज्ञ' म्हणून ( निदान नानांच्या पेठेंत तरी ) विख्यात होणें हें अपरिहार्यच झालें. लौकरच दवाखान्यामागल्या अंधाऱ्या खोलीत दोन खाटा टाकून त्यांनीं एक तात्पुरता 'वॉर्ड' ही उभा केला आणि त्यांचा घर-मालक बुलाखचंद मारवाडी त्यांच्या दवाखान्याला मोठ्या बहु-मानपूर्वक 'बाळंतपणाचा कारखाना' असें संबोधू लागला. त्या मुळेंच एकुणचाळीस साली चिल्लर नाणी नव्या ओळखीच्या लाजरेपणानें हाताळणाऱ्या भाऊडॉक्टरांना दोन तीन वर्षांनीं रुपयाच्या नोटा चिटोऱ्यासारख्या वापरण्यास मोठीशी दिक्कत वाटेनाशी झाली. सबर्बन सेव्हींग बॅंकेंत त्यांची थोडीशी शिल्लक राहिली, व "आता लग्नाचें पाहिलें पाहिजे" असा गावाहून कुठल्या तरी चुलतीचा आग्रह चालू असल्याचें ते कांही निवडक स्नेही-मंडळींत उगीचच सांगत सुटले—पण व्यर्थ ! मुली सांगून येण्याच्या

बाबतीतच तेवढं भाऊरावांचें नशीब पाठ फिरवून बसलें होतें.

आणि पर्यायानें मुली, लग्न, स्त्रिया, अशा कारणांनीच भाऊ-रावांच्या खांद्यावर आज तीन फुल्या दिसत होत्या. या फुल्या प्रॅक्टीसचा जोहार करून लढाईवर निघालेल्या बेछूट वीराच्या केशरियाची ग्वाही देत होत्या. या तीन फुल्या सांगत होत्या कीं आज ब्रह्मचारी डॉक्टरानें चालविलेल्या बाळनपणाच्या दवाखान्याला टाळें लागणार, बिनससारी माणसाने विकलेले दोन आण्याचे डोज आणि दोन पैशांच्या पुड्या आज बद पडणार; मालकाचे लग्न होत नाहीं म्हणून आज बुलाखचंद मारवाड्याच्या अर्ध्या दुकानांतील किफायत-शीर व्यवहार तहकूब करण्यांत येणार; आज एक 'बिनबायको' इसम बायकापोरांच्या तक्रारींमधून मुक्त होऊन एक बिनबारशी डॉक्टर म्हणून मर्दानी दुखापतींकडे वळणार. भाऊराव माळशिरस यांच्या चोरट्या आशांच्या तीन समाधिशिलाच जणुं काय आज त्यांच्या खांद्यावर ओळीनें बसल्या होत्या. निष्ठुर नशिबाने जणुं क्रूर विनोद-बुद्धीनें भाऊरावांच्या उत्साहावर त्या तीन फुल्यांचा बिब्बाच घातला होता ! कारण तीन फुल्यांचा पोषाक हा दिसायला जरी वीराचा असला, तरी भाऊरावांनी तो स्वीकारला होता संन्याशाची छाटी म्हणूनच. गेले काही दिवस स्वतःचें जीवन समूळ बदलून टाकावें असें वाटू लागण्याइतक्या या मनःस्थितीला येऊन पोहोंचण्याचें कारण एक तर त्यांना कप्तानीचें कमिशन घरी चालून आलें होतें ( आणि तेंही त्याच्या डिग्र्यांची फार चिकित्सा न करतां ), आणि दुसरें म्हणजे आजपर्यंत भाऊरावांना पाहणाऱ्या लोकांना अशक्य वाटणारी गोष्ट—भाऊराव प्रेमभग्न झाले होते ! वास्तविक याबद्दल भाऊरावाच्या मित्रांना विशेष आश्चर्य वाटण्याचें कारण नव्हतें; कारण व्यवहार अन् प्रेम या गोष्टी दिसायला जरी सर्वस्वी परस्परविरोधी दिसल्या तरी प्रत्यक्ष आयुष्यांत त्यांचा समन्वय कित्येकांनीं समजूतदारपणानें आणि मुत्सद्देगिरीनें केल्याचें आपणास दिसून येतेंच. भाऊराव जरी व्यवहारी असले तरी त्यांच्या व्यवहाराच्या वहींत प्रेमाचेंही एक खातें होतें; त्यांचा प्रेमभंग झाला तेव्हां निराशेनें त्यांचें हृदय थोडेसें विदीर्ण झालेंच,

पण व्यवहार फसला म्हणून त्यांच्या हिशेबी डोक्यालाच जास्त त्रास झाला त्या प्रेमभंगाच्या इरेस पेटूनच आज भाऊडॉक्टर लढाऊ लिबासांत उभा राहिला होता. कारण वरीं चालून जरी कप्तानी आली तरी एरवी डॉ. माळशिरस यांनी अर्जुनाकडे आलेल्या ऊर्वशीसारखी ती परत पाठवली असती. त्यांचा चालू धंदा जास्त किफायतशीर व ( मुख्य म्हणजे ) बिनधोक होता त्यांनी कप्तानीला कबूली दिली याला नाजुक कारण असे होतें की उर्वशीकडेच अर्जुनानें याचना करायला जावे आणि त्यामुळें तिला वाजवीपेक्षां फाजील भाव येऊन त्याला नीतिपाठ ऐकवून तिनेंच परत घालवावें, असें कांहींसे भाऊरावांना ( दुसरीकडे एकें ठिकाणी) घडलें होतें : शालिनीबाई पपनीस नामक एका 'मेट्रन' किंवा वरिष्ठ दर्जाच्या नर्सने भाऊरावांच्या प्रेमयाचनेचा धिःकार केला होता– आणि त्या अटीनटीच्या भरांत भाऊडॉक्टरनें ही कप्तानी कवटाळली होती !

शालिनीबाई पपनीस ही स्त्री दुसरीतिसरी कोणी नसून जिनें मागें एकदां त्या कुठल्याश्या गांवी फौजदाराकडे कागाळी नेऊन भाऊडॉक्टरला गाव सोडण्यास लावले ती साळूबाई नर्सच होती. दरम्यानच्या कांही वर्षांत तिनेंही आपली उन्नति करवून घेतली होती. आज ती पुण्यांतल्या एका मिशनच्या इस्पितळांत मुख्य नर्स, मेट्रन किंवा नर्सबायाची 'दादा' होती. तिला पावणेदोनशें कां कांहीतरी पगार होता, इतकेंच नव्हे तर सिटी बँकेंत तिचे चौदा हजार रुपये होते. (अशी विश्वासपात्र बातमी भाऊडॉक्टरनें काढली होती) , त्याशिवाय हातात सोन्याच्या बांगडया, गळयांत सर, कानांतली कुडी वगैरे हजार पाचशेंचा ऐवज अंगावर होता तो वेगळाच. हे झालें व्यवहारासंबंधीं. या वरील गुणांखेरीज शालिनीबाईची वागणूक शिष्टपणाची व राहणी टापटीपीची होती. मोठमोठया डॉक्टर लोकांत त्या वजन ठेऊन असल्याचे ऐकिवांत होतें. आजच्या मिशन हॉस्पिटलच्या मेट्रन शालिनीबाई पपनीस, बी. पी. एन्. ए., या कांही वर्षांपूर्वीच्या गांवढया गांवातल्या उनाड सुईण साळूबाई, ही गोष्ट एक डॉक्टर माळशिरस यांनाच ठाऊक

होती. बाकीच्यांना ती एरवी खरी वाटणेंदेखील कठीण होतें.

सरळ मार्गानें लग्नानिमित्त मुली सांगून येत नाहीत हें जेव्हां भाऊरावांच्या लक्षांत आलें तेव्हां त्यांनी मनांतल्या मनांत प्रेमाच्या क्षेत्रांत टेहळणी करण्यास सुरवात केली. प्रेम कोठें बसवावें या विचारांत ते असतांना एक दिवस एक अडलेली केस इस्पितळांस पोहोंचविण्याचा प्रसंग त्यांच्यावर आला व त्यांनी शालिनीबाईस पाहिलें. थोड्याच दिवसांत बाईची अर्थिक परिस्थिती, राहणी, घरचीं माणसें वगैरें गोष्टींबद्दल माहिती काढून डॉक्टरसाहेबांनीं मेट्रनबाईवर प्रथमदर्शनी प्रेम करण्याची योजना निश्चित केली. तिऱ्हाइताला ही घटना रोमांचकारी वाटणार नाही; चळीशीच्या घरांत गेलेल्या स्थूल, काळ्यानिब्बर, गबाळ, पांढऱ्या केसाच्या एका सायकलस्वार डॉक्टरनें स्वत:पेक्षांही दोनतीन वर्षे वडिलच अशा किडकिडीत, कठोर, करड्या आंवाजाच्या, चष्मा लावणाऱ्या बाईवर योजनाबद्ध प्रेम करावें ही कल्पना काव्यांत कदाचित खपणार नाहीं, परंतु वैचारिक निकषावर ती नि:संशय पुरोगामी होती असें कुठल्याही जडवादी पंडितानें डॉक्टरना आश्वासन दिले असतें. पण आपली योजना कोणाला कशी दिसेल याची क्षिती भाऊडॉक्टरांनी पाळली नाही. शालिनीबाईशी लग्न केल्यास आजचा दोन खाटाचा बाळंतखाना वीस बेडस्‌ची सोय करणाऱ्या मॅटर्निटी हॉस्पिटलमध्यें परिणत होईल, या सुखस्वप्नांत बाईचें वय, रूप, गुण वगैरे फालतू गोष्टीचा विचार करण्यास त्यांना वेळ नव्हता. स्वत:च्या लायकीबद्दल शंका काढायलाही त्यांना उसंत नव्हती. उलटपक्षी बाईच्या या असल्या वयांत व परिस्थितीत आपण त्यांना सौभाग्य धारण करण्याचा ' चान्स ' देतों आहोंत असा भाऊरावांनी आपला समज करून घेतला होता. त्यामुळे त्या आपली मागणी नाकारतील ही शक्यता त्यांच्या स्वप्नातही नव्हती, आणि त्यामुळें शालिनीबाईच्या नकारानें डॉक्टरमजकुराना धक्का बसला, नी निराशेच्या आवेशांत त्यांनी तीन फुल्यांची कप्तानी घ्यायचें ठरविले !

ही कप्तानी त्यांच्यापर्यंत कशी चालत आली हें पाहणें मनोरंजक

होईल. युद्धपरिस्थितीचा तो एक परिणाम असें माहितगार लोक सांगतात. असें झालें म्हणतात, की युद्धाच्या पहिल्या वर्षांत सर्व तरुण व बेकार डॉक्टर कमिशन घेऊन गेले. त्यानंतर हळूहळू प्रॅक्टिसला कंटाळलेले, प्रवासाची हौस असलेले, संसारापासून सुटका मिळवू पहाणारे, आणि इतर अनेक हेतूंनी प्रेरित झालेले तरुण, वयस्क व म्हातारे डॉक्टर युद्धक्षेत्राकडे लोटू लागले. प्रथम शस्त्रवैद्य गेले, त्यांच्या पाठोपाठ गुंगीचें औषध देणारे धावले, त्यानंतर स्पेशालिस्ट किंवा 'विशिष्ट निष्णात' चालू लागले. लौकरच सर्वसाधारण आरोग्यविषयक कामें करणारांनीही डॉक्टरी कमिशनचा बिल्लापट्टा अंगावर चढवला. कांही स्त्रियाही अंमलदार झाल्या. फार काय काल परवां तंबाखूच्या पिचकाऱ्या मारीत बसलेले गांवठी दंतवैद्यदेखील कप्तान झाले. मग चोळणारे, हाडें बसवून देणारे, पायांतील कांटा काढणारे, कुरूप कापणारे आणि तुबड्या लावणारे देखील "आतां आपणास निदान 'वड्या लाटाची' कमिशनें मिळण्यास हरकत नाही" असें आपआपसांत बोलू लागल्यास नवल काय? होतां होतां अखेर केवळ 'स्त्री बाळरोगचिकित्सक' असे डॉक्टरच तेवढे मुलकी जीवनांत शिल्लक राहिले. अशांचा उपयोग आघाडीवर सर्वसाधारणपणे होण्यासारखा नाहीं. अशा भोळ्या भावानें लोक निर्धास्त राहिले होते, पण पहावें तो हळूहळू डॉक्टराच्या टंचाईमुळें या बायकापोरांच्या डॉक्टरनाही लढाईवर बोलावणें येते कीं काय असें वाटण्याजोगती परिस्थिती निर्माण झाली. कारण एक दिवस आमचे डॉक्टर भाऊराव माळशिरस यांना देखील लष्करखात्याची तीन फुल्यांची सरदारी सांगून आली!

कित्येकांच्या मतें 'डॉक्टर' म्हणवून घेणाऱ्या कुठल्याही इसमास सरकार मलमपट्टीखात्यांत दाखल करून घेण्यास तयार होण्याइतका बांका वख्त गुदरल्याकारणानें आमच्या भाऊरावांना ही संधि मिळाली, व तशांतून ते चांगले प्रतिष्ठित, वजनदार आणि अनुभवी दिसत असल्यामुळें त्यांच्या वडिलकीला मान देऊन सरकारनें त्यांना लेफ्टनंट वगैरे इयत्ता गाळून एकदम कप्ता

नीच देऊं केली. बुलाखचंद मारवाड्याचें म्हणणें होतें की कमिशन देणाऱ्या साहेबाच्या अडलेल्या मडमेस सुखरूपपणें सोडविल्या-बद्दल साहेबानें खूष होवून ही गोळीखाऊ अमलदारी भाऊडॉक्ट-रास देऊं केली. कुणी म्हणत खाणींत काम करण्यास पाठविलेल्या मजूर स्त्रियांप्रमाणेंच लढाईवरच्या विगार कामासाठीं वायकांची भरती झाली व त्यासाठी सरकारनें आमच्या भाऊरावांसारखे 'सुईण' डॉक्टर गोळा करण्यास सुरवात केली. चरित्र लिहिण्यास न मिळाल्यामळें कष्ट झालेला गोपू सोनटक्के तर म्हणाला की "कसलं आल आहे कमिशन ? भाऊराव म्हणजे कांहीं छोट्या डॉक्टराकडून बड्या डॉक्टरकडे गेलेली एकादी गबर केस नव्हे की जिच्यावर भाऊरावांना कमिशन मिळावें. कांहीं नाहीं, जुन्या बाजारांतून बस कडक्टरचा पोषाक आणला नी साहेबाला जाऊन सलाम केला, हें यांचं कमिशन, आणि असले हे कप्तान !"

खरी गोष्ट अशी होती की वर्षा– दीड वर्षापूर्वीच डॉ. माळशिरस लोहगांवच्या एका लष्करी इस्पितळांत अर्धा दिवस कामावर राहून प्रॅक्टीसच्या उत्पन्नाला पुस्ती देऊं लागले होते. तेथें असतांना भाऊ रावाची एकंदर सफाई व गरिबीची वागणूक तेथील मुख्य साहेब डॉक्टराच्या डोळ्यांत इतकी भरली कीं तो डॉक्टरांना कमिशन-साठीं अर्ज कर म्हणून सारखा आग्रह करूं लागला. हो ना करतां करतां एक दिवस भाऊरावांना सांगणें भाग पडलें की आपणास कोणतीही शहाजोग डिग्री नाहीं. त्यावर त्या डॉक्टरानें सांगितलें कीं त्याबद्दल काळजी करूं नकोस. नुसता अर्ज कर; मी तुझी शिफारस करतो. त्यावरून भाऊरावांनी केवळ त्यांच्या नादासाठी अर्ज केला आणि त्याबद्दल ते सर्व विसरूनही गेले.

नंतर प्रेमाच्या खात्याकडे त्यांनी आपलें सर्व लक्ष वळवल्यामुळे त्यांनीं लष्करी नोकरीसाठीं केलेल्या अर्जाच्या बाबतींत पुन्हा विचारही केला नाहीं. शालिनीबाईंच्या पुढें आपले म्हणणें कसें मांडायचें हे त्यांनीं प्रथम विचारपूर्वक ठरविलें. आणि एक दिवस त्यांना घरीं राहण्याबद्दल अगाऊ निरोप पाठवून ते नीटनेटका पोषाक करून त्यांना भेटावयास गेले. शालिनीबाईंनी निर्विकार

द्रेनें त्यांचें स्वागत करून त्यांना खुर्ची दिली आणि त्यांच्याकडे श्नार्थक चेहरा करून पहात त्या उभ्या राहिल्या. भाऊरावांनीं थम आजूबाजूस पाहून आपलें बोलणें कुणास एकू जाणार नाहीं शी खात्री करून घेतली, आणि घसा साफ करून त्यांनीं बोलण्यास रुवात केली. सतरंजीवरच्या एका ठिपक्याकडे लक्षपूर्वक पहात म्हणाले,

" शालिनीबाई, आज मी जें तुमच्याशीं बोलणार आहे, तें कून तुम्हाला आश्चर्य वाटेल, कदाचित् राग देखील येईल. ास्तविक राग किंवा अढी मी धरायला पाहिजे, कारण कांहीं र्षापूर्वी चिल्हारा गांवीं ज्या माणसाबद्दल कागाळी करून तुम्हीं ाला धंदा बंद करून गावांतून उठून जाण्यास लावलात तोच मी ाळशिरस डॉक्टर. "

"मी तुम्हाला ओळखलं आहे" शालिनीबाई म्हणाल्या, " आणि र त्यावेळीं तुम्ही डॉक्टरीबरोबर नर्सपणाचीही हांव धरली सतीत, जर बी. पी. एन्. ए. ही आमच्यासारख्यांच्या हक्काची ग्री तुम्ही स्वतः पुरुष व डॉक्टर असतांनादेखील वापरली नस- ोत, तर मला तुमच्याविरुद्ध तक्रार करण्याचें काहींच कारण व्हतें. "

" मी तुम्हाला जाणूनबुजून अन्याय केला नाही. उलट तुमच्या ाबतीत मी तर...तो फौजदारच तेथें असल्यामुळं इलाज नव्हता. ाहीं तरी त्यावेळेपासूनच मला तुमच्याबद्दल- जाऊं द्या. मुख्य ्दा हा की जरी मला बी. पी. एन्. ए. ही डिग्री नसली तरी नर्स- णावर माझा हक्क नाही असें नाही. मीही नर्स होतों—"

" काय ? "

" होय, नर्सिंगचे शिक्षण मी अनुभवानें घेतलें आहे. मद्रासच्या ॉस्पिटलांत मीं नर्स म्हणून काम केलें आहे- मेल नर्स. असो मागचं ालं तें जाऊं द्या. माझं म्हणणं एवढेच की जरी अढी धरण्यास ारण असलं, तरी मीं तरी झाल गेलं सर्व विसरून आज तुमच्या डे आलों आहें. डॉक्टरनें नर्सकडे जावं या गोष्टींत कांहीं विशेष सेल, पण मी तुमच्याकडे आलों आहे यांत मात्र विशेष आहे.

एकतर तुम्हीं नर्स नाहींत—मेट्रन अहांत, आणि दुसरें मी डॉक्टर नसून आज पेशण्ट आहे असें ह्या वेळेला समजा ! एकदां माझ्या डॉक्टरीचा मांड मोडून टाकण्यास तुम्हीं कारण झालांत— आज दुसराच एक डाव मांडण्यासाठीं मीं तुम्हाला विचारायला आलों आहे—'

" थांबा ! तुम्हीं काय बोलतां आहांत हें मला कळतच नाहीं कांहीं —"

" मीं अजून बोललों नाहीं, नुसती सुरुवात केली आहे. गेलीं कित्येक वर्षे तुमची आठवण माझ्या मनांतून नाहींशी होणें अशक्य झालं आहे. पुण्याला आल्यानंतर तुम्हाला पाहिल्यावर तर माझी स्थिती काय झाली हें मला सांगता येत नाहीं. शालिनीबाई, मी एक साधाभोळा डॉक्टर—"

" काय ? "

" बरं तुमची मर्जी नसेल तर मला डॉक्टरही म्हणू नका. नर्स म्हणण्यासही तुम्ही तयार नाहीन. वाटलं तर कंपौंडर म्हणा, ड्रेसर म्हणा——"

" पण कां ? "

" पण माझ्या धंद्याला कोणतेंही नांव असलें तरी मनुष्य आहे ही गोष्ट खात्रीनें नाकबूल करतां येणार नाहीं. आणि मी मनुष्य असल्यामुळें मला मन आहे, आणि त्या मनांत, शालिनीबाई ! तुम्ही घोळू लागलांत तर तो माझा दोष नाहीं. (आणि तितक्यांत डॉक्टरांना नाटकांतील एक उत्तम वाक्य आठवलें) दोष त्या भगवान् कामदेवाचा आहे "

" माळशिरस ! "

तेलकट पाटीवर दगडी पेन्सील ओढल्याप्रमाणें आवाज आला. भाऊरावांनी आपली दृष्टि सतरंजीवरच्या डागावरून उचलून शालिनीबाईंच्या मुद्रेकडे वळवली. बाईंचा चेहरा विलक्षण क्रुद्ध झाला होता. आपला अर्ज बाई फार तर नाकारतील इतपत मनाची तयारी करून आलेल्या भाऊरावाना बाईंचा तो चष्मेवाला चंडिकेचा अवतार पाहून क्षणभर नुकत्याच पडलेल्या बॉम्बजवळ

उभें असल्यासारखें वाटलें. या बाईला इतकें सतापण्यासारखें झालें तरी काय या प्रश्नाबरोबरच ही बया आतां करते तरी काय ही भीति, अशा दोनही भावनांच्या ओढाताणींत भाऊराव सापडले आणि त्यांतच एकदा मोठा पत्रा कोणीतरी सळसळवावा असा श्रीमती शालिनीबाई पपनीस बी. पी. एन्. ए. यांचा आवाज ऐकूं येऊं लागला,

"तुम्ही कोणाशीं बोलत अहां याची तुम्हाला कल्पना आहे का ? स्वतःची पायरी थोडी तरी ओळखून माणसानं वागावं ! तुम्ही सुरुवातीलाच स्वतःला पेशण्ट म्हणून घेतलं नसतं तर मीं यापूर्वींच तुम्हाला रस्ता दाखविणार होतें. तोतया डॉक्टरशीं संबंध ठेऊन माझ्या धंद्याला मला कमीपणा येऊं द्यायचा नाहीं !"

"शालिनीबाई, मी डॉक्टर म्हणून तोतया असेन पण मनुष्य म्हणून खरा आहे आणि तुमच्यापुढे प्रश्न टाकीत आहे !"

त्यांच्या या चिकटपणाला कटाळून शालिनीबाई म्हणाल्या, "तुमच्या डिग्र्या तरी कोणत्या आहेत हो ?"

"माझ्या डिग्र्या फुटक्या थर्मामिटरवरच्या डिग्र्यांइतक्या व्यर्थ असल्या तरी माझी प्रॅक्टिस दोनतीनशें रुपयांची आहे. आणि मी तुम्हांला पुन्हां सांगतो, मीं कोणी मोठा डॉक्टर म्हणून आणि तुम्ही मेट्रन म्हणून मी तुमच्याकडे आलों नसून तुम्ही एक स्त्री आहांत या भरवशावर एक पुरुष म्हणून मी तुमच्याकडे आलों आहे – प्रीतिचा भिकारी आला, तुझ्या –"

"पुरे करा. बेतालपणें कांहीतरी बोलू नका ! एकादी बाई एकटीच रहात असली म्हणून ती कांहीं रस्त्याकडेची भाजी नाहीं! नर्स किंवा मेट्रन म्हणजे तुम्ही काय समजलांत हो ?"

"स्पष्टच बोलयचें म्हणजे मी तुमच्याकडे लग्नाची मागणी घालावयाला आलों आहे."

"तुम्हाला घरांतून हाकलून द्यायचं का हसायच तेंच समजत नाहीं. तुमच्या धाडसाचं कौतुक वाटतं बाई ! माहीत आहे, परवा ते डॉ. अमके एम्डी एफार्सीएस, लागले लघळपणा करायला – मी चांगले ठीक केले त्यांना – आमची एक ज्युनियर सिस्टरच पाठ-

वली त्यांच्याकडे ड्यूटीला — तसे दुसरे ते डॉ. किरमिजे, आलेत मोठे स्पेशालिस्ट. त्यांना पण चांगली समज दिली मीं. नर्सा म्हणजे यांना कोण वाटतात कोण जाणे!"

आपली चढाओढ इतक्या बड्या बड्या लोकांशीं असेल अशी भाऊरावांना कल्पनाही नव्हती. बाईच्या अपेक्षेप्रमाणें त्यांच्यावर छाप पडलीच, पण नाकारले गेलों ते कुणा नामांकित माणसाच्या निमित्तानें कां होईना, हेंहि त्यांना त्यांतल्या त्यांत थोडें बरें वाटलें. अर्जुनानें स्वयंवरांत द्रौपदीला जिकल्यानंतर शंभराव्या कौरवाला जो विपरीत अभिमान वाटला असता तो भाऊरावांना यावेळीं वाटला. दरम्यान शालिनीबाई चढ्या सुरांत म्हणत होत्या.

"एकंदर लोकांनच मी पहातें आहें, डॉक्टर आणि नर्सेस यांच्या-बद्दल फारच गैरसमज परसलेले दिसतात. आमच्यावर सगळ्यांची नजर कां तर आम्ही आमच्या धंद्यासाठी पांढरे स्वच्छ कपडे घालतों नि नीटनेटक्या राहतों. आमच्या संबंध डॉक्टराशीं कां जोडा-यचा तर आम्ही औषधोपचारांत त्यांच्या मदतीला असतों म्हणून. साहेब नी टायपिस्ट, प्रोफेसर नी विद्यार्थिनी, डिरेक्टर नी नटी, मास्तरीण नी डेपुटी, गवंडी नी बिगारीण अशा जोड्या बसल्या बसल्या परस्पर जमवून द्यायची रिकामटेकड्या लोकांची मेली खोडच होऊन बसली आहे. नर्स पाहिली कीं तिचा डॉक्टर कोण या चौकशा! जसे कांही जगांत दुसरे पुरुषच नाहीत—"

" मी एक पुरुष म्हणूनच—"

"तें ऐकलं मीं. डॉक्टर म्हणून नर्सच्या घरांत शिरून पुरुष म्हणुन तिच्या पुढें पुढें करायच्या या युक्त्या समजतात मला."

" पण माझी ही सरळसरळ लग्नाची मागणी—"

" माहीत आहे. सगळेजण असाच अघळपघळ मागण्या करतात. पुरुष सगळे सारखे!"

" मग तुमचा नकार समजायचा?"

" हो. नी आतां तुम्हीं जा. माझ्याकडे ते हे— पण तुम्ही जा. नी माझ्याशी बोलायला येऊं नका पुन्हां— कामाखेरीज."

कांहींतरी पुटपुटत भाऊराव माळशिरसांनीं शालिनीबाई पप—

निसांच्या घरांतून काढता पाय घेतला. या बाईच्या सहकार्यानें उभें होणारें त्यांच्या मनोराज्यांतलें भव्य ‘ मॅटर्निटी होम ’ मनांतल्या मनांतच कोसळून पडलें. बुलाकचंद मारवाड्याच्या दुकानांतली आपली दोन खाटांची पोरगिरणी त्यांच्या डोळ्यापुढें आली. आतां तिथें परत जाण्याची कल्पनाही त्यांना असह्य वाटूं लागली. जड पावलांनी व विचारी मुद्रेनें ते आपल्या अर्ध-नोकरीच्या हॉस्पिटलकडे गेले– आणि भराभर गोष्टी घडण्यास सुरुवात झाली !

त्या विषण्ण मनस्थितीतच त्यांना कमिशन मिळाल्याचें कळलें. त्यांच्या इस्पितळांतल्या साहेबानें त्यांना कप्तानाचा पोषाक कसा दिसतो हें पाहण्यासाठी त्यांच्याच बांध्याच्या एका अम्मलदाराचा पोपाक गमतीनें त्यांच्या अंगावर चढवला. नंतर साहेबाच्या डोके दुखीवर अनुपान देण्यांत व इतर कामाच्या गर्दीत हॉस्पिटलमधून सुटण्यास उशीर झाल्यामुळें भाऊराव त्याच पोपाकांत आपल्या दवाखान्यांत परत आले. त्याच पोपाकांत त्यांना पाहून वाटेनें जाणाऱ्या शालिनीबाई चपापून क्षणभर थबकल्या आणि त्या पोपाकांत त्यांना पाहिल्यामुळेंच बुलाकचंद मारवाडी विलक्षण कासावीस झाला. असा चलतापुर्जा डॉक्टर आपल्या दुकानांतून, जाणार हें शेठजीस बरें वाटेना. लष्करी नोकरी म्हणजे जीवावर उदार होण्याचाच प्रकार असा सरळ हिशेब करणारा तो मारवाडी भाऊरावांस विचारूं लागला – अगदीं डोळ्यात पाणी आणून म्हणू लागला– की डॉक्टरसाहेब, आमाला टाकून कसाला ज्याते, आम्हीं तुमच्या काय गुन्हा केला !” डॉक्टर माळशिरसांनी त्याला थोडक्यांत समजावून दिलें की धंदा वाढवा-यचा, म्हणजे दोनाबदली वीस खाटांचा कारखाना चालवायचा मोका होता, पण भांडवलाच्या अभावी आपण तो विचार सोडून दिला व दुकान बंद करून चांगल्या पगाराची नोकरी पत्करली. बुलाकचंदाला हें पटेना, औषधपाण्याचें चालू दुकान केवळ भांडव-लाच्या अभावीं बंद होऊन एक ‘ होनहार ’ डॉक्टर लष्करांत जात आहे हें शेठजीला सहन झालें नाहीं. “अरे अमी देते तुमाला

भांडवल " तो आर्जवानें म्हणाला. भाऊरावांनीं लगेच कान टवकारले. हळूहळू दोघांत कुजबूज सूरू झाली—इतक्यांत हॉस्पिटलमधला एक अडली भाऊरावांना तांतडीचा निरोप घेऊन आला. भाऊरावांना ताबडतोब साहेबानें बंगल्यावर बोलावलें होतें. साहेबाच्या मडमेला नुकतीच सोडविल्यानंतर आतां इतक्यांतच आपल्याला कां बोलावलें असावें हा विचार करीत डॉ. भाऊराव माळशिरस साहेबाकडे गेले.

साहेब अतिशय हैराण आणि अतिशय गरम झाला होता. भाऊरावांना पहातांच तो ओरडला.

" मॅल्मिराज, गाढवा, कुठलं औषध दिलस मला डोकेंदुखींवर ? बेअकली इसम ! तुला डॉक्टर कुणी केला ? औषधपाण्याची कांहीं माहिती होती का तुला कधी ? उठला माझ्या जिवावर– × × × !

साहेबाला कसलें औषध दिलें होतें तें आठवीत भाऊराव अर्धवट मोठ्यानें पुटपुटत होते, ' मॅक स्पिरीन ऐवजीं मॅकसल्फ दिलं बहुतेक. ' झाला होता खरा थोडा घोंटाळा. साहेबाला डोकें दुखीवर केलेल्या औषयोजनेनें डोकें थांबण्याऐवजीं साहेबाला एक सारखे जुलाब सुरूं झाले होते. साहजिकच साहेब चिडला होता. त्याच्या शिव्या जरी भाऊरावांना कळत नव्हत्या तरी त्या शिव्यांचें चटके बसून सारखे ते मधूनमधून दचकत होते.बाकी निर्ढावलेल्या मुद्रेनें नाकासमोर पाहात उभे राहण्याखेरीज त्यांना इलाज नव्हता. मधून मधून हलक्या आवाजांत गुरगुरत भाऊरावांनीं आपल्या परीनें आपल्या बचावाचे मुद्दे मांडण्याचा यथाशक्ती यत्न केला, "पण साहेब, माझा तरी दोष काय ? बोलून चालून बाळंतपणाचा डॉक्टर मीं, तसलें वाटेल तें काम सांगा – पण हें डोकेंदुखीचें ओषधविषध आमची लाइन नव्हे. मीं अलीकडे पुरुषांना कधींच औषध दिलें नाहीं. त्यामुळें झाली असेल चूक– पुन्हां मी नको नको म्हणत असतां तुम्हीं मला या भरीस पाडलंत, मग आतां कमिशन नी पोषाख हिसकावून घेण्याची भाषा कां बरें ? शिवाय आपण उगीच त्रासत आहांत. अशानें आपल्याला आराम वाटणार नाहीं. आणि मलाही या शिव्या भयंकर वाटतात–"

असें डॉ. माळशिरस यांना साहेबाला सांगायचें होतें, पण एकतर भाषेच्या अडचणीमुळे ( इंग्रजींत ? छे ! ) तें सलग आणि अर्थ होण्यासारखे जमले नाही. तो त्यांना मुळीं बोलूच देत नव्हता. तो स्वत:च तोंडाला फेस येण्याइतका बडबडत होता. आणि साहेब तरी असा वाईट की नुसता शिव्या देऊनच थांबला नाही; त्यानें कप्तानीचा पोशाख भाऊरावांना जवळ जवळ तिथल्या तिथें उतरायला लावला. तो त्यांना मारायला धांवला इतकेंच नव्हे तर स्वत:ला पाजलेल्या औषधाचे बारा डोज भाऊरावांना छातीवर बसून जबरदस्तीनें पाजण्याची भाषा तो चेकाळलेला टोपीकर करूं लागला. तेव्हां मात्र नुसत्या चड्डीनिशी ( पळतापळतां एका चपराशाला इस्पितळांत आपले कपडे आणायला पाठवून ) माळ्याच्या झोंपडींत आंतून कोंडून घेऊन बसण्याचे डावपेंच भाऊरावांना लढविणें भाग पडले.

तीन फुल्यांच्या पोषाखाला एक तीन फुल्यांची शिवी हांसडून मुलकी पोषाखांत मलूलपणें तें स्वत:च्या दवाखान्यांत दाखल झाले. बुलाकचंद जागा होता. डॉक्टरांचा बदलेला पोषाख पाहून त्याला इतका आनंद झाला कीं, डॉक्टर कप्तानी गेल्याचा विषाद पार विसरून गेले आणि बुलाकचंदानें भांडवलाची गोष्ट नक्की केल्याचें सांगितल्यावर तर प्रेमभंगाचीही खोट भरून आल्याचें समाधान भाऊरावांना लाभलें.

दुसऱ्या दिवशी ते दवाखाना उघडतात न उघडतात तोंच त्यांना एक आश्चर्याचा धक्का बसला. पपनीसबाई मेट्रन तेथें उपस्थित झाल्या आणि जरा चुळबूळ करीत इकडे तिकडे पहात भाऊरावांच्या टेबलापुढें बसल्या. भाऊरावांच्या भुंवया वरच राहिल्या ! काल आपला धि:कार करणारी बाई आज आपल्याकडे येते, गोंधळल्यासारखी करते, इतकेंच नव्हे तर (अरे बापरे) लाजते, या घटनेनें डॉ. माळशिरस हतबुद्धच झाल्यासारखा झाला.

" डॉक्टऽर, तुम्हीं कमिशन घेतलंत होय?" बाईचा आवाज जरी गोड नसला तरी त्या आपल्याकडून गोडव्याची शिकस्त करीत आहेत हें दिसून येत होतें. भाऊरावांच्या दगडी मुद्रेवर हळू हळू कठोर

आत्मविश्वास झळकू लागला. त्यांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं.

" काल मीं पाहिलें तुम्हांला डॉक्टर. युनिफार्म किती छान दिसतो तुम्हाला ! काल मीं म्हटलं, अय्या ऽ – "

" हं ऽ ऽ ऽ" डॉक्टर गर्जून म्हणाले, आणि खिशांतून हातरुमाल काढून त्यांनी फर्ररकन् नाक शिंकरलें. आधींच ते फारसे काव्यप्रेमी नव्हते, तशांत या बाईचा लडिवाळपणा काव्यप्रसंगाचें भेसूर विडंबन करीत होता. म्हणूनच डॉक्टरांनी आपली नापसंती अगदी शिंग फुंकल्यासारखी व्यक्त केली. मेट्रनबाईनी आणखी एकदां प्रयत्न केला.

" काल तुम्ही बोललांत तें–" त्या हळूच म्हणू लागल्या–

" विसरून जा तें !" डॉक्टर करकरले.

" मी घाईनें बोलले–"

"छेछे! तें सगळं झालं, गेलं, कांहीं शिल्लक नाहीं आतां नमस्कार!"

" मी ' नाही' म्हटलं म्हणून तुम्ही लढाईवर जातां–"

" छट् ! नी कोण लढाईवर जातो ? मी नाहीं आहें जात !"

" कमिशन–"

" परत केलं. माझ्या हॉस्पिटलची तयारी करायची आहे मला."

" मीही एखाद्या मॅटर्निटी होममधें पैसा घालणार म्हणत होतें–"

" वांया जातील. माझ्या इस्पितळाशी चढाओढीला कुणी टिकणार नाही. वीस बेडस्नी सुरुवात करतों आहे, नि वर्षात दोनशें होतील–"

" भाऊराव–"

" बरं आहे, या आतां तुम्हीं–"

" मी कबूल आहे–"

" हा: हा: !" भाऊरावांनी विकट हास्य केलें आणि ते उठून चालूं लागले. आणि स्त्रीचा व नोकराचा असा एकदमच धि:कार करून क्षणभर वीरतेज पावलेला भाऊराव माळशिरस डॉक्टर सहीसलामत हातचा निसटला म्हणून दैवावर चरफडत साळू नर्स ऊर्फ मेट्रन शालिनीबाई पपनीस आपल्या रस्त्याला लागली. अजूनही ती जगावर जळजळत जातांना तुम्हाला कधीकधीं रस्त्यांत दिसेल– आणि आमचा भाऊडॉक्टर केवढ्या मोठ्या प्रसंगांतून बचावला याची अर्धी तरी कल्पना येईल !

: ७ :

# लक्ष्मीधराची शिकवण

‘ लोळणचि भूमिवरि मोक्ष वाटे जिवा ’

‘ मानापमान ’ नाटकांतल्या लक्ष्मीधराची फक्त एकच शिकवण आपण आज विचारांत घेणार आहोंत. पुढाऱ्यांच्या भाषणांतले जरुरीपुरते शब्द घेऊन आपण त्यांचा हवा तसा उपयोग करतोंच; आपल्या सोईचीं तत्त्वें घेऊन तेवढींच वापरतों,मग लक्ष्मीधरासारख्या श्रीमंतांच्या पुढाऱ्याची एकच उक्ति ही सध्या त्याची शिकवण मानायला काय हरकत आहे ? त्या महापुरुषाची खरें पाहिलें तर एवढीच शिकवण नाही. वेगवेगळ्या प्रसंगांत कसें वागावें, याची चौरस शिकवण लक्ष्मीधरानें स्वतःच्या आचरणानें आणि वचनांनीं नाटकांत ठिकठिकाणीं दिली आहे. श्रीमंतांचें तत्त्वज्ञान इतक्या उद्‌बोधक स्वरूपांत एरवीं आपणांस कसें पाहण्यास सांपडलें असतें ? लक्ष्मीधर रंगभूमीवर आहे म्हणूनच सधन लोकांचें माहात्म्य आपल्या डोळ्यांपुढें आहे. अशा थोर पात्राचें एकेक सूत्र अभ्यास करण्यासारखें आहे :

**‘ लोळणची भूमिवरि मोक्ष वाटे जिवा ’** या त्याच्या वचनांत अनेक अर्थ अभिप्रेत आहेत : कुणाला वाटतें कीं ‘जमिनीवर लोळा नी जिवाला सुख लावून घ्या ’ हा सरदार लक्ष्मीधर यांचा केवळ

सुखवादी संदेश आहे. असा हा आरामाचा मंत्र आहे असें कांहींना वाटतें, तर कित्येक बुद्धिवादी ही एका धनिक अडाण्याची उपयुक्त शिकवण मानतात. कोण्या विचारवंताच्या मतें तर हें जीवनाचें एक महान् तत्त्वज्ञान आहे.

'लोळणचि भूमिवरी सौख्य वाटे मना' हें ठरविणारा मनुष्य, पूर्ण विचारांती हा महान् निर्णय घेत आहे हें आपल्याला दिसतें. बाकी सर्व साधकबाधक गोष्टींची छाननी केल्यानंतर, दोन मार्गापैकीं कोणता स्वीकारायचा हें अखेरीस ठरवायची वेळ आली आहे; अशा वेळीं सुख एकच आहे, कीं जमिनीवर लोळण. बाकी कुठलीही गोष्ट दुःख आहे, दुसरा मार्ग उरला नाहीं, नुसतें उठून बसणें म्हणजे कष्ट आहेत, उभें राहण्याची तर गोष्टच नको, आणि चार पावलें चालण्याची कल्पना, छे, त्यापेक्षां मृत्यु पत्करला—अशा अवस्थेला पोहोंचलेला जीव हे उद्गार काढीत आहे : 'लोळणचि भूमिवरि सौख्य वाटे मना.' जमिनीवर लोळण घेण्यानेंच सर्व प्रश्न सुटतील आणि आपलें ध्येय जे परमसौख्य त्याप्रत आपण पोहोंचू ही अनन्यगति ह्या घोषणेंत प्रतीत होत आहे. 'लोळणचि भूमिवरि, सौख्य वाटे मना' या तत्त्वानुसार जमिनीवर लोळणारा मनुष्य हिंसाप्रवृत्त नसतो. 'लोळा व लोळू द्या' अशी त्याची सहिष्णु वृत्ति असते. अशान्तीच्या ज्वाळा लोळण्यानें विझून जातात, आणि आज मानवजातीला अत्यंत निकडीची कांहीं जरूर असेल तर ती शांततेची. अशान्तीच्या ज्वाळा विझविण्यास 'लोळणचि भूमिवरि' या शामक तत्त्वाचा जागतिक प्रचार ताबडतोब झाला पाहिजे. सुखाचें इतकें सोपें साधन जवळ असतांना पृथ्वीच्या साऱ्या पाठीवर असंख्य असंतुष्ट आत्मे सुखासाठी नाना प्रकारची धडपड करीत आहेत, पण सुखाची गुरुकिल्ली एकच की जमिनीवर लोळण, हें त्या बिचाऱ्यांना सुचलें नाहीं. त्यांना कोणीतरी मार्ग दाखविणें जरूर आहे, कीं लोक हो, धडपड कशाला करतां ? सुख कांहीं दुसरीकडे कुठें नाहीं, पायाशी जमीन आहे. ( साधारण सपाट जागा पहा नी ) लोळण घ्या; परम सौख्य लाभेल.

जमिनीवर लोळण म्हणजे कळपापासून विश्रांति, निर्भयतेबद्दल विश्वास, लढाईस नाकबुली, विचारांना रजा आणि दुनियेबद्दल बेफिकिरी. लोळणारा मनुष्य कमलपत्रावरील जलबिन्दूसारखा जमिनीवर राहूनही आपल्या स्वत:ची एक अलग सृष्टि बनवितो. कमळाचीं पानें हालतात तेव्हां त्यांच्यावरचे थेंब जाऊन पाण्याला मिळतात. लोळणाराची वहात जाणाऱ्या पानावरची दुनिया तो उठून बसला तरच जीवनाच्या प्रवाहाला मिळू लागते.

" आस्ते भग आसीनस्योर्ध्वस्तिष्ठति तिष्ठत:
शेते निपद्यमानस्य चराती चरतो भग: । "

बसणाऱ्याचें भाग्य बसून राहतें, उभा राहणाऱ्याचें उभें राहतें, निजणाऱ्याचें निजतें आणि चालणाऱ्याचें चालतें असा आपल्याला बालपणापासून धडा मिळालेला आहे. त्याची धास्ती घेऊन आपल्या बऱ्याच बांधवांनी आपली दिशाभूल करून घेतली आहे. चालणाऱ्यांचें भाग्य चालो, उभ्यांचें नशीब तिष्ठत उभें राहो, बसणाऱ्यांचें भाग्य उठून बसलें तरी आम्हाला सारखेंच, पण निजणाऱ्याचें भाग्य निजते ही किती आनंदाची गोष्ट आहे! जमिनीवर लोळण घेणारे हेंच समाधान मानतील कीं 'खैर झाली, आपण निजलों असतांना तरी हें बेटं भाग्य निजून राहतं. नाहीतर आपण झोंपलों असतांना जागृत राहून तें आपल्या अतर्क्य लीला करू लागायचं! आपण नुसते जमिनीवर लोळलों तर हें झोंपीं जातं, पुष्कळ झालं. याहून मनुष्यप्राण्याचं अधिक भाग्य कोणचं? बसणारावर पहारा ठेवणारं, चालणारावर पाळत ठेवणारं, उभे राहातांच उभं राहाणारं असं यांत्रिक भाग्य एखादे वेळीं चालू असतानांच आपल्याला झोंप लागणं किती स्वाभाविक आहे! आणि तसें झालें तर कुठलाही अनर्थ सुचायचा या भाग्याला!' पण आपण भूमीवर लोळण घेतांच तें भाग्ययंत्र निमूटपणें झोपीं जातें, यावरून भाग्याबरोबर उठाबशा काढणाऱ्या आणि चालण्याची शर्यत लावणाऱ्या लोकांपेक्षा पडून राहणारेच भाग्यावर किती अधिक अधिकार गाजवतात हें उघड दिसतें. आणि लोळण घेतली असतां जिवाला जें सुख होतें तें हिरावून घेण्याची संधीही त्या निद्रित भाग्याला

मिळत नाहीं! जमिनीवर लोळणाऱ्या माणसाची अशी ऐन भवितव्यतेवर ( वरील श्लोकान्वये) किती हुकमत चालते ती 'लोळण घेऊं नये ' म्हणणाऱ्या माणसाला कळायची नाहीं.

पण लोळण घेत नाहीं असा कुणी प्राणी आहे? रोज रात्रीं प्रत्येक जीव विश्रांतीसाठी लोळण घेतो. पण ही झाली निसर्ग-नियमामुळें जरूर अशी झोंप. ' भूमिवरची लोळण ' या योगांत रोजची झोंप हा एक नुसता मामुली कार्यक्रम असतो. रोजच्या झोंपेखेरीज कष्टांनी थकलेल्या किंवा उगीचच थकलेल्या अथवा थकल्यासारखें वाटणाऱ्या किंवा थकवा नसलेल्यादेखील अंगानें जमिनीवर लोळण घेण्यात जें महत्सुख निसर्गानें मनुष्यप्राण्याला दिलें आहे, त्या सुखापुढें त्याला अन्नपाण्याचीदेखील पर्वा रहात नाहीं. असें दिसून येतें. सर्व मनुष्यप्राण्यांना सारखेंच सुख लागेल असा जमिमीवर लोळण्याचा हा मानवधर्माधिष्ठित मार्ग आहे. आबालवृद्ध, नरनारी,सर्व धर्माचे, वर्णाचे, रंगाचे, पोपाखाचे किंवा बिनपोपाखाचे, मनुष्यप्राणी या श्रेष्ठ सुखाचा लाभ घेऊं शकतात. त्यांना लोळणं कुणी मुद्दाम अशक्य केलं तर गोष्ट वेगळी ! उदाहरणार्थ, कुठल्याच पवित्र्यांत आरामांत बसतां येऊं नये असे अणकुचीदार दगडाच्या राशीवर बसवलेले पिंजरे गेल्या महा-युद्धांत युरोपमध्यें उभयपक्षांनीं कांहीं कैद्यांसाठीं केले होते; पण तशा यमलोकींच्या बळींखेरीज बाकी तमाम मानवजातीला जमिनीवर लोळण्याच्या सुखाबाबत अगदीं पूर्ण स्वातंत्र्य आहे ! आजच्या जागतिक मानवाला हें पांचवें स्वातंत्र्य संयुक्त राष्ट्र-संघाच्या लुडबुडीशिवाय मिळालें आहे.

मनुष्यप्राण्यानें या दिवसांत भूमीवर लोळण घेण्यास मिळणें या थोर ईश्वरी देणगीचा अधिकांत अधिक उपयोग करून घेतला पाहिजे. जमिनीवर लोळण्यांत जितका अधिक वेळ मानवी प्राणी घालवील तितका तो अधिकाधिक, निर्भय संतुष्ट, शांत व सुखी होईल. मग युद्धें बंद होतील. दिवसभर लोळत राहणें ही सुधार-णेची कमाल समजली जाऊन पृथ्वीवरचीं राष्ट्रें, देश, जमाती, वसाहती आणि टोळ्या आनंदानें आपापल्या घरांतून लोळत

रहात, परस्परांशीं गुण्यागोविंदानें वागत असल्याचें आढळून येईल.

युद्धाचें मूळ कामाच्या वेडांत आहे. पाश्चत्य देशांना कामें करायची अगोदरच थंडीमुळें सक्ती, त्यांतून कष्टाची फाजील हौस. माणसाचे कामाचे तास वाढवायचे कसे ही त्यांची सारी धडपड. जास्त वेळ कोण काम करतो या स्पर्धेतच नवा माल, नवीं यंत्रें आणि नवीं शस्त्रें उत्पन्न होतात आणि त्यांच्यामधून युद्धें तयार होतात. तोंडानें म्हणतात कीं माणसाची फुरसत वाढवण्यासाठीं यंत्रें, पण फुरसत फक्त उपासमारीलाच मिळते असें दिसून येतें. पश्चिमेकडील लोकांनीं ही धडपड सोडून द्यावी आणि अधिकाधिक काळ जमिनीवर लोळण्यांत घालवावा असें पूर्वेकडच्या भूमीवर लोळणारांचें त्यांना निकडीचें सांगणें आहे. शांततेच्या या अमोघ शस्त्राची देणगी स्वीकारणें हें युरोप–अमेरिकेच्या आधुनिक लोकांचें कर्तव्य आहे; यांतच अहिंसा व निर्भेळ सत्य आहे. यांत अंतस्थ हेतु कांहीही नाहीं. " आम्हीं लोळू, तुम्ही लोळा, " हा विश्वबंधुत्वाचा संदेश आहे. आम्ही भूमीवर लोळण्यांत सुख मानतों, तुम्हींही मानू लागा, लौकरच तुम्हांलाही या परमसौख्याची प्रचीति येईल आणि याप्रपाणें पृथ्वीवर सर्वाचें सर्वसत्ताक राज्य होऊन नवीन युग उजाडेल.

दुःखाची गोष्ट अशी की, पाश्चात्यांचें हें कामाचें खूळ या देशांत शिरून मोठमोठ्यांना त्यानें पछाडलें आहे. आमचे पुढारी चौदा, अठरा, किंवा प्रसंगी चोवीस तासदेखील काम करतात. मर्जी त्यांची. पण त्यांचें याबाबतीत इतरांनीं अनुकरण करण्याची मुळीच घाई नाहीं. ज्यांना काम करायचं आहे त्यांना कोण अडवणार? पण विशेष कामें नसणाऱ्यांनीं, विनाकारण कामें करणारांनीं किंवा इलाज नाहीं म्हणून काम करणारांनी, अधिकाधिक जमिनीवर लोळण घेऊन जास्त सुखी व्हावें हें इष्ट आहे.

भूमीवर लोळण्याचा आनंद लुटणें ह्या सुखाचा उल्लेख लक्ष्मीधरानें केला म्हणून तें श्रीमतांनीच भोगण्याचें सुख आहे असें नाही. श्रीमंत, सुखवस्तू, घरचे बरे, खाऊनपिऊन सुखी, मिळवते, कुटुंबीं अशांपासून तो थेट सडेफटिंग, फकीर, कलंदर, मुशाफर, खोमचे-

वाले, गाडीवाले, फेरीवाले, दुकानदार, कारागीर, मजूर, हमाल बिगारी किंवा भिकारी, या सर्वांना जमिनीवर लोळण घेण्याची मुभा आहे. एक असा चुकीचा समज पसरलेला आहे कीं ज्यांना काम न करतां कमाई मिळते अशांसाठींच केवळ जमिनीवर लोळण्याचें सुख राखून ठेवलें आहे.—मुळीच नाही. काम दूरच राहो, कमाईची देखील तमा न बाळगतां लोळत रहाणारे योगी सर्व दर्जाच्या आणि उत्पन्नांच्या लोकांत आढळतात आणि त्यांच्यामुळें तो गैरसमज चुकीचा ठरतो. रावांप्रमाणें रंकांनाही लोळतां येतें असें कित्येक तपस्वी लोळणारे सिद्ध करतात आणि त्यांना पाहूनच लोळणवादावरील श्रद्धा अढळ राहते.

लोळण्याचें सुख हें कमाईवर अवलंबून न ठेवणारे तेच खरे अधिकारी पुरुष. 'उठा, जागा, कामाला लागा, उद्योग करा, उत्साह आणा, उन्नति करून घ्या, कमाई वाढवा – निदान कमाई करा, उत्कर्षाच्या मागे लागा' – वगैरे गहजबाकडे पूर्ण दुर्लक्ष करून लोळणें, हें एकच ध्येय ज्यांनी डोळ्यांपुढें ठेवलें आहे, त्यांना कामकाजाची गर्दी नसते, आकांक्षेची टोंचणी नसते, अन्न – वस्त्र निवारा ते दैवावर सोंपवतात, पळण्याचा प्रयत्न न केल्यामुळें त्यांच्या वाटेस कुणी जात नाही, त्यांना तहानभूक कधीं तीव्र लागत नाही, त्याचे कपडे कमी झिजतात, खर्च मुळीच होत नाहीं, चालण्याचा नाद सोडल्यामुळें त्यांचा धोका कमी होतो, उभें राहणें बंद केल्यामुळें ताटकळणें वाचतें, बसण्यांत कांही गंमत न वाटल्या मुळें अंग अवघडण्याची भीति रहात नाहीं, पडून राहण्याचा सात्त्विक आनंद ते स्वत: उपभोगून दुसऱ्यालाही भोगू देतात. जर कधीं पूर्वेनें पश्चिमेच्या सुधारणेसाठी 'जागतिक लोळण चळवळ' सुरू केली, तर तिच्या आघाडीवर नाही, पण पाठीमागें मात्र खास, भूमीवर लोळण घेऊन सौख्य उपभोगणाऱ्या लोळसवाद्यांची खडी नसली तरी 'पडी' फौज तयार राहील.

काम करण्याच्या नादानें बेभान झालेले लोक, 'हालचालपक्षा' चे उत्साही पुरस्कर्ते, इरेस पेटलेले कोणी प्रयत्नवादी, पडून राहणारांना, लोळण्यांत परमार्थ मानणाऱ्या नवविचारवंताना अविचारी

पणें ' आळशी ' म्हणतात; निष्क्रियतेनें कांहीं साध्य होत नाहीं असा दावा मांडतात; पण थोड्या विचारांतीं दिसून येईल कीं कार्यपिसाट लोक जें साघ्य करतात तें टिकतेंच असें नाहीं, हाल-चाल करणारे जें मिळवतात तें सांभाळण्यांतच त्यांचा सारा वेळ जातो, प्रयत्नवादी अखेर निष्काम कर्मावर संतोष मानू लागतात. पण लोळणारे लोक कांहीं साध्य करण्याच्या भानगडीत नसल्या-मुळें त्यांना कांही टिकवावें किंवा सांभाळावें लागत नाहीं, आणि फळाची आशा जर ठेवायची नाही तर प्रयत्न तरी कशाला व्यर्थ घालवायचा, या उच्च व त्रयस्थ भूमिकेवरून सांप्रदायिक आळशी मानवांच्या फोल धडपडीकडे पाहतात.

लोळण्याच्या तत्वज्ञानाचा सर्वत्र प्रसार झाला, देशचे देश नुसते पडून राहिले, माणसांचे गडबडीचे व्यवहार बंद झाले, कोणी उद्योग केले नाहींत, धडपड केली नाहीं, काम केले नाहीं तर जग चालायचें कसें ?—हा प्रश्न कित्येकांना पडेल, पण तो प्रश्न दुर्लक्ष करण्यासारखा आहे. सध्यांच्या जगांत मनुष्यप्राण्यानें उद्योग, धडपड किंवा काम करण्याचा खरोखरच कांही उपयोग आहे काय ? हा उलट प्रश्न अशा शंकेखोरांनीं स्वतःला विचारावा. शांतीसाठीं खटपट करणारे यश मिळवीत आहेत काय ? जगण्यासाठीं झगडणारे तरी माणसाला योग्य अशी जिंदगी मिळेल ही आशा बाळगतात काय ? काम करणाऱ्यांना श्रमाखेरीज कशाचा भरंवसा आहे काय ? या प्रश्नांचा विचार केला की पटेल की जिवाच्या सौख्यासाठी ' भूमीवर लोळण ' हाच एक मार्ग मानवाला आजच्या मन्वंतराला योग्य आहे.

◆◆ ◆◆

: ८ :

# छदामवाडींतील छट

आज माझा जुना मित्र बन्या मला फार दिवसांनीं भेटत होता. दाट दाढी आणि निळा चष्मा या साजानें त्याचा चेहरा शंभर लोकांत उठून दिसत होता. पण आपण गर्दीत सहज मिसळून जाण्यासारखे दिसतों असें त्याचें स्वतःचें म्हणणें होतें. त्याने खुलासा केला कीं, आपण एकाद्या राजकीय पक्षांत दाखल झालों नसून वेषांतरासाठीं असें तोंड झाकून घेतलें आहे. सर्वांचें लक्ष वेधून घेणाऱ्या असल्या वेषांतराचा उपयोग काय ? असें त्याला विचारतां तो म्हणाला, " तात्पुरतें वेषांतर. कांही लोक आपल्याला मारायला टपले आहेत; त्यांचा नजरेस न पडण्यासाठीं आपण हा असा वेष घेतला आहे. " तो आणखी म्हणाला कीं, फोर्टचा भाग त्यांतल्या त्यांत सुरक्षित आहे. इथें कोणी कुणाला सहजासहजीं मारणार नाही. जरी शत्रूनें आपल्याला पाहिलें, तरी तो राजरोस आपल्यावर हल्ला करायला धजणार नाही.

या बोलण्याचा मला कांही उलगडा होईना. पण मला विचारायला वेळ न देतां बन्या म्हणाला, " आपण कुठेंतरी त्या आईस्क्रीम दुकानांत लपू—लपू म्हणजे जरा आडोशाला बसू—फोर्ट झाला तरी इथेंही दुष्मन टेहळणीवर असेल. मला आईस्क्रीम

खायचं होतंच. पण माझ्या खिशांत दोनच आणे आहेत. कोणी विश्वासू मित्र भेटतो कां हें पाहतच होतों मी. तुला शंभर वर्षं आयुष्य आहे–चल लौकर–त्या समोरच्या फूटपाथवरून मला कुणीतरी न्याहळतो आहे." त्याच्या दाढी नि निळ्या चष्म्याकडे कुणीतरीच काय बहुतेक सगळेच पुन्हा पुन्हा अविश्वासानें पाहात होते आणि त्याच्या बरोबर माझ्याकडे. पण हें सांगायला वेळ न देतां बन्यानें आईस्क्रीमच्या दुकानांत ओढीत नेऊन चार प्लेटची ऑर्डरसुद्धां दिली.

"मी असा लपत छपत कां वागतों आहे हें प्रथम सांगतों," बन्या पुढें म्हणाला, "मी भूमिगत आहे. पोलिसांच्या भयानें नव्हे, साथीदारांच्या भयानें. मी ज्या टोळीत होतों, त्यांतल्या साथीदारांच्याच. होय, मी नुकताच गुन्हेगारांच्या दुनियेंत होतों. एका मवाल्यांच्या टोळीत– पण थांब, आईस्क्रीम खातांना या दाढीची नि चष्म्याची अडचण नको," म्हणून त्यानें निर्विकारपणें आपली खोटी दाढी व चष्मा खिशांत ठेवून दिला. सुदैवानें आम्ही पार्टिशनच्या आड असल्यामुळे त्याच्या या झटपट वेषांतरानें हॉटेलांत विशेषशी खळबळ उडाली नाही.

तो नुकताच गुंडांच्या कंपूत होता, या बातमीनें मी फारसा थक्क झालों नाही. कारण, बन्याबापू कोशीसकर या व्यक्तीनें आजपर्यंत नाना धंदे केले होते. लॉटरी, लायब्ररी, डेअरी, मास्तरी, भागीदारी आणि पेन्शनरांच्या बोर्डिंगपासून बायकांच्या व्यायामशाळेपर्यंत सर्वप्रकारच्या संस्था. त्याचा विशेष म्हणजे प्रत्येक व्यापांतून तो अगदीं त्वरेने नामानिराळा व्हावा अशी कांहीं तरी घटना दरवेळी घडत असे.

आइस्क्रीमचा पहिला वाडगा संपवून बन्या म्हणाला, "छदामवाडीतले छट ही नामांकित टोळी तुझ्यासारख्या निरुपद्रवी मध्यमवर्गी माणसाला कुठून माहीत असणार ? गेले कांही दिवस–कालपर्यंत म्हणेनास– मी त्या टोळीचा सन्मान्य सभासद होतो. तू राहतोस त्या बाजूची देखील एक टोळी आहे. लाल्या दादाची. त्या लोकांना आमचें नांव पक्कें माहीत आहे. कारण पत्राचाळीच्या दंगलींत

आम्ही त्यांना सज्जड हात दाखवला होता. आमचा गट मल्लू दादाचा. लत्ता छदामवाडी; प्रसिद्ध वस्ती आहे मुंबईची. ज्या शेठलोकांनीं छदाम छदाम करून लाख मिळवले त्यांच्या हवेल्या आहेत सगळ्या. चार पोलिसांच्या बीटमध्यें बसेल इतकी पसरलेली वस्ती आहे. श्रीमंत लोक, त्यांचे भाडूंत नोकरचाकर, वाणीउदमी दुकानदार आणि कांही गुंड. कल्लू हा दादा नि त्याचे पांच साथीदार, मिळून सहाजणांची अख्खा मुबईत नामजाद झालेली टोळी-छदामवाडीचे छट – !

आतां माझ्यासारख्या एरवी कायद्यानें चालणाऱ्या नागरिकाला मवाल्यांच्या टोळीची संगत कशी लागली, असा तुला साहजिकच प्रश्न पडेल. उत्तरः–सुदर स्त्रीची भूल रसिक मनावर पडल्यामुळें येणारा बेसावधपणा मला भोंवला. जर मी आज मल्लूदादाची बायको असलेल्या मंजिरेची तेव्हां व्यर्थ भक्ति केली नसती, तर छदामवाडीचे छट या टोळीशीं माझा संबंध येता ना. जर तो न येतां तर त्या टोळीच्या मवाल्यांपासून असा लपत छपत जीव बचावण्याचा प्रगग आज मजवर न येता – पण पाहिल्यापासूनच सांगतों सगळें.

पांच वर्षांपूर्वी कांहीं कारणानें मला थोडे पैसे मिळाले. तुला कदाचित् आठवत असेल कीं, एका रावबहादुरांच्या मुलीच्या जाहीर स्वयंवरांत माझा आचानक पहिला नंबर आला होता; पण राहायला जागा नसल्यामुळें आपसांत तडजोड करून वधूच्या बदली थोडी रोख रक्कम पत्करून मी मोकळा झालों होतों. तेच पैसे घालून मी छदामवाडींत एक खुर्ची टेबल मावेल एवढं दुकान मिळवलं आणि रेडिओ–दुरुस्तीचा धंदा सुरूं केला– " रेडियो डॉक्टर बनसी ' अशी पाटी अजून असेल त्या दुकानावर. (मीच बनसी) अगोदर जवळजवळ वर्षभर मी बारकाईनें अभ्यास केला होता एकंदर तंत्राचा. माझ्या एका मित्राचा रेडियो, त्याची कायम चाललेली दुरुस्ती आणि त्यामुळें होणारा दुरुस्तीकाराचा लाभ, या गोष्टीचें सूक्ष्म निरीक्षण करूनच मी ठरवलें कीं, रेडिओ मालक होण्याच्या बुडीत खर्चापेक्षां रेडिओची वैद्यकी करण्याचा

धंदा खरा किफायतशीर. प्रामाणिक रेडिओ रिपेअरर असतील, मी नाहीं म्हणत नाहीं, पण या बनसी रेडिओडॉक्टरला मात्र छदामवाडींत दुकान घालून प्रामाणिकपणा परवडण्यासारखा नव्हता. तात्पर्य, लौकरच माझ्या दुकानाचा चांगला जम बसत चालला होता.

एक दिवस मंजिरा मुरबाडकर एक मोडका रेडिओ घेऊन माझ्याकडे आली. तिच्या सौंदर्याकडे पाहून एकाएकी आपलें वजन शून्यावर आल्यासारखें मला क्षणभर वाटलें! आणि त्याच क्षणाला चित्रगुप्ताच्या वहीत मल्लू दादाच्या टोळीचा उमेदवार म्हणून माझं नांव दाखल झालं. मंजिरा मुरबाडकर छदामवाडीची छेल-छबेली म्हणून गाजत होती, हजारजणीत सुरेख तरतरीत चमक-दार आणि धीट. ती रस्त्यानें चालली तर लोक आपलीं कामें सोडून तिच्याकडे पहात रहायचे. फॅशनेबल तरुण तिच्या-पुढें सुकलेल्या फुलासारखे माना टाकायचे, तर बडे बडे लोक पाण्याबाहेर पडलेल्या मासळीसारखे हताश चेहरे करायचे. आम छदामवाडीतल्या बायका तिची नालस्ती करीत. इतकी फत्ते तिनें आपल्या रूपानें मिळवली होती. तिचें लग्न कोणाशीं होणार, याची वाट सारी वाडी उत्सुकतेनें पहात होती. अनावर कुटुंबा-खालीं चिरडलेल्या एका गरीब कारकुनाची पोरकी मेव्हणी ती, तेव्हां " होईल एका कारकुनाशींच लग्न " अशा साळसूद मता-पासून तों ती तडफदार असल्यामुळें कुणीतरी भलतच भारी मालदार कूळ गांठील, अशा व्यवहारनिष्ठुर अटकळीपर्यंत घरोघर मंजिरेच्या भावी आयुष्याची आंखणी चालत होती. वाडीकरांबरो-बर मीहि विचार करीत होतों कीं, कारकुनाचा सालसपणा आणि शेठियाचा शौकिनपणा हे दोन्ही गुण असलेला बन्याबापू कोशिसकर ऊर्फ बनशी रेडिओ डॉक्टर हाच मंजिरेला लायक नवरा कां नाहीं होऊं ? त्या दृष्टीनें रेडिओ दुरुस्तीच्या निमित्तानें तिची ओळख वाढविण्यांत मी मुळींच कसूर केली नाहीं.

पण लौकरच एक दिवस अनपेक्षितपणें छदामवाडींत जाहीर झालें कीं, मंजिरा कोणाची तें ! माझ्या दुकानांतून दिसण्या-सारखाच तो प्रकार घडला. मंजिरा एका बाजूनें येत होती आणि

तिच्यामागून कांही अंतरावर एक सभ्य, मध्यम वयस्कर मनुष्य घाईघाईन तिला हांका मारीत येत होता. पहिल्यानें तिला ऐकूं गेलें नाहीं. तेव्हां गृहस्थ अगदीं जवळ येऊन तिच्याशी बोलूं लागला ! पण थोडयाच वेळांत मंजिरा " नाहीं नाही ", " नको नको " म्हणून तेथून झपाझपा निघून गेली आणि गृहस्थ परत फिरला. एकदोन मिनिटांत दोनचार लोक रस्त्याच्या दुसऱ्या बाजुनें पळत आले आणि त्यांनी त्या माणसाला बेदम मार दिला. त्यानें " पोलिस ! पोलिस ! वांचवा ! " म्हणून टाहो फोडला, कांहीं माणसं धांवली. मीही काय आहे तें पहायला गेलों, पण आम्ही पोंहचेपर्यंत ते उडाणटप्पू लोक पसार झाले. कुणी पोलिस असलाच तर तो तिकडे फिरकला नाही.

तो मार खाल्लेला गृहस्थ म्हणत होता, ' अहो, मी तिच्या मावशीचा नवरा ! तिला आमच्या घरी जेवायला चल म्हणत होतों. ती नको म्हणून पुढं गेली, नि मी घराकडे जाऊं लागलों–तितक्यांत हे मवाली येऊन मारायला लागतात नि म्हणतात " खबरदार ! त्या पोरीला छेडलंस तर ! ती दादा मल्लूची आहे समजलास ! "

त्या माणसानं विव्हळत उच्चारलेले ते शब्द ऐकूण छदामवाडी-कर सर्द झाले. याउप्पर मजिरेकडे डोळा वर करून पहायची हिमत नाही कुणाची, असें माझ्या शेजारचा गादीवाला दत्ताराम म्हणाला. वाडीतील जबरदस्त मवाल्यांच्या टोळीचा म्होरक्या मल्लू याच नांव आणि चरित्र मी त्या दिवशी प्रथम ऐकलं !

आणि त्याच रात्री त्याची माझी मुलाखत झाली ! मंजिरा कोणाची हें खुद्द तिच्याकडूनच समजल्याशिवाय माझं समाधान होणार नव्हतं. रेडीओ देण्याच्या सबबीवर मी मंजिरीच्या घरीं गेलों आणि तिला थोडं घराबाहेर बोलावून तिच्या मावशीच्या नवऱ्याला मिळालेल्या माराची हकीकत कळवून ते मवाली काय म्हणाले हें जेव्हां मी तिला सांगितलं, तेव्हां ती एकदम रुसून म्हणाली, ' छी, ही गोष्ट फुटली, आतां मल्लूशी लगीन केलंच पाहिजे मला ' हें ऐकूनही निराश न होतां मी तिला सुचवून

पाहिलं कीं, जरा माझा विचार कर तेव्हां-"तुम्ही मला भावा-सारखे" म्हणून ती आंतदेखील गेली.

विषण्ण मनानं परत दुकानाकडे जात असतां माझ्याकडे एका अंधेऱ्या कोपऱ्यांतून हळूच एक मनुष्य आला. इकडेतिकडे सावध-पणें नजर ठेवीत माझ्या बरोबर चालत चालत तो हलक्या आवा-जांत गुरगुरला, "ए रेडिओमास्तर, याद राख, त्या पोरीशीं जास्त आगाऊपणा करूं नकोस. नाहींतर या दादा मल्लूशीं गांठ आहे. समजलास ? " बोलतां बोलतां माझ्या खांद्यावर ठेवलेल्या हातानं त्यानं माझी गर्दन अलगद पकडली होती. आणि दुसऱ्या हातांतल्या एका मोठ्या उघडलेल्या चाकूशीं तो चाळा करीत होता ! मी हजरजबाबीपणानें म्हणालों " छे छे, मल्लूदादा, ती तुमच्याशीं' लगीन करणार असं तिनं आतांच मला सांगितलं. मी तर तिचा भाव. तुमच्या बाजूचा. कधी काही काम लागलं तर जरूर बोलवा! ' असं म्हणून त्या वेळेपुरता तरी मी त्याच्या हातुन निसटलों. पण तेव्हांपासून नको म्हटलं तरी छदामवाडीच्या छटांशीं माझा संबंध आधिक आधिक यायला लागला.

आणि त्याला कारण ती मंजिरा. मित्रा, प्रेमांत हरलेल्या सर्व उमेदवारांना माझा संदेश आहे की, एकदां निकाल कळल्यानंतर मनाचा उदासपणा वगैरे दाखवण्याच्या खोटचा भरीस पडून हुक-लेल्या प्रेमदेवतेच्या जवळपास त्यानीं एक मिनिटभरदेखील राहू नये. नाहीतर " भाऊ भाऊ " म्हणून तिनं त्यांना ढोरमेहनतीला जुंपलंच समज. ' बनशीभाऊ ' म्हणून लाडिकपणें म्हणत म्हणत माझ्याकडून मंजिरेन इतके कष्ट करवून घेतले की, तितक्या राब-णुकीनं मी माझा धंदा तरी उर्जितावस्थेला आणला असतां. तिचं मल्लूशीं लग्न मुंब्र्याच्या जंगलांत मोठ्या थाटांत झालं. त्या दिवशीं मुंबईत बहुतेक मवाली गैरहजर होते. कारण ते त्या लग्नाला आले होते ! दोनतीन दिवस नुसता जल्लोश उडाला होता आणि त्या उत्सवांत जिवाचा आटापिटा करून प्रसंगीं पाणीदेखील भर-णारा हरकाम्या कोण, तर नवरीचा ' बनशीभाऊ ! ' परत छदाम बाडींत गेल्यावर मंजिरेशीं ओळखदेखील ठेवायची नाहीं, असा मी

निश्चय केला होता. पण झालं कांहीं वेगळंच.

लग्नानंतर आठ दिवसांतच मुंबईत दंगल झाली. मवाली लोकांना धरधरून पोलिसांनीं अटकेंत तरी ठेवलं किंवा तडीपार केलं आणि त्यांतच छदामवाडीच्या छटांचा दादा मल्लू दोन साथीदारांसह तीन वर्ष मुंबईतून हद्दपार झाला. त्यानं जातांना मला दम देऊन ठेवला कीं, मंजिरेला तुझ्यावर सोंपवून जातो आहे, संभाळून रहा. अजून टोळींतले तिघे वाडीतच आहेत." यामुळें मला नेहमी भीति होती कीं, मंजिरेनं कधी बोलावणं पाठवलं तर आपल्याला जावं लागणार. तरी मी जाणं टाळीत होतों आणि मंजिरेच्या दिमतीला आतां खुद्द टोळीतलेच उरलेले लोक असल्यामुळें माझं तिला कधीं काम लागण्यासारखं नव्हतं.

मी तुला सांगितलंच कीं सध्यां नोकरींतून काढलेल्या पोलिसांपैकीं कित्येकजण छदामवाडी सेक्शनला त्या वेळीं होते. दादा मल्लू तडीपार असला तरी त्याचे तीन साथीदार जान, बाबू व रिंग्या वाडींत होतेच. म्हणजे टोळीच राज्य तिथें निर्वेधपणें चालू होतच. टोळीला करपट्टी दिल्याखेरीज वाडीच्या हद्दींत कसल्याही प्रकारचा गुन्हा करण्याची कोणाची हिंमत नव्हती. पागडी घेणाऱ्या मालकापासून बारीक सारीक भुरट्या चोरापर्यंत सर्वांना टोळीला टक्केवारी द्यावी लागत होती. त्यामुळें छदामवाडीतल्या छटांची कमाई चांगली राहून घरं भरभराटीत चालली होती. दहाबारा वेगवेगळ्या नंबरप्लेटी असलेली एक मोटरदेखील टोळीनं ठेवली होती आणि मल्लू गेला तरी बाकीची टोळी ती गाडी वापरत होती. मलादेखील कधी कधी नेत होते फिरायला. मल्लू-मंजिरेच्या लग्नांत अंग मोडून काम केल्यामुळें मला टोळीवाले आपल्यांतलाच एक मानीत होते. अज्ञातवासांतल्या आपल्या पुढाऱ्याकडून त्यांनींच मला निरोप कळवला होता कीं, "मंजिरेची खबर घेत रहा, नाहींतर बघ !" अशा अिमानी साथीदारांकडूनच छदामवाडीला हळुहळू माहीत झालं होत कीं, तडीपार असला तरी दादा मल्लू नेहमी गांवात येऊन रात्री गुप्तपणे आपल्या बायकोला भेटत असतो. खुद्द मल्लूच ही बढाई मुंबईबाहेरच्या अितर हद्दपार दादा

लोकांपुढें मारीत होता. शहरभर रहस्यकथाप्रेमी लोकांत ही कौतुकाची आख्यायिका झाली होती की, छदामवाडीच्या छटांचा म्होरक्या सुप्रसिद्ध दादा मल्लू तडीपार असूनहि ठकसेन राजपुत्रासारखा रात्रीचा येऊन आपल्या बायकोची भेट घेऊन जातो. त्या दिवसांत वाडीकरांना आपल्या मवाली दादाबद्दल मोठा अभिमान वाटत होता. असं सुमारें वर्ष लोटलं.

एकाएकी पोलिसांनीं छदामवाडीवर कडक पहारा सुरू केला ! छदामवाडींतल्या छटांना फार संभाळून रहाण्याची वेळ आली. तेवढयांतच शहरांत एक खोटया नाण्यांची टांकसाळ सापडली आणि तिथें अटक झालेल्यापैकी एका माफीच्या साक्षीदारानं पोलिसांना माहिती दिली की, जवळ जवळ वर्षभर नेहमीं येथे जमणाऱ्या लोकांत छदामवाडीचा दादा मल्लूही येत असे ! पोलिसांनी मल्लूला शहरच्या हद्दीबाहेरून पकडून आणून त्याच्यावर पुष्कळ आरोप ठेवले. त्यांतला हद्दपारीचा हुकूम मोडण्याचा वहीम असा होता कीं, तेवढा एक नाशाबीत झाल्यास बाकीचे सर्व आरोप आपोआप नाशाबीत व्हावेत. वकिलाच्या अशा सल्ल्यावरूनच मल्लूनं जोरदार बचाव दिला होता की, आपण एकदां तडीपार झालेले परत कधी गांवांत आलोंच नाही. माफीचा साक्षीदार अदावतीनं खोट बोलत आहे. आपण कायम शहरच्या हद्दीबाहेर होतों. हें सिद्ध करण्यासाठीं कल्याण गांवांत मल्लू वर्षभर रात्रंदिवस आमच्या नजरेसमोर होता असं शपथेवर सांगणारे दहाबारा साक्षीदारही मल्लूनं दिले होते. तथापि त्याला जामिनावर सोडलेलं नव्हतं. खटला चालू असतांना तुरुंगांत त्याला भेटायला गेलेल्या जाननें मला येऊन ही सगळी किचकट कायद्याची भानगड सांगितली. पण तिकडे मी फारसं लक्ष दिलं नाहीं. पण त्यानं हेंही सांगितलं की, मल्लू तुझ्यावर फार नाराज आहे. कारण, वर्षभर तू मंजिरेची विचारपूस केली नाहीस.

मल्लू सुटणार ही सर्वांची खात्री होती. तो पुन्हा वाडींत येईल व तो तुरुंगांत असतांना मी मंजिरेकडे चौकशी केली नाहीं हे त्याला कळलं तर आपल्या नामर्जीचा प्रसाद मला दिल्याखेरीज

तो राहणार नाहीं, या भयानं मी मंजिरेकडे जायचं ठरवलं. तिला भेटून तिच्याकडून कांहींतरी वस्तू मल्लूला नेऊन द्यावी म्हणजे त्याला बरं वाटेल, या विचारानं मी तिच्या बिऱ्हाडी काल गेलों; तिथं समजलं कीं, मंजिरा हॉस्पिटलमध्यें गेली आहे. काय झाल असावं या काळजींत मी हास्पिटलांत गेलों, तों तिथं कळलं की, मंजिरा नुकतीच बाळंत होऊन तिला पुत्ररत्न झालं !

या आनंदाच्या बातमीपेक्षां मल्लूला नेऊन देण्यास योग्य दुसरी गोष्ट कुठली ? या कल्पनेनें उत्तेजित होऊन मी तावडतोब पांच रुपयाचे पेढे विकत घेतले. ज्या कोर्टात मल्लूचा खटला चालू होता तिकडे धांवत गेलों. स्वतःच्या कल्पकतेवर मी अगदी खूष होतों. पुत्रजन्माची वार्ता कळविण्याच्या आनंदांत मी इतका बेहोष झालों कीं, कोर्टात पोंहोचतांच तिथल्या गंभीर वातावरणाची पर्वा मला राहिली नाही. पेढ्यांचें शिप्तर उंच उचलून मी कोर्टाला सलामी दिली आणि विजयी स्वरांत ओरडलों, " साहेब! आरोपीला आतांच मुलगा झाला. त्याबद्दल मिठाई वाटण्याची मंजुरी व्हावी" कोर्ट एकदम निःस्तब्ध झालं. माझ्या बेअदबीची दखल न घेता मॅजिस्ट्रेटसाहेब सरकारी वकिलाकडे पाहूं लागले. तो हसूं दाबीत होता. मल्लूचा वकील कपाळाला हात लावून मटकन् खाली बसला. कोर्टात हंसण्याची लकेर उठली. आरोपीच्या पिंजऱ्यांतून मल्लू खुनी नजरेनं माझ्याकडे पाहू लागला. जान, बाबू व रिग्या यांनी क्षणभरच "आ" करून माझ्याकडे पाहिलें आणि तिघेही एकदम माझ्या अंगावर धांवले. पेढ्याचें शिप्तर तेथेंच टाकून मी जीव घेऊन पळालों.

पळतां पळतां माझ्या लक्षांत आलं आणि त्यामुळं मी जास्तच जोरानें पळालों. 'गेल्या वर्षात आपण तडीच्या एलबाजूला शहरांत एकदांही आलो नाही,' असा बचाव देणाऱ्या आरोपीला मुलगा झाला आणि तोही शहरांत रहाणाऱ्या त्याच्या बायकोच्या पोटीं, ही बातमी कोर्टात जाहीर होण्याचा परिणाम काय ?

आजच्या पेपरमध्यें सगळ आलं आहे की, कालच्या काल सबंध केसचं स्वरूप एकदम कसं बदलून गेलं. आपण शहरांत येत

होतो हें मल्लूनं घाईघाईनं कबूल केलं. त्याचे साक्षीदार लॉक-अपमध्यें गेले. त्याच्या वकिलानें तहकुबी मुदत मागितली वगैरे वगैरे. पेपरमध्यें नाहीं आलं एवढंच की, तिघे चेवलेले मवाली मला कापून काढण्यासाठी माझा शोध करीत हिंडत आहेत. आणि म्हणूनच मी कालपासून भूमिगत आहे-"

हे म्हणता म्हणतांच बन्या चटकन् टेबलाखाली दिसेनासा झाला. मी भोवतांली पाहिले, तो हॉटेलच्या मुख्य दारांत दोनतीन कठोर मुद्रेचे लोक जाणाऱ्या येणाऱ्याकडे बारीक नजरेनं पहात उभे होते. बन्याने टेबलाखालीच तोंडावर पुन्हां दाढी व चष्म्याचे झाकण चढवलं आणि खालच्या खालीच रांगत सरपटत जाऊन त्याने बाजूच्या दारांतून शिताफीनं पोबारा केला. त्याच्यामागे "शुकशुक" करीत निघालेल्या बॉयला मी झालेले पैसे देऊन गप्प केलं आणि पुढच्या दारानं बाहेर पडलों. दारापुढले निदान दोघे तरी छदामवाडींतल्या छटापैकीं असावेत. बहुतेक एक जान व दुसरा रिग्या असा मी तर्क केला.

◆◆ ◆◆

## कोल्हा व करकोचा

एके समयीं करकोच्यास बनवावे या हेतूने कोल्ह्यानें त्याला मेजवानीस बोलावलें. पण पूर्वी आपण द्राक्षाचा घड तोडल्यावर तो झेलून कोल्हा कसा चालता झाला हे करकोच्याच्या लक्षात होते; तो बरोबर एक पोकळ बोरूची नळी घेऊन जेवावयास कोल्ह्याकडे गेला, आणि जेव्हा कोल्ह्यानें उथळ थाळ्यांत आंबरस वाढून त्याला जेवाणाचा आग्रह केला तेव्हा करकोच्यानें शांतपणे पंखाखालून नळी काढली व तिच्याद्वारा भरपूर आंबरस शोषून घेतला. जेवण झाल्यावर तो कोल्ह्यास म्हाणाला, 'मित्रा, जेवण तर उत्तम झालें. आतां याबदलीं मी तुला परत जेवावयास बोलावीन अशी आशा असेल तर ती मात्र व्यर्थ आहे. रामराम.'

तात्पर्य : धूर्तपणाचा मक्ता कोल्ह्यासच आहे असें नाही. अनुभवाने करकोचाहि लबाडी शिकतो.

: ९ :

## महामुंबईंत यक्षप्रश्न

पांडव वनवासांत इतके रमले कीं बारा वर्षेंच नव्हे तर साठ संवत्सरांची एकशेवीस आवर्तनें लोटलीं तरी त्यांना परत जाऊन राज्य मागण्याची आठवण राहिली नाहीं. वनवासाच्या शेवटीं अज्ञातवासाचें एक वर्ष आहे ही एक अधुक जाणीव फक्त धर्मराजांना होती. प्रत्यक्ष अज्ञातवासाच्या अगोदर त्याची थोडी प्रॅक्टीस व्हावी या हेतूनें वनवासाच्या एकाहत्तरगेव्या वर्षी धर्मराजांनी संसाराचा टापू महामुबईच्या आसपास आणला होता. मुंबईत अज्ञातवासाचा अभ्यास व सराव सहज होईल अशी त्यांना खात्री होती. त्या धोरणानुसार लौकरच युधिष्ठिरानें मुत्सद्देगिरी लढवून कोलभाट गल्लींत एक जागा मिळवली व 'वाय्. पी. कुरुवंशी' अशी पाटीहि दारावर लावून टाकली. त्याचप्रमाणें मोटा लाल शेटजींकडे स्वतःसाठीं इस्टेट मॅनेजरच्या नोकरीचें जमवून, भीमाला एक हॉटेल काढून दिलें, अर्जुनाचा नाचाचा क्लास सुरू करून दिला, नकुलाला सप्लाय डिपार्टमेंटमध्यें चिकटवला आणि सहदेवाचें नाव परळच्या घोडाडॉक्टरकीच्या कॉलेजांत घातलें. द्रौपदीचा रेशनिंगमध्यें नोकरी धरण्याचा हट्ट मात्र धर्मानें मुळींच चालूं दिला नाहीं. तथापि भीमाच्या हॉटेलांतून राईसप्लेटची

आयती सोय झाल्यामुळें ती सदा रिकामी राहते हें पाहून धर्मानें तिचें नांव नर्सिगच्या कोर्सला घातलें.

थोड्याच दिवसांत धर्मराजाला आढळून आलें कीं मैत्रिणींच्या संगतीनें द्रौपदीला सिनेमा पाहण्याची चटक लागली आहे. तिची कानउघाडणी करण्याची युधिष्ठिराला सोयच नव्हती, कारण बहुतेक वेळ तीच त्याची कानउडणी करीत असे, तेव्हां त्यानें मार्ग काढला कीं तोंडओळखीच्या मैत्रिणीबरोबर सिनेमाला जाण्यापेक्षां तिनें पांच पांडवांपैकीं कुणालातरी बरोबर घेऊन सिनेमाला जाणें बरें. अशी घरचीच सोय मिळाल्यावर काय, द्रौपदीच्या उत्साहाला सीमाच राहिली नाहीं. बड्या बम्बईत साठाच्यावर सिनेमा आहेत आणि दर आठवड्याला दोन तीन नवीं चित्रें लागतातच. तेव्हां एकही दिवस सिनेमा पाहणें चुकवायचें नाहीं असें ठरवून द्रौपदीनें सोमवारी अर्जुन, मंगळवारीं भीम, बुधवारीं नकूल, गुरुवारी सहदेव आणि उरलेल्या दिवशीं युद्धिष्ठिर असे पांडव बरोबर घेऊन जाण्याचा कार्यक्रम आंखला. सुरुवातीसुरुवातीला बहुतेक पांडव तिच्याबरोबर बिनतक्रार जात असत, पण पुढेंपुढें त्यांतला एकेक कंटाळू लागला. अर्जुन म्हणाला मला फिल्म कंपनींतून डान्स डिरेक्टरची ऑफर मिळण्याचा संभव आहे तेव्हां मला वेळ रहाणार नाहीं. नकुलानें ऑफिसांत काम वाढल्याचा बहाणा केला व सहदेवानें अभ्यास फार आहे म्हणून सांगितलें. कारण या तिघांच्या एक गोष्ट अशी लक्षांत आली की रोज वेगळ्या पुरुषाबरोबर सिनेमाला येणाऱ्या बाईबरोबरचा या वारचा माणूस असें त्यांना लोक ओळखू लागले होते. भीमानें जरी चुकारपणा केला नाहीं तरी तो द्रौपदीबरोबर सिनेमाला गेला म्हणजे शेजारी अस्ताव्यस्त पसरून मोठमोठ्यानें घोरूं लागे व त्यापेक्षां याच्या बरोबर जायला नको असें द्रौपदीला होई. उरतां उरले धर्मराज. स्वतःला कितीहि त्रास पडला तरी द्रौपदीबरोबर दुसऱ्या कोणापेक्षां कुणीतरी एक पांडव सिनेमाला गेलेला श्रेयस्कर हा पोक्त विचार करून धर्मराज मात्र द्रौपदीबरोबर नेहमी जाण्यास तयार असत. महिनान् महिना रोज सिनेमा पाहणें ही द्रौपदीला कंटाळा

न आणणारी करमणूक असली तरी युधिष्ठिराला ती एक वेट वाटू लागली होती. पण त्या धिम्या गृहस्थानें आपला धीर सोडला नाही किंवा शांति ढळू दिली नाहीं. स्वतःला बिलकूल गोडी वाटत नसलेली गोष्ट केवळ बायकोसाठीं महिनेन महिने चालू ठेवायाची, या अखंड व्रताचें फळ मिळाल्याशिवाय कसें राहील? द्रौपदीबरोबर रोज सिनेमा पाहून झालेले सचित धर्माला अचानकपणें एकदां कसें फलदायीं झाले हे या रोमहर्षक हकीकतीवरून कळून येणार आहे. सुट्टीचा दिवस होता सगळे पांडव घरीच होते. युधिष्ठिर मोटालाल शेटजीचें हिशेब लिहित होता. पंजाबी सलवार कुरता घालून पायांत पैंजणें बांधलेला, मानेइतकें केंस कापलेला अर्जुन टिचक्या वाजवीत वेडीवाकडी पावलें टाकून पाहात होता. (त्याच्या खिडकीमधून डोकावून जाणारे चाळींतले पुरुषशेजारी तें दृश्य पाहून गोरे मोरे होऊन निघून जात होते—आणि तरुण पोरी काहीतरी निमित्त काढून कुरुवंशीच्या दारावरून जात येत होत्या.) भीमानें त्या दिवसाचे सर्व वडे, कचोऱ्या, पेटीस, चपात्या व अशा जिनसांची बनावट एका दमांत उरकून टाकल्यामुळें तो विश्रांतीसाठीं एका खणभर जागेंत हातपाय पसरून झोंपला होता. नकुल केस विचरीत होता व सहदेव गुराच्या रोगावराल एक पुस्तक वाचीत होता.

एकदम दोन गाळ्यांपलीकडचे एक वयस्क भाडेकरी दादा उपाध्ये दारांत येऊन उभे राहिले,

"बुडालों, अहो कुरुवंशी, साफ बुडालों. माझा स्टो गेला हो" ते हताशपणे म्हणाले.

"असं कस झालं ?" युधिष्ठिरानें शांतपणें विचारलें.

"मी नेहमींप्रमाणें उजेडांत पिन करायला तो बाहेर घेऊन आलो, पिन घरांतच राहिली म्हणून दारापुढं स्टो ठेवून घरांत गेलों, पिन घेऊन बाहेर येतों तो स्टो नाहीं ! पुढं होऊन आजूबाजूला पाह्यलं, तो जिन्यावरून एक मनुष्य चटकन् उतरून जात होता आणि तो पिशवींत कोंबीत होता तो माझा स्टोव होता असं मला नक्की वाटतं."

"कोण माणूस होता तो ? त्याचा पाठलाग करायचा कीं नाहीं ? आरडा ओरडा तरी करायचा होतात–"

"अहो तो दिसला न दिसला तोच नाहीसा झाला. पुन्हां 'चोर चोर ' ओरडायचं कसं ?, तो तोंडओळखीचा माणूस आहे माझ्या–काळवीट त्याचं नांव. तो त्या चोवीस नंबरातल्या हरणाबाईकडे येतो कधींकधी त्याने मागें एकदोनदां माझ्याकडे रद्दी, बाटल्या, जुनी गोणपाट, असं सामान घेतलं आहे. त्याला चोर म्हणायचं कसं–पण डोळ्यांदेखत की हो स्टो घेऊन गेला बिचारा! माझा स्वैपाक सारा त्या एका स्टोवर. घरांत शेगडी देखील नाही मी दुसऱ्या कुणाच्या हातचं खात नाही. तो स्टो मिळेपर्यंत किंवा पुन्हां पस्तीस चाळीस रुपये मोजी पर्यंत उपासमारच आमची." अगदीं कष्टी होऊन दादा उपाध्ये दारांत सटकन् खाली बसले.

ते बसले पण युधिष्ठिर ताडकन् उभा राहिला, "छे छे उपाध्ये महाराज, असा धीर सोडू नका. आम्ही एवढे पांच भाऊ इथें असतांना कुणाला असा अन्याय होऊं देणार नाही. तुम्हीं फळे वगैरे खाऊन एक वेळ काढा. आम्हीं संध्याकाळपर्यंत तो स्टो मिळवून देतो"

धर्मराज इतक्या विश्वासानें बोलले की दादा उपाध्यांना एकदम धीर आला. त्यांचा चेहरा थोडा खुलला. "देव तुमचं भलं करो. मी दूध, केळी असं कांहीतरी घेऊन क्षुधा भागवतो. देव करो नि तुम्हाला संध्याकाळपर्यंत तो स्टो हस्तगत होवो." म्हणून ते घरीं गेले.

युधिष्ठर मोटालाल शेठजींचा एस्टेट मॅनेजर उगीच नव्हता दादा उपाध्यांना 'तुमचा स्टो संध्याकाळपर्यंत परत मिळवून देतो' असे निश्चयपूर्वक आश्वासन देण्यांत त्यानें आपल्या कुवतिपलिकडचे काम अंगावर घेतलें असे मुळीच झालें नाही. त्याची सर्व योजना तयार होती. प्रथम नकुलाला हरणाबाईकडें पाठवून काळवीट कोठें राहतात ही माहिती त्यानें काढली. कांदिवली–बोरिवलीच्या बाजूस कृष्णगिरी उपवनाच्या रस्त्यावर काळवीट यांची जुन्या मालाची वखार आहे असा पत्ता लागला. वेळ न गमावतां तिकडे

जाण्याची धर्मराजानें तयारी केली व अर्जुनाला साधे कपडे घालून बरोबर चलण्यास सांगितलें.

"दादा तुमचा बेत काय आहे तो कळेल का ?" अर्जुन अनुत्साहीपणें म्हणाला. "माझी नवी पावलं बसवायचीं आहेत मला. 'बृहन्नड–पथ' म्हणून एक मोठी नृत्यरचना आंखली आहे मीं–"

"ती राहुं दे आजच्या दिवस, नेहमीचे बाहेर जाण्याचे कपडे चढव नी माझ्याबरोबर चल."

"पण त्या काळविटाकडे मी कशाला ? तिथें काय शरसंधान करायचं आहे ? तुम्हीं आपली ममजूत घालण्याचं तंत्र चालवा कीं त्याच्यावर."

"मीं त्याचं मन वळवून त्याला स्टो परत द्यायला प्रवृत्त करण्याचा सर्व प्रयत्न करीनच, पण तूहि बरोबर असावास."

"मग भीमाला घ्या."

'उत्तम कल्पना, त्यालाहि घेऊं.'

"छान ! तुमचं काय जातं दादा उत्तम कल्पना म्हणायला" भीम उपरण्याखालूनच झोंपाळू आवाजांत गुरगुरला, "आमचे रट्टे दुखताहेत अजून पोळ्या लाटून–आतां भर दुपारी तिकडे बोरिवली–कांदिवलीकडे धडपडत जायला मीं साफ तयार नाहीं."

"ह्या कृष्णगिरीजवळच्या एका हॉटेलांतले मावालाडू प्रसिद्ध आहेत." धर्मराज भीमाचें मन वळविण्याच्या प्रयत्नांत म्हणाले.

"साठसत्तर तरी मावालाडू त्या जंगलातल्या दुकानांत सांपड-तील ?" भीमसेन तोंडावरचें उपरणें काढून धर्मराजाकडे रोखून पाहात म्हणाला.

"नक्की. शिवाय भाड्याच्या मोटारनें जाण्याचा विचार आहे माझा–"

"मग आम्ही काय पाप केलं आहे ?" नकुल–सहदेव एकदम म्हणाले.

"ठीक आहे तुम्हीहि चला. भाड्याची मोटर म्हणजे आमच्या शेठजींचीच. त्यांना नको असते तेव्हां ती भाडं करते. ती घेतो

मागवून आणि--बरी आठवण झाली, जोगेश्वरीला शेठजींची वाडी आहे एक. तिचीहि पाहणी करून टाकूं. म्हणजे मोटारभाडें खर्च टाकतां येईल. शेठजीच्या मोटरला त्यांना स्वतःलाच भाडें द्यायला लावू. चला रे, करा सगळे निघण्याची तयारी. सुदैवानें द्रौपदी 'झनाना शो'ला गेली आहे. किल्ली शेजारीं देऊन ठेवा रे जायच्या वेळेला. आणि द्रौपदीला आपण कुठं गेलों होतों वगैरे कांहीं बोलू नका बरं का रे कुणी--तिला सोडून आपण कृष्णगिरी उपवनाकडे गेलों हें कळलं तर ती महिनाभर मला सुखानं झोपूं द्यायची नाहीं."

पांडव कृष्णगिरी उपवनाकडे काळविटानें पळविलेलें अग्नियंत्र परत मिळविण्यासाठी गेले, पण तो स्टो परत मिळवून आणणें हा मुद्दा अगदीं गौण ठरावा असा एक विस्मयजनक अनुभव त्यांना तिकडे आला. त्यामुळें काळविटाकडून स्टो पुन्हा हस्तगत करणें ही त्या दिवशीं होऊन गेलेल्या इतर मामुली घटनांपैकीं एक ठरली. वास्तविक नंतरचा भयचकित करणारा प्रकार घडला नसता तर पांडवांनीं दादा उपाध्यांचा स्टो काळविटाकडून परत कसा मिळवला हा रसभरीत इतिहास ठरला असता. प्रथम धर्मराजांच्या सात्विक प्रयत्नांना काळविटानें कशी भीक घातली नाहीं, अर्जुनाचा त्यानें ग्राम्य उद्‌गारांनीं कसा अपमान केला, अखेर भीमानें त्याला स्टो परत करण्याचें महत्त्व 'इतर मार्गांनीं' कसें पटवलें, व त्या रात्रीं स्टो परत मिळाल्यावर दादा उपाध्यांना पुत्रजन्माइतका आनंद झाल्यामुळें द्रौपदीला सारें कसें कळलें, व ती धर्मराजांना 'आपल्यामागें भावाभावांनीं जाऊन मजा उडवण्याबद्दल' किती शब्द बोलली वगैरे सारें 'किरकोळ स्वरूपाच्या घडामोडी' या सदराखाली येण्याइतका तो नंतरचा विलक्षण मामला होता.

नंतर जें घडलें तें धर्मराजांच्या फाजील शहाणपणामुळें घडलें अशी अर्जुनाची अजून तक्रार आहे. तो म्हणाला कीं स्टो मिळाला, शेटजींच्या जोगेश्वरीच्या वाडीची पहाणी झाली. नंतर उन्हं उतरली आहेत, मोटार पाठऊन देऊं व आपण स्टेशनपर्यंत चालत जाऊन

रेलवेनें परत जाऊं, जरा व्यायामही होईल, ही मूर्ख कल्पना केवळ वडीलकीचा फायदा घेऊन युधिष्ठिरानें चालवली नसती तर नंतरचा सगळयांच्या जिवावरचा प्रसंग टळला असता. पण धर्मराजांनी तसें केलेंच. 'परत जाण्याचें मोटारभाडेंही वाचेल' असें पुटपुटत त्यांनीं ड्रायव्हरजवळ दादा उपाध्यांचा रुटो देऊन त्याला परत जाण्यास सांगितले व कृष्णगिरी उपवनाच्या कडेकडेने सगळयांत जवळच्या स्टेशनकडे रपेट करीत जाण्याचा बेत बंधूना जाहीर केला. कृष्णगिरी बाजूच्या रस्त्यावद्दल वाटेत भेटलेल्या माणसाजवळ धर्मराजानें जी चौकशी केली त्यावेळी त्या माणसाने 'अश्मगिरी' ऐकल्यामुळे मंडळी भलत्याच रस्त्यानें निघाली व चुकलेले पांडव बरीच पायपीट करून अखेर दिवेलागणीनंतर एका कुठल्या तरी स्टेशनच्या जवळपास आले. एका ओढ्यावरल्या पुलाच्या कट्ट्यावर सर्व मंडळी टेकली. रस्ताभर भीमसेन 'मावा-लाडूच्या थापा देऊन तंगडतोड करायला लावली, भूकेनें ओरडायची वेळ आली आहे, घसा कोरडा पडला,' वगैरे तक्रारी करीत आला होता. भाऊभाऊ पुलावर बसले तेव्हां धर्मराज म्हणाले, खरोखरच सर्वांना तहान लागली असेल. ती तिथे ग्यासची बत्ती आहे तें हॉटेल दिसत आहे. सहदेवा, जा त्या हॉटेलांत जाऊन पोऱ्याबरोबर सगळयांना सोडा लेमन आणव.'

'मला सहा नारंगी सांग' भीमानें बजावले.

सहदेवाला जाऊन चांगली पंधरा मिनिटें झालीं तरी त्याचा पत्ता नाही, हें पाहून नकुल त्याच्या शोधाला गेला. आणखी दहा पंधरा मिनिटे गेलीं तेव्हां दोघांनाही काय झालें हें पहायला भीमसेन क्रुद्धपणें पुटपुटत त्या ग्यासच्या बत्तीवाल्या हॉटेलकडे गेला. तोही परत येईना, तेव्हां मात्र धर्मराजानें अर्जुनाला सांगितलें कीं पार्था, तू जा आणि ते येत नसले तर हॉटेलच्या बाहेर येऊन मला खूण कर. अर्जुन गेला पण तोही बाहेर आला नाहीं. हे लोक– विशेषतः भीम –हॉटेलांत खाण्याच्या पदार्थांवर ताव देत बसले असतील असा प्रथम युधिष्ठिराचा अंदाज होता पण अर्जुन तरी त्यांना सामील होण्याआधीं निदान आपल्याला इशारा करील

असा त्यांना भरंवसा होता. जेव्हां अर्जुनही अदृश्य पांडवांत जमा झाला तेव्हां मात्र धर्मराज उठले व स्वतः काय झालें त्याची चौकशी करायला त्या हॉटेलकडे गेले.

त्या हॉटेलवर मराठी व गुजरातींत लिहिलेली बाहेरची पाटी धर्मराजांनीं अगोदर वाचली.

मराठी—

**येक्स सर्वर सोडा-लेमन हाउस**

**बिगर अबकारी पिण्याची दुकान**

गुजराती —

**यक्ष सरवर सोडा-लेमन हाऊस**

**नशा रहीत पीणू मळवानूं चोख्खूं आने भरोसापात्र मथक**

काउंटरवर टोपीपासून चपलांपर्यंत धुवट पांढरा पोषाक घातलेला एक किडकिडीत इसम एक पाय खुर्चीवर उचलून घेऊन ध्यानस्थ बसला होता. एक दोन मळकट पोऱ्ये आपापसांत कुजबुजत हास्य-विनोद करीत होते. हॉटेलांत कोणी गिऱ्हाईक दिसत नव्हतें. अंधाऱ्या कोपऱ्यांत टेबलावर डोकें टेंकून कुणीतरी बसला होता.

बाहेर रस्त्यावर उभें राहून धर्मराजानें हात जोडून काऊंटर-वरच्या माणसाला विचारलें, "शेठसाहेब मि. येक्स सरवर आपणच कां?" त्या माणसानें एक डोळा उघडून मानेनें नकार दिला.

'या दुकानाचे मालक?' धर्मानें नम्रतेनें पुसलें. शुभ्रवेशधारी माणसानें उघडलेला डोळा मिटून मिटलेला उघडला व पुन्हा हातानें नकार दर्शवला. "ना भाई, आमी तें मेनेजर, आमच्या नाव बगला हाय, भगतजी बगला." म्हणून त्यानें दोन्ही डोळे मिटले.

इतक्यांत एका पोऱ्यानें धर्मराजाला खुणवलें व टेबलावर डोकें टेंकून बसलेल्या माणसाकडे निर्देश केला. युधिष्ठिरानें कुलस्वामिनीचें स्मरण करून हाटेलांत प्रवेश केला व त्या माणसाजवळ जाऊन हात जोडून ते म्हणाले, 'महाराज'

हाटेलच्या अंधाऱ्या भागांत टेबलावर डोकें ठेऊन आराम करणाऱ्या त्या माणसानें हळूहळू वर डोकें केलें. धर्मानें छाती-

जवळचा नमस्कार कपाळाला टेकवून पुन्हां त्याच्याकडे कृपायाचक दृष्टीनें पाहिलें.

" महाराज, आपण या हॉटेलचे मालक, " धर्म हृदयपरिवर्तकाच्या आर्जवी आवाजांत म्हणाला, "आपण येथें कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुम् असे सर्वाधिकारी आहांत. थोडचा वेळापूर्वी माझे चार सुकुमार भाऊ—निदान तीन सुकुमार व एक धष्टपुष्ट असे चार भाऊ, एकामागुन एक या हॉटेलांत शिरले. ते आतां दिसत नाहींत. त्यांचें काय झालें तें एक तुम्हीच मला सांगू शकाल. अशी माझी अंतर्धुन सांगत आहे. "

हें बोलत असतां युधिष्ठिराच्या हळूहळू एक गोष्ट लक्ष्यांत आली कीं समोरची व्यक्ति कांहीं साधीसुधी नाहीं. तो एक चांगला मलेलठ्ठ, मजबूत दुहेरी हाडापेराचा असामी असून त्याच्या कपाळाची उंची सुमारें दोनच बोटें होतीं. त्याची नैसर्गिकपणें उग्र असणारी मुद्रा कांहींतरी कारणाने आणखी उग्र दिसत होती. त्याचे टपोरे पिंगट डोळे लाल होते, त्याच्या चेहऱ्यावर व विशेषत: झाडाच्या बुंधासारख्या नाकावर ताम्रच्छटा पसरली होती. त्याच्या डोक्यावरचे, डोळ्यांवरचे, नाकातले, गंजिफ्राकांतून डोकावणारे व गाजरासारख्या बोटांवरचे सारे पिंगट केस मधूनमधून वळवळून चमकत होते. कारण तो नाकातोंडानें, त्याच प्रमाणें रध्रारंध्रानेंही धांपा टाकीत होता. त्याच्या धापांनी कसलातरी उग्र अंबुस दरवळ उधळत होता.

श्री. येक्स सर्वर ( किंवा शेठ यक्ष सरवर ) यांनी 'परमिट' काढलेला नसेल तर त्यांनी मुंबईराज्याच्या एका महत्त्वाच्या चालू कायद्याचें उल्लंघन केलें आहे, बाहेरच्या पाटीरवरचें पेयांचें वर्णन त्यांच्या पेयाला लागू होण्यासारखें नसावें, हा सनदशीर संशय धर्मराजांच्या मनांत आला, पण त्यांना भावांची व स्वत:चीही जास्त काळजी होती. श्री. मुरारजीभाई सांगतात तशी जर या माणसाची स्थिति असेल, तर आधीं पाहून ठेवलेलीं ठाणीं सोडीत सोडीत पद्धतशीर पीछेहाट करून प्रथम स्वत:चा बचाव करावा लागेल, हें ओळखून धर्मराजांनी पिछाडीच्या परिस्थितीचें निमिष-

भर सिंहावलोकन केलें. पण हॉटेलच्या पोऱ्यांची कौतुकाचीं स्मितें व भगतजी बगला काउंटरवर घेत असलेली निर्वेध झोंप या लक्षणानीं धर्माला आश्वासन मिळाले की हॉटेल मालक जरी 'मुरार-वर्णित' अवस्थेत असेल तरी त्याच्या हिंस्त्र प्रवृत्ति जागृत होतील असें स्थानिक जनतेला वाटत नव्हतें. एकंदर वातावरण भयरहित व नित्यक्रमानुसारी होतें. 'प्रयत्न पुरुषें सांडो नये' या धोरणानें धर्मानें यक्षाला फिरून एकदां प्रार्थिलें.

"महाराज, माझे भाऊ कोठे आहेत?"

यक्षानें बंद असलेल्या दाराकडे निर्देश केला, व पारसीकच्या बोगद्यातून जाणाऱ्या डेक्कन क्वीन सारख्या आवाजांत तो म्हणाला.

"ते आमच्या केदी हाय- पूछते ते सवालला सादी जवाबभी ना देते–अने सोरालेमन मांगते. अमी वार्ता कदी नइ चालेल, आमी तेनला सरवेला ते कमरामंदी कोंडूनसी घातला. अने तुमाला बी सांगते की आमची सवालला तर तुमीबी जबाब ना देल तर तुमालाबी आमीलोग बंद करेल आमची जेलखानामा."

"आपण विचाराल त्याचीं उत्तरें द्यायला मीं तयार आहे." धर्मराज शांतपणें म्हणाले.

"तो ठीक हाय, तुम्ही शरीफ माणस लागते. काय घेते कां आमच्या सगाती थोरा?"

धर्मराज अंगावर शहारे आणून म्हणाले, "छे छे मी त्याला कधीच शिवत नाही – शिवाय मीं अनुज्ञापत्रही घेतलं नाहीं"

"तो ज्याऊन द्या. आतां बोला आमचे सवालचा जवाब"

धर्मराज दक्ष, समजूतदार, धोरणी आणि तर्कबुद्धि चालवणारे नसते तर यक्षाच्या भाषेतले त्याचे प्रश्न समजणें त्यांना मुश्किल होतें. पण त्यांनीं प्रश्न योग्य रीतीनें समजावून घेतले व योग्य ती उत्तरें दिली. तीं प्रश्नोत्तरें अशीं झालीं--

––सर्वश्रेष्ठ धर्म कोणता?

सिनेमा-सेवन.

—परमगति कोणती?

नव्या चित्राच्या पहिल्या खेळाला बॉक्समधला तारका

असें बाल्कनींत स्थान.

—उत्तम पुरुषार्थ कोणता ?

तारकेचा स्नेह; त्यांतूनही दोन तारकांचा स्नेह.

—योगी कोण ?

तो, कीं जो बॉक्स ऑफीसबाहेरच्या रांगेत तासचे तास उभा राहण्यास कंटाळत नाहीं.

—श्रेयस्कर काय ?

पास मिळविणें,तो न मिळाल्यास आगाऊ तिकिटे खरेदी करणे

—खरे केव्हां बोलावें ?

जेव्हां विचारणारास तें माहीत असेल तेव्हां.

—पुण्यसंचय कसा होतो ?

प्रत्यही सिनेमा-सेवनाचें व्रत अखंड चालू ठेवून.

—निष्काम कर्म कोणतें ?

पडद्यावरील सुदरींवर प्रेम.

—स्वत:चा शत्रु कोण व मित्र कोण?

तिकिट असूनही चित्र न पाहणारा स्वत:चा शत्रु व त्या न जाणाऱ्याचे तिकीट घेऊन सिनेमा पाहणारा हा स्वत:चा मित्र होय.

पंचकन्यांची नांवें सागा.

सुरैया, नरगिस, मधुबाला, निम्मी, रेहाना.

—पुण्यश्लोक कोण ?

शेठ चदूलाल, फत्तेलाल, सरदार, करदार, मोदी.

—अमर किती झाले ?

सैगल, चंद्रमोहन, श्याम, मझहरखान.

—ज्ञानी कोण ?

ज्याला सर्व चित्रमदिरें, चित्रघरे, निर्माते व नटींचे पत्ते माहीत आहेत तो ज्ञानी जाणावा.

युधिष्टिराच्या उत्तरांनीं खूप होऊन यक्ष म्हणाला, "मी तुझ्या एक भावाला सोडून देतो. कोणाला सोडू तें सांग." त्यावर धर्म म्हणाला, "एक भाऊ घेऊन मीं काय करूं ? सिनेमाला आम्हीं सर्व बरोबर जातो तेव्हां आम्हांला 'फॅमिली कन्सेशन' किवा कुटुंबासाठीं

सवलत मिळते, दोघेच गेलो तर ती मिळणार नाहीं. ' हॉटेल-मालकाला हें व्यवहारी कारण पटलें व त्यानें उठून दार उघडलें.

लौकरच नकुल, सहदेव, अर्जुन व भीम डोळे चोळीत जांभया देत बाहेर आले. धर्मानें यक्षाला विचारलें,

" महाराज हे माझे शूर भाऊ निमूटपणें कसे कोडलें गेले ? विशेषत: या भीमसेनानें कांहीं प्रतिकार कसा केला नाहीं ?"

त्यावर थोडे हंसून यक्ष म्हणाला, "अरे भाई, ते लोकानला लई प्यास होती. आटला उतावल जाला होता के ते जवाब देईना तेव्हां माजा खानगी पानी मी तेनला दिला—अने ते पिऊन गेला ! ते जारो आदमी तो छो गलास खाली केला. एक मिनिटमंदी समदा सपाट ज्याला, तेनला उचलूनसी कमरामंदी ताकला— साहेबजी !" यक्षाच्या मोहनिद्रेंतून जागे झालेल्या व अंधारांतून स्टेशनकडे धडपडत चाललेल्या पांडवांत नेहमीप्रमाणें भीमसेनाच्या तक्रारीचा आवाज यावेळीं ऐकू येत नव्हता. युधिष्ठिरच म्हणतात होता, " शिव शिव, आतां गोमुत्राच्या चुळा भरून टाका सगळेजण— निदान स्टेशनवरच्या चहाच्या तरी—"

✦✦ ✦✦

## लांडगा आला रे आला !

एका धनगराच्या पोराला लांडगा आला नसतांहि ' लांडगा आला रे आला ! ' म्हणून उगाच ओरडण्याची व त्यावर लोक घाबरले म्हणजे हासत सुटण्याची खोड होती. पण नेहमी तेंच झाल्यावर लोक त्याच्याकडे दुर्लक्ष करूं लागले. तरी एके दिवशी तें पोर संवयीप्रमाणें ओरडत असतां एक बनिया तिकडून चालला होता. त्यानें तें ऐकलें व त्याची पांचावर धारण बसली.

' अहो, हा त्या पोराचा नुसता चावटपणा आहे ' असें लोकांनी सांगितल्यावर त्याला धीर आला आणि एक कल्पना सुचली. बनिया त्या मुलाजवळ जाऊन म्हणाला, ' अरे वेड्या, तू मेंढरें वळण्यांत आयुष्य फुकट घालवीत आहेस. मजबरोबर चल, मी तुझें कल्याण करीन. ' मग त्या पोरासह शहरी येऊन बनियाने एक वर्तमानपत्र काढलें व त्या पोराला संपादक नेमलें.

तात्पर्य: शहरगावी कुठल्याहि कलेचें चीज होतें.

: १० :

# शिंपी वर्गास गंभीर आदेश

(क. र. धों. कर्वे यांची क्षमा मागून, या लेखामधील कल्पनेनें त्यांची वरीच करमणूक झाली होती. )

शिवून तयार केलेले कपडे घालणाऱ्या माणसाला केव्हांना केव्हां तरी एक सुखद अनुभव येऊन जातो. शिवलेला कपडा अंगास ठीक येऊन सर्व बाजूंनी व्यवस्थित बसणें, तो चांगला दिसणें व तेणें करून बरें वाटणें, हा तो दुर्मीळ अनुभव होय. कधी शर्ट कधीं पाटलोण कधीकधी तर कोट देखील, असा एकादा एकादा कपडा मना प्रमाणें शिवला जातो, आणि त्या योगानें देहास शोभा व चित्तास आराम येऊन या दुखःमय संसारांत कित्येक सुखाचे क्षण लाभून जातात. माझ्या आयुष्यांत असे दुर्मीळ आनन्दानुभव कांहीं वेळां येऊन गेलेले आहेत. त्या तुरळक कपड्यांची आठवण मला अजूनही संतोष देते, व ते कपडे शिप्यांनी मुद्दाम सुखदायक बनवले असें जरी म्हणवत नसलें तरी त्या शिप्यांबद्दल मला थोडीबहुत कृतज्ञता अजूनही वाटते ; म्हणूनच मी शिपीवर्गाबद्दल सहिष्णुता बाळगतो. आणि त्याच्या धंद्याला उत्पन्न झालेला जो एक भयानक धोका माझ्या लक्ष्यांत आला आहे त्याबद्दल येथें जाहीर इषारा देणें निकडीचें कर्तव्य समजतो.

शिंपी लोकांबद्दल समाजांत वाजवीपेक्षां जास्त दूषित पूर्वग्रह आहे ही मोठी खेद करण्यासारखी गोष्ट होय. सोनार व कुळकर्णी यांच्या मध्यभागीं शिंप्याला गुफणाऱ्या कवितेमुळें हा गैरसमज अधिकच दृढ झाला असावा. वास्तविक शिंपीदेखील मनुष्यच आहे, इतरांप्रमाणें तोही आपला उद्योग करून पोट भरतो. शिंपीसमाजांत इतरांप्रमाणेंच सज्जन व प्रतिष्ठित नागरिक होऊन गेलेले आहेत; महीन्द्रकर, झारापकर इत्यादि आडनावें या गोष्टीची साक्ष देतील. अन्यज्ञातीप्रमाणें शिप्यातही एक सन्त होऊन गेला. त्या नामदेवाचें नांव देवही विसरूं शकणार नाहीत. मग मानवांचा पाड काय ? गोदाकाठचा सत्पुरुष परशराम शाहीर हा शिपीच होता, इतकेंच नव्हे तर उत्कृष्ट कवी असूनही त्याला आपल्या धंद्याचा जाज्वल्य अभिमान होता. बडोद्याच्या महाराजांनी जहागिर देऊ केली असतां ती नाकारून या साक्षात्कारी शिंप्यानें घोषणा केली की,'सुईदोऱ्याची हयात असो!'

परशराम शाहीर ९२ वर्षे जगला; अखेर सर्वांना कळवून बोलावून, भजन करीत करीत या इच्छामरणी पुरुपानें सागून ठेवलेल्या क्षणाला प्राण सोडला. त्या थोर विभूतीचा वरदहस्त सुईदोरा चालवणाऱ्या साऱ्या व्यवसाय बंधूवर सदैव आहे. त्याच्या आशीर्वादाखाली शिवणकाम हा एक यज्ञ आहे या भावनेनें धंदा करणाऱ्या सत्वस्थ शिप्याचा दोरा कधीही तुटणार नाही, त्याचें अंगुस्तान हरवणार नाही, त्याच्या कात्रीची धार जाणार नाही.

तथापि नुसत्या आशिर्वादानें आणि सात्विक वृत्तीने भागलें असतें तर शिपी कामाला हत्यारांची गरज कशाला लागती ? तेव्हां व्यवहाराचेंही अवधान ठेवलें पाहिजे. जास्तीत जास्त कापडांत कमीतकमी कपडा देणें या आर्थिक सिद्धांताविषयी जागरूक राहिलें पाहिजे. आपले पाठिराखे कोण याची जाणीव तर ठेवली पाहिजेच पण आपले शत्रूही ओळखून ठेवले पाहिजेत. आज शिपी बधूंच्या एका प्रच्छन्न शत्रूकडे मी त्यांचे लक्ष वेधीत आहे. हें कटुकर्तव्य मला नाइलाजानें करावें लागत आहे. कारण जो शत्रु मी उघडकीस आणीत आहे तो एक अतिशय सज्जन, तत्वनिष्ठ व आदरणीय

गृहस्थ आहे; कदाचित आपण कोणावर काय अरिष्ट ओढवीत आहोत ही त्याला कल्पना नसेल, पण त्याचा उद्योग शिंपी वर्गास घातुक आहे हें येथे जाहीर केलेंच पाहिजे.

श्री. रघुनाथ धोंडो कर्वे हें त्या शत्रूचें नांव होय. स्वतःच्या समाजस्वास्थ मासिकांत वर्षानुवर्ष नग्नतावादाचा प्रसार करून या विद्वानाने कळत न कळत अखिल शिंपीपेशावर संकट आणले आहे असा मी स्पष्ट आरोप करतो. 'मनुष्याने वाटल्यास नग्न राहावे' हें क्रांतिकारक सूत्र मांडून रघुनाथपंत कर्वे यांनी तमाम शिंपी कामकरी बांधवांच्या पोटावर पाय आणण्याचा दुष्ट डाव रचला आहे. हे उघडे गुपित आज जगापुढें उच्चरवानें फोडणें जरूर आहे, शिंपी–वर्गाला हा जिव्हाळ्याचा प्रश्न आहे व त्यानें इकडे लक्ष देणें आज अगत्याचें आहे. नागवेपणाकडे दुर्लक्ष करण्यास जनतेला शिकवणाऱ्या प्राध्यापकाकडे दुर्लक्ष करून शिंपीपेशाचें भागणार नाही, त्यांनी वेळीच या गृहस्थाला ओळखून ठेवावें आणि याचा बंदोबस्त व याचे विरुद्ध संरक्षण मागण्याची व्यवस्था करावी. दिगंबर, कलंदर, औलिये व अर्भकें याचे खेरीज शेंपुट नसलेल्या प्रत्येक मानवी प्राण्याचे अंगावर कपडे चढवणें या पवित्र कामीं समाजव्यवस्थेत शिंपी-वर्गाची नेमणूक झाली आहे. या कार्यात आड येणारे विलायती नग्नतापंथी आणि त्यांची तळी उचलणारे रघुनाथपंतासारखे फाजिल सहिष्णु एतद्देशीय लोक हे समाजधारणेला जबरदस्त धक्का देत आहेत, समाजस्वास्थ्यांत विघाड आणू पाहात आहेत आणि मुख्यत्त्वेंकरून शिंपीधंद्याला सुरुंग लावीत आहेत.

'माणसाने वाटल्यास नग्न राहावें' या उत्पाती तत्त्वाचा प्रचार करणाऱ्या कर्व्यांनी आपण शिवण कामगारांच्या भाकरीलाच हात घातला असेल हा विचार केला नाहीं. त्यांच्यासारख्या जबाबदार नागरिकानें समाजाच्या एका महत्त्वाच्या वर्गावर उपासमारीची वेळ आणण्यासारखा हा उपद्व्याप कां केला असावा हा प्रश्न चिंतनीय आहे. एकवेळ वाटतें की कुणा दुष्ट शिंप्यानें रघुनाथपंतांचे कपडे वाईट शिवून त्यांना त्रास पोहोंचविला असावा व त्यामुळें चिडून पंतांनीं आपला हा विप्लवी सिद्धांत बुद्धिजीवी

वर्गापुढें (ज्या वर्गात शिंपीही समाविष्ट होतात) मांडला असावा. तथापि त्यांच्यासारख्या ज्ञात्यानें क्षमाशील राहायला हवें होतें; जरी शर्टच्या कॉलरनें त्यांची गचांडी आंवळली असेल, जरी कोटानें काखेंत करकचून त्यांना जेरबंद केलें असेल, पाटलोणीनें जरी त्याची अवस्था जरासंधासारखी केली असेल, तरी रघुनाथ-पंतांनी फारतर त्यांच्या त्या एका शिप्यावर राग काढायचा होता, सूडबुद्धीनें शिप्याचें शिरकाण करण्यास निघण्याचें कांही कारण नव्हतें. प्रतिशोधाच्या संतापांत 'वाटल्यास नग्न राहावें' ही समस्या मांडायला नको होती. त्यांच्यासारख्या अधिकारी पुरुषाच्या या अनुमतीनें कपड्यांना उपेक्षणीय गोष्टीत ढकललें आहे. 'वाटल्यास ब्रह्मचर्य पाळावें' असें म्हणणें वेगळें आणि 'वाटल्यास नग्न राहावें' हें म्हणणें वेगळें. पाहिल्या म्हणण्यातील 'वाटल्यास' या शब्दावर सामान्य लोक (विशेषतः उष्ण कटिबंधांतील) जास्त जोर देतील, पण आपल्या इकडच्या हवामानांत दुसऱ्या शब्दावरच भर देण्याकडे सर्वसाधारण जनतेचा ओढा अधिक दिसून येईल– आणि मग शिप्याचें काय होईल?

अन्न वस्त्र निवारा या मनुष्यांच्या मूलभूत गरजांत वस्त्राला अन्नाखालोखाल महत्त्व आहे. या ठिकाणी कापड व कपडा यांतील महत्त्वाचा फरक आपण लक्ष्यांत घेतला पाहिजे : पांघरण्याचें किंवा गुडाळण्याचें जे वस्त्र किंवा कापड तें नुसतें प्रावरण झालें; त्याचा उपयोग वैदिक काळात होता आणि आजकाल असला तर फारतर द्रावीड आणि इतर आदिवासी प्रदेशांत, मक्केच्या यात्रेकरूंत आणि अशा प्रकारच्या अनार्य आचारांत असेल. कपडा ऊर्फ कापून अंगावर पेहेरण्याजोगे बनविलेलें कापड, या वस्तूची देणगी आपल्याला संस्कृती बरोबरच मिळाली आहे. देहावर बसवण्यासाठीं शिवून कपडा तयार करणे ही कला रामायणाइतकीच सनातन आहे, हें आपणास रामराज्य बोलपट पाहूनच नव्हे तर एतद्विषयक संशोधनावरूनही कळून येतें. रामचंद्राची सीता रावणाकडे राहून आल्यानंतर शुद्ध आहे कीं नाहीं हा प्रश्न उपस्थित करणाऱ्या परटानें आपला संशय प्रथम एका शिप्याच्या दुकानांतच व्यक्त

केला होता असें अनुमान उत्तरेकडच्या कोणी पंडितानें नुकतेंच मांडले आहे. याप्रमाणे अनादिकालापासून चालत आलेली ही समाजसेवा, कापडाचे तुकडे जोडून माणसाच्या अंगासरसे बसविणें हें परपरागत शिल्प, शिपीवर्ग यथाशक्ति ( फारच यथाशक्ति कां होईना ) आचरीत असतां निरपराध नागरिकांवर बॉम्ब टाकल्या प्रमाणें रघुनाथपंत कर्व्यांनीं एकदम 'वाटल्यास नग्न राहावें' हा प्रचार करावा याचा अर्थ काय ?

आणि या व्यतिपाती घोषणेनें केवळ शिप्यांनाच धोका आहे असें नाही तर सर्वांनाच आहे. या बेदरकार अनुज्ञेचा परिणाम काय होईल याचा गभीर विचार फक्त शिप्यांनीच नाही तर त्यांच्या गिऱ्हाइकांनी, व गांधीजीसह इतर समाजधुरीणांनीं करण्याची वेळ येऊन ठेपली आहे. गांधीजी शिवलेला कपडा वापरीत नसल्यामुळे त्यांना शिप्यांच्या सुखदु:खाची एक पर्वा नसेल पण बाकीच्या समाजाची काळजी तर ते वाहतात की नाहीं ? कपडे ही बाब ऐच्छिक ठेवली तर कोणता अनवस्था प्रसंग ओढवेल हें लिहिण्यास आमची लेखणी धजावत नाही. 'कपडे वाटले तर चढवावे' या तत्वाचा प्रसार झाला तर प्रथम शिपी बेकार होतील, पण ही दुष्ट प्रवृत्ति येथेंच थांबेल याचा भरंवसा काय सांगावा ? आज कपडे नसले तरी चालेल म्हणणारे उद्यां कापडहि अनावश्यक ठरवतील. आज शिपी अन्नाला मोताद तर उद्यां कापड विक्रेते विणकरी 'सूत–कताई' पिजारी आणि कापूस विकणारे वर्गही निरुपयोगी ठरणार नाहीत हे कोणी सांगावें ? मग गांधीजींचें लाडके गिरणीवाले कोणाला आणि कसे पिळतील आणि चरखी बरोबर संपत्तीचाही संचय कसे करूं शकतील ? खादीचे अभ्रे कुणावर चढवले जातील ? आणि खादीधारी नंगेपणानें खुदाला डरविणारे झोड आपले फड व रकाने कसे गाजवतील ? लुग्याचे महत्त्व काय राहील ? सफेत टोप्या घालण्याच्या धंद्याची काय अवस्था होईल ?

धंदेवाईक कापडकऱ्याची गोष्ट एक बाजूला ठेवली तरी बहूजन समाजावर नग्न पंथाचा कोण भयानक आघात होईल.

बिचाऱ्या खेडूतांचा प्रश्नच उद्भवत नाहीं; त्यांना रघुनाथपंतांची घोषणा हे आश्वासनच वाटेल, पण शहरांची वाट काय ? घरांच्या खिडक्या आणि पदपथ यांना पांच फूट उंचीच्या भिंती घालाव्या लागतील काय ? बेढब देहाच्या माणसांना जबरदस्तीनें झांकण्याची वेळ तर येणार नाहीं– आणि मग सिनेमा कोण पाहील ? नग्नतेचें महत्त्व अतिपरिचयानें नाहीसें झालें तर कपडे घालणें ही उद्दीपक गोष्ट ठरेल. जितके जास्त कपडे तितका शृंगार अधिक उत्तान वाटू लागेल, अंगवर्णनानें कंडूपूर्ति करणारे कादम्बरीकार वस्त्रवर्णनानें लोकप्रियता मिळवूं पाहतील, रिकामटेकडे संस्कृति-संरक्षक आजच्याप्रमाणें उघड्या देहांबद्दल तक्रार न करतां झाकलेल्या शरीराविषयीं शंख सुरूं करतील, 'अलीगडच्या' जाहिराती कपड्यांनी वेढलेल्या स्त्री पुरुषांच्या एकांत चित्रांची आमिषें दाखवितील, 'माझ्या अंगावर मेल्यानं कपडा टाकलान् !' या शब्दांनी विनयभंगाच्या फिर्यादी नोंदल्या जातील !

अशा भयंकर भवितव्यापासून बचावणें असेल तर समाजानें वेळींच सावध होऊन प्रो. कर्व्यांचा विषारी व्यूह हाणून पाडावा आणि या बाबतींत शिंपीवर्गानें पुढाकार घ्यावा– कारण पहिली झळ त्यांना लागणार आहे. 'वाटल्यास नग्न रहावें' या साळसूद वाक्यांत कोणत्या प्रक्षोभक स्फोटाचीं बीजें दडलीं आहेत हें ध्यानांत आणून शिंपी बंधूनी पोलादी एकजूट करावी, सनदशीर किंवा अन्य वाटेल त्या मार्गांनीं येणाऱ्या आपत्तीला तोंड देण्यासाठीं लढाऊ संघटना उभारावी, हिंदुस्थानच्या शहराशहरांतून जोरदार प्रचार करावा, कर्व्यांचा जाहीर सभांतून धिक्कार व निषेध करावा आणि त्यांच्या आसुरी कारवाईविरुद्ध जनता-जनार्दनापुढेंच नव्हे तर सरकारकडेही दाद मागावी. सुरुवातीखातर एक स्फूर्तिदायक घोषणा मी सुचवीत आहे,

'नगिस्तान मुर्दाबाद, अंगुस्तान झिंदाबाद'

✦✦ ✦✦

## : ११ :

# सदोबा देशपांडे यांचें चरित्र

थोर लोकांच्या चरित्रांनीं आपल्या वाङ्मयांत बरीच किंवा फाजील जागा अडवली आहे. देशभक्त, समाजसुधारक, पुढारी, वीर, विद्वान, शास्त्रज्ञ, महात्मे, व्यापारी किंवा नुसतेच श्रीमंत अशा लोकांचीं खूप चरित्रें लिहिलीं गेलीं. कधीं एकेका लोकोत्तर पुरुषाची अनेक चरित्रें झालीं, तर कधीं एकाच चरित्राच्या साच्यांतून नांवें, तारखा वगैरे तपशील बदलून अनेक निरनिराळ्या लोकांचे गुणवर्णनपर ग्रंथ लिहिले गेले. आपल्या देशांतील रानडे, टिळक, आगरकर, गोखले, यांजप्रमाणेच परदेशांतील एडमंड बर्क, ग्यारिबाल्डी, डी व्हॅलेरा अशांचीही चरित्रे होऊन गेलीं. युगप्रवर्तक लोकांप्रमाणेच शतकापुरतें, पिढीपुरतें किंवा तात्पुरतें महत्त्व पावलेले लोकही चरित्रनायक होऊन गेले. ताज्या बातम्यांतून ठळकपणें उमटणाऱ्या लोकांच्या चरित्रांची गिरणी 'चित्रशाळे'नें चालवली, तर 'किर्लोस्करां'च्या कारखान्यांतून थोर स्त्री-पुरुषांच्या जीवनवृत्तांताचा बारमाही पुरवठा होऊं लागला. कारकुनाचा कंत्राटदार, मास्तरचा मॅजिस्ट्रेट, तलाठ्याचा तांडेल किंवा वाघ्याचा पाग्या कसा झाला, अशा नियमितपणें छापून येणाऱ्या हकीकतींनीं जसेचे तसेच राहिलेल्या बहुतेक लोकांना

तोंड लपवून राहायची वेळ आली. एकंदरीत असामान्य लोकांच्या चरित्रांचें भलतेंच पेंव फुटलें.

थोर माणूस हा खरोखर मोठा विस्मयकारक प्रकार होय. तो देशभर आणि वर्षानुवर्ष आपली छाप ठेवून जातो. कधी क्रांति निघो, नवा धर्म उदयास येवो, राष्ट्रीय जागृति होवो, जिथें तिथें हा थोर माणूस उपस्थित होऊन सारे श्रेय पटकावण्यास तयार असतोच. स्वतःचें आयुष्य पुरें केल्यानंतरदेखील हा थोर माणूस दुय्यम प्रतीचे आप्तेष्ट मागे ठेवून पन्नाससाठ वर्षे इतिहासांत आपली आठवण रेंगाळत ठेवल्याशिवाय राहात नाही.

थोर पुरुषांची चरित्रें अतिशय उद्बोधक, स्फूर्तिदायक, आदर्श, चमत्कृतिजन्य आणि मनोवेधक असतील, यांत शंका नाही; पण कधीकधी मनावर त्यांची प्रतिक्रिया किंवा उलटा परिणाम होतो, आणि सामान्य दहाजणांसारख्या माणसालाहि चरित्र–नायक होण्याची संधी कां मिळू नये, असें वाटू लागतें. श्रेष्ठ व्यक्तींच्या बाबतीत झालेला असा पक्षपात पाहूनच मी सदोबा देशपांडे या मनुष्याचें चरित्र लिहण्यास उद्युक्त झालों आहे कारण तो कोणी विशेष सज्जन किंवा महान् पुरुष नव्हता, आपला नेहमीचा, साधारण तुमच्यासारखा एक मानवी प्राणी होता.

बाळपणापासून सदू देशपांडे बरोबरीच्या पोरांत कधीच उठून दिसला नाही. आश्चर्यकारक तैलबुद्धीनें त्यानें आपल्या गुरूंना चकित केलें नाही. त्याला वाचनाचें वेड मुळीच नव्हतें, आणि त्याची पाठ थोपटून "माझें भाकित लक्षांत ठेवा, हा पोरगा मोठेपणी नांव काढील !" असें कोणीही म्हटलें नाही. त्याच्या कुशाग्र बुद्धीची बोच त्याच्या बापाला कधीही जाणवली नाही. छे ! त्याच्या बापाला फार तर कधी कधीं प्रश्न पडे की, हें कारटें महामूर्ख आहे तें नाइलाजामुळें आहे, की महामूर्ख असण्यांत भूषण मानणें हा त्याच्या जादा हुषारीचा कांही प्रकार आहे ? थोडक्यांत म्हणजे लहानपणी तुम्ही आम्हीं होतों त्याच नमुन्याचा सदू देशपांडे होता. शाळेंत असतांना कांही थोर लोकांप्रमाणें त्यानें मैदानी खेळांत कधीं मर्दुमकी गाजवली नाहीं, किंवा आपल्या सवंगड्यांवर

मातही केली नाही. खोखोमध्यें तो खुंट असे व इतर डावांत लिंबलोण मानला जाई. त्यानें कधी क्रिकेटमध्यें विक्रम केला नाहीं, कीं फूटबॉलमध्यें नांव मिळवलें नाही. तो सायकलवर देखील मुष्किलीनें बसावयास शिकला, मग घोड्यावरची स्वारी तर दूरच. आपल्यासारखाच एक होता तो.

त्याच्या शारीरिक शेळपटपणाची उणीव त्याच्या ठसठशीत चेहऱ्याने भरून काढल्याचें ऐकिवांत नाहीं. कांही श्रेष्ठ गृहस्थां-बद्दल असें सांगण्यांत येत असेल, पण याच्याविषयीं तसें मुळींच कांहीं नव्हतें. उलट त्याचा भेदरट चेहरा त्याच्या जरत्कारू देहाला शोभण्यासारखाच होता. तो आपल्या बापाला भीत असे, त्याला मास्तरचें भय वाटे, त्याला कुत्र्याची भीति वाटायची, फटाक्यांना तो घाबरायचा, वीज कडाडली तर त्याची पांचावर धारण बसायची, आणि यमपुरीच्या वर्णनानें तर तो धास्तीनें घामाघूम व्हायचा. पोरी पाहिल्या की तो डरत होता.

जवानीच्या उंबरठ्यावर सुप्रसिद्ध लोकांना जीवनकार्याची जी तळमळ लागल्याचें आपण वाचतों तशी तळमळ व्यवसायाची निवड करण्यांत त्यानें दाखवल्याचें कोणाला आढळलें नाही. त्याला वकील व्हायचें नव्हते, कारण त्यासाठी कायद्याचा अभ्यास करावा लागला असता; त्याला डॉक्टरीकडे जायचें नव्हतें, कारण त्याकरितां औषधोपचार शिकावा लागला असता; त्याला व्यापारांत पडायचें नव्हतें,कारण त्या निमित्तानें व्यापाराचें ज्ञान घ्यावें लागलें असतें; त्याला मास्तर होण्याची इच्छा नव्हती, त्याची मास्तरीची हौस फिटली होती. त्याचा कांही कल किंवा प्रवृत्ति असलीच, तर ध्रुव-बाळासारखें अरण्यांत (नुसतेच, तपश्चर्येसाठीं वगैरे नव्हे) जाण्याची किंवा संस्थानिकाचा मुलगा होण्याची होती. अखेर त्याच्या बापानें त्याला एके ठिकाणी कारकून म्हणून लावून दिले.

याप्रमाणें आमच्या चरित्रनायकानें बाल्यावस्थेंतून तारुण्यांत प्रवेश केला. याबेळी त्याच्या स्वरूपांत विशेष असें कांहीच दिसून आलें नाहीं. सहज पाहणाराला त्याच्या निरुपद्रवी चेहऱ्यावर बुद्धिमत्तेची चमक चुकूनही सांपडली नसती. त्याचें अरुंद उतरतें कपाळ, पुढें

आलेले दांत किंवा रुंद कान यांपैकीं कुठेंच कांहीं गुप्त गुण दडलेले नव्हते.

उद्योगाला सुरुवात केल्यानंतर थोड्याच दिवसांत त्याला एक त्रासदायक व्याधि जडली व ती जन्मभर त्याच्या पाठी लागली. मित्रमंडळीबरोबर यथेच्छ जेवण करून घरी येतांना त्याला त्या रोगाची प्रथम जाणीव झाली. त्याच्या पोटाला तडस लागली, घशाला शोष पडला, श्वासाला उधान लागली, घाम येऊं लागला, सुस्ती भासू लागली. या विकारांचा उत्तर आयुष्यांत त्याला वरचेवर त्रास होत राहिला. विशेषतः सणांच्या दिवशी, आणि लोकांकडे पक्वान्नाचें जेवण करण्याचा प्रसंग आल्यानंतर.

त्याच्या जीवनांत रोमांचकारी क्षण एकदांच येऊन गेले आणि त्यांचीच पस्तावयुक्त आठवण त्याला जन्मभर राहिली. तो वयांत आला असेल नसेल तेवढ्यांत त्याला एक दिव्य लावण्यवती भेटली. ती सर्व स्त्रियांपेक्षां वेगळी होती, तिला इतरांपेक्षां समजूत जास्त होती, हें त्याच्या तात्काल लक्षांत आलें. तिला असाधारण विनोद-बुद्धी होती. त्यानें स्वतःला माहीत असलेले तीन्ही चुटके तिला सांगितले, तेव्हां ती हांसली. ती नुसती जवळ असली, तरी त्याला गुलकंदाची ढेकर आल्यासारखें वाटे. तिच्या हाताचा पहिलाच स्पर्श झाला, तेव्हां त्याच्या अंगांतून एक मधुर झिणझिणी येऊन गेली. नंतर त्याला आढळून आलें की तिचा हात आपल्या हातांत धरून ठेवला तर अनेक गोड झिणझिण्या येतात, आणि तिच्याशेजारी बसून तिच्या गळ्याभोंवती हात ठेवला तर फारच जोराच्या मिष्ट्रास झिणझिण्या चालू राहतात. ती नेहमी आपल्या जवळ असावी, असें त्याला वाटू लागलें. त्याची इच्छा पूर्ण होण्यास कांहींच अडचण नव्हती. ती त्याच्या बापानें त्याच्यासाठी पाहून त्याच्याशी लग्नानें जोडून दिलेली त्याची नववधू होती.

तिच्यापासून मिळणाऱ्या सुखाचा अनुभव सदोबा देशपांड्यानें कांहीं काळ घेतल्यानंतर त्याच्या जीवनांत चिमुकली पावलें चालत आलीं. कालांतरानें इटुकल्या पावलांची आणखी एक जोडी आली, त्यामागून आणखी, पुन्हां आणखी, अशी पावलें

येऊन त्याच्या संसाराचा हमरस्ता झाला. त्याचें घर भरून वाहूं लागलें. त्याबरोबरच त्याची जुनी व्याधी जोर करूं लागली. त्याचें पोट सुटलें. आणि या फोफावणाऱ्या परिवारातून एकाद्या तरी चिमण्या जीवानें त्याला चटका लावून देवाकडे धाव घेतली काय ? नाही, एकानेंही नाहीं. त्याच्या एकूण पांच मुली आणि चार मुलगे ही प्रजा पाहतां पाहतां वाढली. उंच, टगाळी, हेंगाडी, अरबूज, मठ्ठ आणि सदा भुकेली, अशा त्याच्या पोरांनी रूपाच्या आणि बुद्धीच्या बाबतीत त्याचाच कित्ता गिरवला. त्यांच्यापैकीं एकही पोर असामान्य निघालें नाही.

मोठ्या लोकांच्या जीवनाची सारी दिशाच बदलून टाकणारे समरप्रसंग असतात, तसे सदोबा देशपांड्याच्या आयुष्यांत कधीच आले नाहीत. वर्षे लोटत गेली तसतसे त्याच्या जीवनात तसे थोडेबहुत चढउतार झाले नाहीत असें नाहीं. त्याला ज्या कचेरीत रोजगार होता, तेथें तो टपाल कारकुनाचा हिशेब कारकून झाला, हिशेब कारकुनाचा दप्तर कारकून झाला, तेथून दुय्यम सरकारकुनापर्यंत चढला; तेव्हांपावेतों म्हातारा व गैदी होऊं लागल्यामुळें त्याला परत दप्तर, हिशेब आणि टपाल या पायऱ्यावरुन उतरत आणण्यांत आलें. अगदीं जख्ख म्हातारा झाल्यावर त्याला पेन्शनींत काढण्यांत आलें. याप्रमाणें त्याच्या कर्तबगारीचा इतिहास झाला. ही कारकीर्द कदाचित रानडे–टिळकांशी तुलना करण्यासारखी नसेल, पण साधारणपणे ती आपल्यासारखीच नाही असें नाही.

सदोबा देशपांडे पेन्शन घेतल्यावर पांच वर्षे हयात होते. त्यांचे मुलगे त्यांचा सभाळ करीत,– मोठ्या ममतेनें नव्हे, पण प्राप्त होतें म्हणून. वार्धक्यात सदोबा तल्लख बुद्धीबद्दल, टवटवीत मनोवृत्तीविषयी किंवा बिनचूक स्मृतीतून निघणाऱ्या असंख्य हकीकतीसाठी मुळीच विख्यात नव्हते. ते एकंदर दोन आठवणी आणि तीन नकला सांगत. पैकी आठवणी स्वतःच्या साहेबाविषयीं असून त्या धडपणें शेवटपर्यंत सांगणे त्यांना कधीच जमले नाहीं, आणि नकला कोर्टातला अडाणी साक्षीदार, तेलंगी ब्राह्मण आणि

चिडलेला साहेब यांच्याबद्दल अव्वल इंग्रजीपासून ज्या निवेदित होत आल्या आहेत अशाच असत. त्या ऐकायलाही फारसे कोणी मिळत नसत. त्यामुळें बरावाईट काहींच परिणाम कोणावर झाला नाही.

सत्तावन्नाव्या वर्षी सदोबा आजारी पडले. त्यांना व्यवस्थित औषधोपचार मिळाला व त्यांनी जीवितयात्रा आटोपली. त्यांच्या मुलांनी 'केसरी'त गृह्यसंस्कार छापवून आपले दुःख व्यक्त केलें.

त्याच्या आत्म्यास शांती मिळाली असेलच. कारण जिवतपणींही तो आत्मा कधी फारसा अस्वस्थ नव्हता. अगदी चारचौघांसारखा होता.

✦✧ ✦✦

## कासव आणि ससा

सशाला आपल्या वेगाचा फार गर्व झाल्यावरून त्याने कासावास त्याच्या मंदपणाबद्दल हिणवले, तेव्हां कासवाने त्याला आव्हान दिलें, की 'चल आपण न्याय्य अटीवर पळण्याची शर्यत लावू.' ससा तुच्छतेने हासून तयार झाला. मग कासवाने पंचासमक्ष अटी ठरविण्यास सुरवात केली. एकतर दोन्ही उमेदवाराचे वजन सारखे पाहिजे, म्हणून कासवाइतके वजन भरेल असें ओझें सशाने वाहावें, दुसरे म्हणजे ससा आणि कासव याचा वेग फारच विसंगत असल्यामुळे कासवाला सशाच्या बऱ्याच आधी निघू द्यावें. तिसरी अट – पण ती ऐकण्यास न थांबता ससा नामोहरम होऊन पळून गेला व पंचानी कासव विजयी म्हणून जाहीर केले.

तात्पर्य –(१) शर्यत नुसती पळूनच जिंकता येते असें नाही.

(२) संथ दिसणारे प्राणी कधीकधी मोठे पातळयंत्री निघतात.

: १२ :

## सुदैवी दगड

हणमंत नानाजी पावगी – दाराची घंटा वाजल्यावर, कोण आहे या प्रश्नाला बाहेरून मानभावी आवाजांत उत्तर आलें. दार उघडून मी त्यांचें स्वागत केलें, यावें पावगीपंडित, आज विशेष खुषीत दिसतां ? कांहीं वाईट बातमी सांगायचा विचार आहे वाटतं ?' त्यांना हांसण्याच्या उकळचा फुटत होत्या. प्रफुल्लित चेहऱ्यानें ते खदखदून म्हणाले, 'आमची नोकरी गेली !'

आमचे मित्र ह. ना. पा. यांच्या अनेक आश्चर्यकारक गुणांत असा एक गुण होता कीं आनंदाच्या गोष्टी कपाळाला हात लावून व सुस्कारे सोडीत सांगायच्या व वाईट बातम्या आनंदानें जाहीर करायच्या. आपल्या या वैशिष्टयाचा त्यांना मोठा अभिमान वाटे व आपला हा एक प्रकारचा योग आहे असा त्याचा दावा होता.

कां, राजिनामा दिलांत ? मी विचारलें. ते बोलले छे, साहेबांनीं आग्रहानें जायला सांगितलें व उद्यांपासून येऊं नको म्हणाले.' पावगीनीं अनावर गुदगुल्या होत असतांहि खुलासा केला.

मी सहानभूतीनें उद्गारलों, अरे, अरे, मग आतां हो ? ते एकदम गंभीर झाले, आतां ? त्यांनीं एक दीर्घनिश्वास सोडला. दुसरीकडे दोन ठिकाणी नोकरी मिळण्यासारखी आहे, असें सांगून

जणुं काय या भयंकर भवितव्याची कल्पनाहि सहन होत नाहीं अशा चेहऱ्यानें त्यांनी डोळे मिटून घेतले.

इतकी वर्षे या स्वारीचा अनुभव असूनहि मी बेसावधणें विचारून गेलों, पण नोकरीं जायला झालं काय? माझी चूक ताबडतोब माझ्या लक्षांत आली, कारण अपेक्षेप्रमाणें पावगी कोरा चेहरा करून बोलले, व्हायचं आहे काय? काही झाल नाही. आणि जवळचें वर्तमानपत्र उचलून वाचनांत गढून गेले.

पावगीबुवांच्या तंत्राची वास्तविक मला सवय झाली होती. सरळ प्रश्नाला कधी सरळ उत्तर द्यायचें नाही, एकाएकी कधी खरें बोलायचें नाही, कधी ऐन सभाषणांत वेड पांघरून काय? म्हणून बावळट चेहऱ्यानें विचारायचें तर कधी डुलकी लागल्याचें सोंग करायचें. दुसरें माणूस चिडलें म्हणजे त्याना वैयक्तिक विजय मिळविल्याइतका आनद व्हायचा. असें खुपीत आल्यावर थोडावेळ ते सरळपणें बोलायचे. यावेळी त्यांची अपेक्षा पुरी करण्यासाठीं मीं त्यांच्यावर चिडलों, नसलें सांगायचें तर गेलात धडपडत, म्हणून मीहि एक पुस्तक उघडून वाचू लागलों. पावगी महाराजांना धन्य झाली, ते प्रेमपूर्वक म्हणाले, सांगूं कां? ऐकणार असाल तर सांगतों. छे मला मुळीच इच्छा नाहीं ऐकायची, म्हणून मी पुस्तकांत आणखी डोकें खुपसलें. तेव्हां हासत हासत पावगी भितीला सांगू लागले.

+ + +

सगळी सुरुवात झाली मी या जालंदरच्या जाहिरातीला उत्तर लिहिलें तेव्हां, त्यांनी प्रसन्नपणें हकीकतीला सुरुवात केली. मी त्यांच्याकडे संपूर्ण दुर्लक्ष करीत असतां त्यांनी एक जाहिरातीचें कात्रण काढून माझ्यापुढें धरलेंच. पहाना, असें काय, असें आर्जवीपणें आवाहन केलें, तेव्हां मी माफी केल्याच्या मुद्रेनें त्या चिटोऱ्यावरून नजर फिरवली.

विसाव्या शतकातील अजब आश्चर्य !
अनुभव घेऊन पहाल तर थक्क व्हाल !

**फत्तेहमंद पत्थर –**

**दैवी दगड – लकी इस्टोन––**

वाटेल ती आपत्ती, संकट, बला दूर करणार–
सर्व दुश्मन नाहींसे करणार–
चमत्कारिकपणे तुमचे रक्षण करणार–
तुमच्या भाग्य उदयाचा मार्ग खोलणार–
आजच फक्त एकोणीस रुपये चार आणे खालील पत्त्यावर
मनीऑर्डरने पाठवा ! गुण न आल्यास पैसे परत !

**प्रो. गोरख मछंदर**
युनिवरसल ओसीपशन एजन्सी
पोस्ट बॉ. ४२१, जालदर, पूरबी पंजाज.

तुम्ही खरोखरच सव्वाएकोणीस रुपये पाठवलेत? मी विचारलें. माझ्या प्रश्नाला डावलून पावगींनी मला विचारलें, लकी स्टोनचा अर्थ तुम्ही मराठींत काय कराल? मी उत्तरलों दैवी दगड, आतांच पाहिला तो अर्थ. तें झालं आमच्यासारख्या अडाणी लोकांचं भाषांतर, पावगी धूर्त बुद्धीनें बोलले. तुमच्यासारखे विद्वान लकी स्टोनला मराठींत काय म्हणतील? उघडउघड तोंडपुजेपणानें बोलायला पावगींना कांहीं दिक्कत वाटत नाहीं. मी सावधपणे सुचविले, विद्वान काय म्हणतील तें सागता येत नाही, पण लकी स्टोनचा अर्थ मी करीन लाभणारा खडा, होय ना? पावगींनी विजयी मुद्रेनें विचारलें, म्हणजे या जाहिरातींतला दैवी दगड तुम्ही लाभणारा खडा समजाल! तर मग ऐका, आम्ही अशिक्षितही तसेंच समजलों. मग बिघडलें कुठें? या माझ्या शंकेवर त्यांनी उत्तर दिलें, कांहीं नाहीं, पण एक दिवस टुपे रेलवे रशीद आली आणि अकरा रुपये नऊ आणे देऊन पार्सल सोडवून

घरीं आणून पाहतो तों काय, एक अर्धा मण वजनाचा पाटा. महिरपीच्या आकाराचा अक्षरशः दगड, आणि तो दैवी असल्या-बद्दल त्याच्याबरोबर प्रोफेसर मछंदरची लेखी ग्यारंटी. लाभणारा खडा म्हणून मागवला आणि येऊन पोहोचला हा भाग्याचा धोंडा– हे तुमच्या इंग्रजी भाषेचे उपकार !

जगांतल्या इतर कित्येक अन्यायांबरोबरच इंग्रजी भाषेबद्दलही पावगी मला जबाबदार धरतात. कारण काय तर आग्रा, अलाहा-बाद, अलीगड, बडोदा, बनारस, नागपूर, सागर आणि उस्मानिया या सर्व विद्यापीठांनीं दुष्टपणें पावग्यांना प्रवेशपरीक्षेंत इंग्रजीमुळें ( किंवा बिनइंग्रजीमुळें ) दगा दिला होता, आणि इंग्रजीच्या पेपरांत पास व्हायलाच हवं या माझ्या मतानें मी शत्रुपक्षाला फितुर झाल्याइतका पावग्यांना माझा राग येत होता. तथापि मी त्यांना मुख्य मुद्याकडे आणण्यासाठी विचारलें, तुम्हाला सुमारें तीस रुपयांची चाट बसली हें कबूल, पण नोकरी जाण्याशीं त्याचा काय सबंध ? ते म्हणाले तेंच तर मी सांगतों आहे पण तुम्हीं ऐकाल तर ना ? मी ऐकायला तयार असल्याचें दर्शविलें व त्यांनीं सुरुवात केली. जिथें मी नोकरीला आहे (किंवा होतो) तें ठिकाण तुम्हाला माहीतच आहे, 'पेनल्टिमेट रेस्ट होम' किंवा 'पूर्व-विराम,' थकलेल्या वृद्धांसाठी शेवटच्या अगोदरचें विश्रांतिस्थान. माझी नोकरी कारकून–काम्पाउंडर अशा दुहेरी स्वरूपाची होती. मी तुम्हांला केव्हांतरी सांगितल आहे की आमचे साहेब डॉक्टर नोरोना, नुरानी ऊर्फ निरणे ( एम. डी., एफ. आर. सी. एस. नॅशनल, खांडवा ) यांनीं सुखवस्तु पण असहाय म्हाताऱ्यांसाठीं या जगांतलें शेवटचें स्टेशन याअर्थी ही सस्था चालवून एक किफायतशीर धंदा मांडला आहे. ज्यांचे हातपाय चालेनासे झाले पण ऊर्वरित आयुष्य ज्यांना आरामांत काढण्याइतकी ऐपत आहे, ज्यांना कोणी मायेचीं माणसें नाहीत, किंवा असल्यास त्यांचें लक्ष आपल्यापेक्षां आपल्या मायेवरच अधिक आहे असा संशय वाटतो, थोडक्यांत म्हणजे ज्यांना उरलेलें आयुष्य उरलेल्या दौलतींत सुखांत गुजरण्याची इच्छा व ऐपत आहे, त्याखेरीज

ज्यांच्या नातलगांना त्यांची घरांत अडगळ वाटते पण इथला खर्च देणें परवडतें, अशा वयस्कांची सोय करून आमच्या साहेबांनीं परमार्थ व स्वार्थ दोन्ही साधले आहेत. ही आदर्श व्यवस्था डॉक्टरांनीं विलायती नमुन्यावरून बनविली आणि तो मुंबईसारख्या ठिकाणीं ठेवल्यामुळे त्यांचा जम चांगलाच बसला आहे. ' होम ' मध्यें भरपूर आकार देऊन राहणारे दहाबारा म्हातारे नेहमी असतात.

होममधल्या पाहुण्यांची माझी चांगली ओळख व्हावी हें साहजिकच होतें (आम्ही पेशन्टांना मुद्दाम पाहुणे म्हणत होतो त्यांनाही बरें वाटे आणि हेहि ठिकाण कायम राहण्याचें नव्हे हा अर्थ सूचित होई ) माझा विशेष दाट परिचय तीन म्हाताऱ्यांशी झाला होता. जुने आफ्रिकेचे व्यापारी हाशमभाई करीमभाई, सालाझार बेकरीचा मालक झेवियर सालाझार आणि अबकारी खात्यातले पेन्शनर मोझेस एलिजा चौलकर. हाशमभाई मला आफ्रिकेच्या हकिकती सांगे, झेवियर बाबा रोज ' पावगी पाव घे ' अशी कोटी करून घरून येणारा स्वतःच्या भटारखान्यातला पाव देई, आणि मोझेस काका गोड गोड बोलून माझी तारीफ करून माझ्याकडून वर्तमान पत्रांतल्या व गांवातल्या ताज्या ताज्या बातम्या ऐके.

त्या महिरपी दगडाचें पार्सल आलें त्यादिवशीं मन खट्टू झाल्यामुळें मी कुणाशी न बोलतां आपलें काम करीत होतों. माझ्याशी नेहमी कुऱ्यानें वागणाऱ्या नर्स मंजिराबाईनीं मला येऊन सांगितलें की आज हाशमभाई मूडमधे नाहीत. मघांशी ते कबर-स्तानला टलिफोन करून सांगत होते कीं आपली जागा तयार ठेवा. नर्सबाईच्या बोलण्याकडे मीं मुद्दाम दुर्लक्ष करीत होतो, कारण आजपर्यंत ती माझ्याशीं फार घमेंडीनें वागायची. मी तिच्याशीं स्नेहसंबंध जोडण्याचे केलेले प्रयत्न तिनें किती वेळां तरी झिडकारले होते, आणि तिच्या मिजासखोरपणाला कंटाळून अलीकडे मी तिच्याशीं कठोर तुटकपणाचें धोरण ठेवलें होतें. नर्स ही काम्पौंडर पेक्षां वरिष्ठ दर्जाची अशी ऐट ती आणीत होती, पण मी थोडीच ती चालू देणार होतों ? विराममधले वृद्धकपी तिला ' मंजिराबाई मंजिराबाई ' म्हणून दुबळ्या आशाळभूतपणें शब्दांनीं गोंजारायचे,

त्यामुळें ती शेफारली होती इतकी. आज ती बोलायला आली तेव्हां मी तिचा सहवास मोठ्या कष्टानें सहन करतो आहे असें दाखविलें. अतिशय कामांत असल्याचा आविर्भाव करीत मी फळीवरच्या बाटलीतून मेझरग्लासमध्ये एक औंस सायरप मोजून घेऊन तीन औंस अॅक्वाप्यूरा त्यांत घालून तें पिऊन टाकलें. मंजिराबाईनें हाशमभाईची हकीकत पुन्हां सांगितली पण मी मुद्दाम लक्ष नसल्या सारखें भुवया उंचावून विचारले कोण, आपले साहेब? त्यावर ती फणकाऱ्यानें पुटपुटत निघून गेली, की भारीच शिष्टपणा येतो काहीं कांहीं माणसांना कधी कधीं.

माफ करा पावगीजी, या मंजिराबाईबद्दल तुम्ही आज पहिल्यांदाच बोलतां आहांत, मी व्यत्यय आणून कुतुहलानें विचारलें. कारण पावगीमहाराज एक नेहमीं प्रेमांत पडणारे आशावादी ब्रह्मचारी होते. तुम्हीं सांगितलेल्या सुमारे सदतीस नांवांत या मजिराबाई नर्स कधी आल्या नाहीत. पावगी पुष्कळदां दुःखी चेहऱ्यानें कोणत्या तरुणीने आपल्याशी काय हितगुज केलें हें सांगायचें आणि दुसऱ्या खेपेला विचारल्यास मात्र उडवून द्यायचें. कारण दरम्यान त्यांच्या प्रीतीचा विषयहि बदललेला असायाचा. या वेळी, विचारलेली गोष्ट सांगायची नाहीं या व्रीदास अनुसरून तें म्हणाले, आतां ऐकाल कां ?

नर्सबाईच्या बोलण्यांतला मतलब माझ्या लक्षांत होता, ती माझ्या डिस्पेन्सरीतून गेल्यानंतर मी हाशमभाईच्या खोलीत जाऊन विचारलें, काय चाचाजी तब्येत बरोबर नाहीं वाटत ? ते म्हणाले तब्येत काय वाईट आहे बेटा, पण आतां जाण्याचा वखत आला असें वाटू लागलें आहे. त्यांना बरें वाटावें म्हणून मी बोललों, छे छे, अजून दहापंधरा वर्षे तुम्हीं सहज काढाल, अवघी पाऊणशें उमर आहे तुमची. त्यावर त्यांनीं उत्तर दिलें, भाई पावगी, अरे बिझिनेस थांबल्याबर ऑफिस चालू ठेवून काय करायचें आहे ? ही साडेतीन हातांची कचेरी आतां खाली केली तर बरी. हातपाय हालायचे थांबले तेव्हां व्यापार केव्हांच बंद पडला. आतां आखरी आराम इथें या शाही यतीमखान्यांत कशाला ? आतां बिस्तर

कब्रस्तानची जमीन, पांघरूण कबर, आणि उशाला महेरपचा पत्थर.

महिरपीचा पत्थर ! माझ्या डोक्यांत एकदम घंटा वाजली. हाशमभाई आपल्या उदात्त स्वप्नांत रंगून प्रसन्न चेहऱ्यानें आणि शून्य दृष्टीनें स्तब्ध बसले असतां मी सहज बिचारलें, म्हणजे कबरस्तानला टेलिफोन करीत होतांत ते खरोखरच मनापासून म्हणायचें ? ते म्हणाले, हो, रिझर्वेशन करीत होतो, आणि हांसले. त्यांचाच विनोद जणुं पुढें चालूं ठेवल्यासारखें मीहि विचारलें, मग कबरीचीही ऑर्डर दिली कां, आणि महिरपीच्या दगडाची ? हाशमभाई बोलले, कबरीचे पैसे देऊन ठेवले आहेत. महेरपचा दगड हवा कीं नसला तरी चालेल हें ठरवलें नाहीं अजून. मी उद्‌गारलो वा वा, बाकी सगळी तयारी जय्यत ठेवल्यावर महिरपीचा दगड हवाच— आणि मी त्याच्याही पुढें जाऊन सांगतो की या पावगीच्या मोहबतीखातर तुम्हीं तो माझ्याकडून घ्यावा. त्यांनी आश्चर्यानें विचारलें, काय तुझ्याकडून ? तू कोठून आणणार तो ? मी सांगितलें वाटेल तिथून, तुम्ही मला त्याची ऑर्डर द्या आणि किमत द्या, चोवीस तासांत मी महिरपीचा दगड आणून दाखल करतो— अगदीं कंप्लीट, त्याच्या तुमचें नांव, तारीख सारें खोदवून. छे छे, हाशम-भाई म्हणाले माझ्या कबरीवर नांव नको, त्यापेक्षां एक चांद व यासीन कोरला तरी पुरे. त्यांनीं एका कागदावर लटपटत्या हातांनीं एक चंद्रकोर व एक शुभसूचक अरबी अक्षर काढून मला दाखविलें. तो कागद व पन्नास रुपये त्यांच्याकडून घेऊन मी निघालों. आर्ट-स्कूलमधल्या एका मित्राच्या वशिल्यानें पांच रुपये देऊन माझ्या त्या दैवी दगडावर चांद व यासीन कोरवून घेतले व दुसऱ्या दिवशीं तो पाटा एका पाटीवाल्याच्या डोक्यावर देऊन हाशमभाईच्या खोलीत आणला व त्यांच्या पायथ्याकडच्या भिंतीला टेकून ठेवला, बिछान्यावर मागें टेकून पडल्यापडल्या तो त्यांना सहज दिसावा अशा बेतानें. माझ्या धांवपळीचें त्यांना इतके कौतुक वाटलें कीं माझा महिरपीचा दगड जरी लहान होता, अगदी जसा हुबेहूब कबरीला लागतो तसा नव्हता, तरी चालेल म्हणून त्यांनीं आनंदानें स्वीकारला.

बिछान्यावर टेकून बसून त्या दगडाकडे पाहण्यांत व येणारा जाणाऱ्याबरोबर त्याबद्दल हास्यविनोद करण्यांत हाशमभाईचा रोज बराच वेळ जाऊं लागला. आठ दिवस गेले. त्यांचे जवळचे नातलग आप्तेष्ट वगैरे ये न त्यांची शेवटची म्हणून भेट घेऊन डोळे पुशीत निघून गेले. पंधरा दिवस गेल्यानंतर एक कारकून रोज तासभर येऊन हाशमभाईचा वाढता पत्रव्यवहार पाहूं लागला. स्वत: आतां ते बिच्छान्यावर पडून न राहतां हळूहळू खोलींतल्या खोलींत फिरूं लागले. तीन वार लोटल्यावर ते गाडीत बसून फिरायला जाऊं लागले. महिन्याभरानें ते चांगले खडखडीत बरे होऊन आपल्या पायांनीं घरीं गेले. आपली आश्चर्य कारक तंदुरुस्ती माझ्या महिरपीच्या दगडामुळें झाली असें ते हांसत हांसत म्हणत व कधींहि जरूर पडली तर माझ्यासाठी आफ्रिकेंत नोकरी तयार आहे असें आश्वासन त्यांनी मला दिलें. जातांना तो दगड मीं परत मागितला तेव्हां त्यांनीं माझ्याकडून त्याची अर्धी किमत पंचवीस रुपये वसूल करून मगच तो मला दिला.

आमच्या साहेबांची एक किफायतशीर खोली खाली करणारा तो दगड आतां कोणाच्या नजरेस न पडणेंच बरें म्हणून माझ्या कारकुनी टेबलाखालीं तो मी ठेवून दिला. त्याच्या निमित्तानें मंजिराबाई माझ्याशीं बोलण्याचा प्रयत्न करते हें माझ्या लक्षांत आलें, पण मी माझा ताठपणा कायम ठेवून तिला कटवूं लागलों. तिच्या बडबडीमुळेंच झेवियर सालझारला त्या दगडाची माहिती कळली. तो भटारी वयानें ऐंशींच्या जवळजवळ होता तरी त्याला जगायची हौस भारी होती. अंथरुणाला खिळला होता तरी त्याला साऱ्या गोष्टी हव्या : चविष्ट खाणेंपिणें, तीनदां कपडे बदलणें, रोजचे पेपर वाचवून घेणें, रेडिओ ऐकणें, औषधी दारू घेणें, प्रसंगीं दोन्हीकडे दोन माणसांनीं धरून सिनेमाला देखील जाणें, साऱ्या कार्यक्रमांना त्याला उत्साह. झेवियरबाबानें मला बोलावून विचारलें, काय रे सायबा, तो थडग्याचा दगड मला ओपशील काय ? मी म्हणालो शंभर रुपये, आणि अट अशी कीं तो तुला लाभला तर घरीं जातांना तो मला फुकट परत द्यायचास. तो म्हणाला,

आणि नाहीं लाभला नी मी मेलो तर ? मग तूं माझ्या विकतो-रला, धाकट्या लेकाला शंभर रुपये द्यायचे. अखेर गुण न आल्यास निम्मे पैसे परत अशी तडजोड झाली.

हा सौदा झाल्यावर मंजिराबाई मान उडवून म्हणाली कीं लागोपाठ दोनदां नशिबाचा अनुभव चांगला कधीच येत नाहीं. नवसत्ता किंवा लोकवार्ता चौकट कोड्यांत लागोपाठ दोनदां कोणी पहिलें बक्षिस मिळविलें आहे ? तिच्या शंकांची मी आढ्यतेनें नुसतें एकदां पाहून उपेक्षा केली.

झेवियरबाबाला तो दैवी दगड लाभायला जरा जास्त दिवस लागले. कारण सुधारण्याच्या फाजील उत्साहामुळें अधिक श्रम होऊन तो जास्तच आजारी पडला. पण त्यांतून एकदां बरा झाल्या-नंतर बेतानें राहून सुमारें दोनअडीच महिन्यांत बड्ढा चांगला टुणटुणीत झाला. दरम्यान माझ्याकडून घेतलेल्या समाधिशिळेवर त्यानें नवीन लेख कोरवून आणला होता. त्याच्या शिल्पकारानें त्या दगडावरची पूर्वीची चंद्रकोर पुरी करून वर्तुळांत ' आर आय पी ' अशीं अक्षरें बसविलीं होती, व यासीन अक्षराच्या उलट नक्षी कोरून व भोंवतालीं पानें फुलें दाखवून हार बनवला होता. खालच्या कोऱ्या जागेत त्यानें ' झेवियर सालाझार मास्टर बेकर ' (म्हणजे उस्ताद भटारी ) हे शब्द व जन्मतारीख खोदून मृत्युतारखेची जागा कोरी ठेवली होती. पायथ्याकडच्या भिंतीला टेकवून उभ्या केलेल्या त्या पाट्याकडे पहात झेवियरबाबा रोज आपल्या प्रार्थना म्हणूं लागला होता.

लौकरच एके दिवशीं ठणठणीत बऱ्या झालेल्या झेवियरबाबाला होममधून काढून वांद्र्याच्या त्याच्या भटारखान्यांत त्याच्या घरीं घेऊन जाण्यासाठीं त्याच्या पोराबाळांचा परिवार आला. हारतुरे मिठाई वाटून मोठ्या समारंभानें म्हातारा आमचा निरोप घेऊन गेला. माझा दगड मी मुकाट्यानें स्टोअर रूममधल्या एका कपाटा-खालीं नेऊन आणखी दृष्टिआड ठेवला.

कारण सालाझार भटाऱ्याला निरोप देतांना आमचे साहेब जरा खोटे हांसून जुलमाचाच रामराम करतांना दिसले होते. माझ्या

दगडाबद्दल त्यांच्या कानावर गेलें असेल हा माझा अंदाज होताच आणि झालेला प्रकार त्यांना विशेषसा आवडला नसणार हेंहि मी जाणलें होतें. तीन महिन्यांत होममधले दोन पाहुणे बाहेर पडावेत आणि तेही पूर्ण बरे होऊन, हा प्रकार आमच्या पूर्वविराम ऊर्फ पेनल्टिमेट रेस्ट होममध्यें आजपर्यंत कधी घडला नव्हता. जेथले पाहुणे फक्त परलोकालाच जायचे तेथून आपल्याच लोकांत सुखरूप परत जावेत, निजधामाला जाण्याऐवजीं क्षेमपूर्वक स्वतःच्या घरीं चालू लागावेत, या घटना आमच्या संस्थेच्या दृष्टीनें विपरीतच म्हणायच्या. मोझेसकाका चौलकर म्हणायचे कीं स्वर्गाच्या हद्दींत शिरण्याच्या अगोदरची कस्टम चौकी म्हणजे आमचे होम. आमचे डॉक्टर या जकात नाक्यावरची दस्तुरी तर पाहुण्यांच्या हयातीत पुरी वसुल करून घेत होतेच, शिवाय त्यांना संस्थेबद्दल आपुलकी वाटायला लावून त्याची मागें राहणारी इस्टेटही त्यांनी या लायक कार्याला देऊन टाकवी असें ते पाहुण्यांना नम्रपणें सुचवीत असत. महाग दराच्या गिऱ्हाईकाला आपल्या दुकानाकडे संस्था या दृष्टीनें पाहायला लावून त्याच्याकडून देणगीही मागायची अशा चलाखीवरून तुमच्या लक्षांत येईलच कीं आमचे साहेब डॉक्टरची झूल पांघरलेले एक दुकानदार होते. हाशमभाई व झेवियर बावा या दोघांच्या तब्येती सुधारून ते दोघे गेले तेव्हां त्यांच्यामागे त्याच्या इस्टेटीतून देणग्या मिळायची आशाही गेली, आणि तूर्तास म्हणजे महिना प्रत्येकीं तीनचारशें रुपये देणाऱ्या दोन खोल्या खाली झाल्या.

माझी खात्री आहे कीं मंजिरा नर्सबाईच्या बडबडेपणामुळें साहेबांस माझ्या त्या दगडाची हकीगत कळली, आणि त्यांनीं मला बोलावून यथास्थित दम भरला. ते म्हणाले काय रे पावगी ? माझे दिवाळें काढायचा तुझा विचार आहे काय? इथें मरायला येणाऱ्या लोकांना जिवंतपणें घरी घालवायचा हा उद्योग कुणी सांगितला होता तुला ? तुझा तो दगड उद्यांपासून ऐकू देखील येतां कामा नये. कुठें आहे तो ? कुठें असेल तेथून तो फेकून दिलास तर ठीक, नाहींतर हांकलून देईन ताबडतोब इथून. याद राखून रहा.

देवदयेनें आपली चामडी जाड असल्यामुळें साहेबांनी तंबी दिल्याचें मला इतकें वाईट वाटलें नाहीं, पण मंजिराबाईच्या लुडबुडीचा मात्र फार राग आला. ती माझ्याशीं बोलायला आली तेव्हां (साहेब जवळपास नाहींत ही खात्री करून) मी तिच्या चोंबडया चुगलखोरपणाची खूप हजेरी घेतली, इतकी कीं ढसढसा रडवली तिला. आजपर्यंत माझ्याशीं इतकी मिजाशीनें नी ऐटीनें नी तुच्छपणानें वागणाऱ्या त्या मंजिराबाईची मी चांगली ख्याल उतरून टाकली. ती पुष्कळ उत्तर द्यायला लागली, स्फुंदत स्फुंदत कांहींतरी म्हणू लागली, कीं मी नुसती गंमत म्हणून सगळयांना सांगितल हो, मला काय माहीत, नी एवढी लाभणारी वस्तू दुसऱ्याला कशाला विकायची, मेलं स्वतःचं कल्याण कां नाहीं करून घेऊं, वगैरे, पण तिच्या गैरलागू मुद्यांची दाणादाण उडवीत मी पुरती सुनावली तिला.

एरवीं गाईसारख्या गरीब दिसणाऱ्या पावगी महाशयांच्या चेहऱ्यावर क्षणभर आलेली मस्ती पाहून मला आश्चर्य वाटलें. मंजिराबाईला ऐकवल्याच्या वीरश्रीत हा प्राणी उभा राहून किंग-कॉंगसारखी छाती बडवून डुरकणी फोडणार असें दिसू लागलें. मग पुढें? मी मुद्दाम जांभई देत विचारलें. पावगी कठोर मुद्रा करून दुसरी कडच्या भिंतीला सांगू लागले.

माझी नेहमीची हासतखेळत वागणूक बंद झाली हें तेथील पाहुण्यांच्या लक्षांत येण्यास वेळ लागला नाहीं. त्यांना माझ्याकडून तर कांही कळलें नाहींच. मंजिरादेखील कोणाला कांहीं सांगत नव्हती, पण मोझेसकाकानें तिला खुलवून मोठेपणा देऊन बावळट बनवून मुद्याची हकीकत खुबीनें काढून घेतली कीं (त्यांच्या खोडसाळ समजुतीप्रमाणें मंजिरा नर्सबाई व हणमंत नानाजी पावगी हेडक्लार्क–कांपौंडर यांच्यांत प्रेमकलह झाला अशापैकीं कांही कारण नसून) साहेबांनीं तापवलें म्हणून पावगी गंभीर झाला आहे. साहेबांनीं तापवण्याचें कारण ? एक भाग्यदायक दगड, कीं ज्याच्यामुळें इथलें दोन 'मरीझ' पुन्हां तगडे होऊन परत गेले.

मोझेसकाकांना ही दगडाची गोष्ट फैलावायला नको होती.

माझ्या आतां लक्षांत येतें की माझ्या त्यांच्यात कांहीतरी गुपचूप ‘ समझोता ’ व्हावा असा त्यांचा प्रयत्न होता. पण ते मंजिरेशीं गुलुगुलु बोलत असतां ते काय बोलतात हें ऐकायला बुढाकाका बेजनजी कावाराणा म्हणून एक आमचा जुनाट पाहुणा, पेपर वाचायच्या मिषानें मुद्दाम मोझेसकाकाच्या अर्ध्या उघडया दाराशीं घोंटाळत राहिला, व लौकरच होममधल्या तमाम वृद्ध पाहुण्यांना कळलें कीं पावगी जवळ एक अशी समाधिशिळा आहे कीं जिच्या-वर नांव लिहिलें असतां त्या नांवाचा मालक मृत्युपंथाकडून परत जीवनपंथाकडे वळतो—अर्थात त्यांना इतक्या पुस्तकी भाषेंत कळलें नसलें तरी समजलें कीं पावगीजवळ एक दैवी दगड आहे. या माहितीनें आमच्या संस्थेंत एक चोरटी खळबळ उडाली. डॉक्टरना कळूं न देतां एकेक म्हातारा मला त्या दगडाबद्दल हलकेच विचारूं लागला. एकानें तर पांचशे रुपयांची ब्लाइंड ऑफर दिली. सर्वांना मी तो दगड फेकून दिला हें उत्तर देत होतो. पण तेवढयानें भागले नाहीं. त्या दगडाबाबतच्या कुतूहलानें पाहुणेमंडळींत उत्कंठा, मानसिक चलबिचल आणि अस्वस्थता इतकी झाली कीं रक्तदाब, पॅलपिटेशन्स, अतिसार इत्यादि तक्रारी सुरू होऊन आमच्या एरवींच्या पथिकाश्रमाला इस्पितळाचें स्वरूप आलें,आणि आमच्या साहेबांना आपल्या डॉक्टरी उपाधी शाबीत करून दाख-विण्याची वेळ आली. त्यांनीं शहाणपणा करून वेळींच खरोखरचा डॉक्टर आणला म्हणून ठीक, नाहींतर आणखी कांहीं खोल्या खालीं होण्याची वेळ आली होती. त्यांना जरी कोणी कांहीं सांगितलें नाहीं तरी नुसत्या संशयावर मला एकदां त्यांनीं दरडा-वून विचारलें कीं फेकून दिलास कीं नाहीं तो दगड ? आणि मी अर्थातच मख्खपणें हो म्हणालो. ते म्हणाले, पुन्हां जर कधीं त्याचें नांव निघालें तर नोकरी जाईल तुझी. मीं हो म्हणालो.

तसा तो सुदैवी दगड मी टाकूनच दिला होता. पडला होता त्या स्टोअररूममधल्या कपाटाखालीं. मी कांहीं तो घेऊन पुन्हां ‘ पत्थरका सौदागर ’ व्हायला निघालो नव्हतो. पण एक दिवस मोझेसकाकांनीं वाजवीपेक्षां जास्त सहजपणें मला विचारलें काय

पावगी महाराज तुमचा तो लकी स्टोन कुठें आहे? फेकून दिला, मीं म्हटलें, आणि तर्क करूं लागलों की या बुढ्ढ्याला त्या दगडाचा ठावठिकाणा कळला की काय – आणि तो कसा? तो म्हणाला तुम्ही तो फेकून दिला असेल पण तो कुठें आहे हें तुम्हाला माहीत असेल, तोपर्यन्त तुम्ही त्याच्यावर सौदा करूं शकाल. मी म्हटलें मला सौदा करावयाचा नाहीं, माझी नोकरी जाईल. तो म्हणाला तुमची नोकरी न जातां तुम्हाला फायदा होत असला तर? मी विचारलें कसा? तो म्हणाला तुम्हीं टाककेला दगड मीं उचलला समजा, आतां फक्त तुम्हीं तो कुठें टाकला हें सांगण्याबद्दल तुम्हांला किमत देईन मीं. किती? सालाझार इतकी? नाही, हा सौदा उघड नाही, निम्मी किमत. छे, हा सौदा काळाबाजार आहे, दुप्पट किंमत, दोन दिवस हुजत घालून पाऊणशें रुपयांत सौदा झाला. मग दोन दिवस दगडावरची झेवियरबाबाची नांवनिशाणी काढून त्याबदली मोझेसकाकाचा वर्तुळांत दुहेरी त्रिकोण आणि हिब्रू मजकूर कोरण्याचा खर्च किमतींतच, की वरती त्यानें द्यायचा, याबाबत आमची घासाघीस झाली. अखेर दगड आहे त्या स्थितीत मीं त्याला पाऊणशेंला विकायचा हें ठरलें. मग तो म्हणाला की तूंच तें जुना मजकूर काढून नवा घालायचें काम करून आण, खर्च मी देईन. किमतीपैकीं मला त्यानें पन्नास रुपये आगाऊ दिले आणि बाकीचे 'शिलालेख' बदलून तो दगड त्याला एकदां दाखवण्यासाठी आणल्यावर त्यानें द्यायचे व मग तो सांगेल तेथें दगड पोहोचविण्याचें ठरलें.

मीं मोठ्या शिताफीनें तो दगड स्टोअररूममधून काढून घेऊन एका किरिस्तांव थडगीवाल्याकडे गेलों व त्याच्या कारागिराकडून मोझेसकाकाला हवें तसें काम करवून घेतलें. त्यानें अगोदरच सांगितलें कीं जुनी इमारत पाडून नवी करण्यासारखें काम आहे, चार्ज जास्त होईल, मी सांगितलें पर्वा नाही. बिल देणारे मोझेस-काका होते.

योग्य वेळीं तें काम पुरें झालें व तो तिसरा समाधिलेख कोर-लेला भाग्यशाली दगड मी हलकेच संधी पाहून होममध्यें आणला.

साहेबांची वेळ चुकवून मोझेसकाकाच्या खोलींत नेऊन त्याला दिसेलसा तो मी ठेवतों न ठेवतों इतक्यांत मंजिराबाई तेथें डोकावल्या. हें काय डॉक्टर येतील ना ! म्हणून घाबरून म्हणत त्यांनीं एका दाईच्या मदतीनें तो दगड लगबगीनें तेथून हालवला, आणि मोझेसकाका कौतुकानें म्हणाले वा, त्यांना पहा किती काळजी ! ही वेळ शिल्पकाराचें बिल त्यांना देण्यास योग्य आहे असें पाहून मीं तें त्यांच्या हातांत दिलें.

बिल पाहतांच बिछान्याला टेंकून पडलेला मोझेसकाका ताडकन उठून बसला, त्याचे डोळे विस्फारित झाले. काय ? अठ्ठावन रुपये दोन आणे ? असा हंबरडा फोडून त्यानें वेदना झाल्यासारखी डाव्या बाजूची छाती दाबून धरली आणि मागें उशीवर डोकें टेकलें. तो उठलाच नाही.

त्याची आरोळी ऐकून साहेब खोलींत धांवत आले. त्यांच्या कामचलाऊ डॉक्टरीनें देखील मोझेसकाकाचा श्वास, नाडी व हृदय बंद पडल्याची ग्वाही दिली. ते तपासणी करून उठले व बुचकळ्यांत पडल्यासारखे इकडे तिकडे पाहूं लागले. समाधिलेख दुरुस्तीच्या बिलाकडे त्यांचें लक्ष गेलें. तपशिलवार लिहिलेलें तें माझ्या नांवाचें बिल वाढत्या क्रुद्ध चेहऱ्यानें बाचून त्यांनीं माझ्याकडे पाहिलें. साहेब माझ्यापर्यंत पोहोचण्याच्या आंत मीं रस्त्यापर्यंत पोहोंचलों. नोटिशीच्या पगाराची गोष्ट देखील न काढतां मीं नोकरीला रामराम ठोकला. फाटकांत लगबगीनें बाहेरून आंत येणाऱ्या मंजिरेकडे मीं लक्षहि दिलें नाहीं, मागें फाटकांत उभा राहून माझा साहेब मोठमोठ्यानें शिव्या देत होता हें मीं नुसत्या तर्कानें जाणलें मागें वळून देखील पाहिलें नाही.

खोलीत दिवसभर झोंप काढल्यानंतर विचार केला की निराणे डॉक्टरकडची नोकरी गेली तर हाशमभाई आफ्रिकेंत नोकरी देईल. शिवाय झेवियरबाबानें तोंडभर सांगितले आहे कीं मी आहे तोपर्यंत तुला कधीं पावाला कमी पडून देणार नाही. दरम्यान आपला तो दगड हस्तगत केलेला बरा. डॉक्टर निराणे–नुराणी–नोरोना यांच्या पूर्वविराम ऊर्फ ' पेनल्टिमेट रेस्ट होम ' मध्यें माझा नशिबवान दगड

सुखासुखी पडूं देणार नव्हतों मीं. आतां मंजिराबाईशीं बोलायला मला हरकत नव्हती. डॉक्टर होममध्यें नसण्याची वेळ साधून संध्याकाळीं मीं नर्सबाईला फोन केला तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं तुमची वस्तु सुरक्षित आहे. संध्याकाळीं आपल्या घरीं या, चहा-लाच या सात वाजतां, म्हणून त्यांनीं टेलिफोन ठेवून दिला.

मी थोडचा नाखुषीनें मुद्दाम उशिरा आठ वाजतां मंजिराबाई नर्सच्या बिऱ्हाडीं गेलों. (आपल्याला बुवा बायकांच्या घरीं जाणें आवडत नाहीं.) त्यांनीं दार उघडतांच मी विचारलें तो दगड कुठें आहे? तें सांगतें मग, आधीं चहा तर घ्या. मीं पुन्हां म्हणालों माझा तो दगड कठें आहे? मला सरळ उत्तर न देतां मंजिरा मला म्हणाली जेवत असलांत तर आणखी दोन चपात्या टाकते, चटणीच वाटीत होतें तुम्हीं आलांत तेव्हां, वाटूनच टाकतें अर्धी राहिली आहे ती. बसा, म्हणून ती स्वतः चटणी वाटायला बसली. दगड कोठें आहे? हा माझा तिसऱ्यांदा प्रश्न पुरा होण्याच्या आंतच मला दिसलें कीं माझा सुदैवी दगड पालथा घालून मंजिरा त्याच्यावर चटणी वाटीत होती.

इतकेंच नव्हे तर धीटपणें टकटका माझ्याकडे पाहात ती म्हणाली, साहेबांच्या नजरेंत येऊं नये म्हणून मीं हा पाटा तिथून घरीं आणून टाकला, तुमची नोकरी याच्यामुळें गेली नाहीं, तुम्हींच घालवलीत. आणि हा पाटा मीं आतां तुम्हाला देणार नाहीं. या घरांतून हा लाभलेला खडा हलणार नाहीं. हा हवा असला तर तुम्हीं रहा इथें येऊन.

मग मग? मी उत्सुकतेनें विचारलें. क्षणर्धांत पावगीनीं अपेक्षित उत्तर दिलें, मग काय, मीं तिथून निघून गेलों.

...पावग्यांच्या जीवनांतल्या .नाट्यपूर्ण घटना बहुधा अशाच संपतात. तरी ते आशावादी ब्रह्मचारी आहेत.

✦✦ ✦✦

: १३ :

## ' बंका पिक्चर्स ' कृत महाभारत

दुसऱ्या महायुद्धाचे जे दूरगामी परिणाम झाले त्यांत शेठ बंकटलाल भंडारा आणि शेठ कानजीभाई खाराघोडा यांची युति हा एक महत्त्वाचा परिणाम होय. हे दोन बाजारबहाद्दर एके ठिकाणीं येऊन त्यांच्या भागीदारींत एक फिल्म कंपनी निघावी या घटनेचें मूळ गेल्या जागतिक युद्धांत कसें सांपडतें तें पहाणें उद्‌बोधक होईल. खाजणी गावाचा वाणी–दुकानदार सरकारला लाख पुरविणारा मक्तेदार झाला व दोनतीन वर्षातच लाखोपति बनला. आयुष्यांत प्रथमच जिवाची मुंबई करायला तो आला असतां, एका षौकीन वाटाड्याच्या व दलालाच्या सूचनेवरून त्यानें कोणा अडलेल्या निर्मात्याकडून ' सभी – फुरकत ' नामक नाचगाण्याचें मोहबतचित्र सी. पी. सी. आय्. (अथवा मध्यप्रदेश–मध्यभारत ) या मुलखासाठीं स्वस्तांत घेतलें. तें त्या प्रांतांतून ठिकठिकाणीं दाखविण्यांत त्याला बरकत आली व त्यानें हाजीपूरला एक सिनेमा घेतला. लौकरच आणखी एक चित्र, मग आणखी एक सिनेमा घेतला. लौकरच आणखी एक चित्र, मग आणखी एक सिनेमा, असे सौदे करीत तो पांच थिएटरांचा व सहा चित्रांचा ( त्याच्या हद्दीपुरता ) मालक बनला. दरम्यान या

नव्या धंद्याच्या निमित्तानें त्याच्या मुंबईस पुष्कळ फेऱ्या झाल्यामुळें मुंबईतल्या फिल्म–धंद्याशीं त्याची अधिक ओळख झाली. एक लहानसा स्टुडिओदेखील त्याच्याकडे गहाणांत आला. ही झाली शेठ बंकटलाल भंडारा यांची हकीकत.

शेठ कानजीभाई खाराघोडा यांचा इतिहास थोडा वेगळा होता. ते मुंबईसच सरसाच्या धंद्यांत होते. लढाई सुरू होताच त्यांनीं सरकारला सरस पुरविण्याच्या निमित्तानें एका चांगल्या वसाहती-जवळ सरसाचा कारखाना काढला. त्याच्या भोंवताली अर्धा मैल, वरळी गटाराच्या सवाई घाण नेहमीं सुटत असल्यामुळें आसपासची वस्ती उठून गेली व त्या जमिनी कानजीभाईंनी कारखाना वाढविण्याच्या सबबीवर सरकारकडून सवलतीत मिळवल्या. लौकरच लढाई थांबली व कानजीभाईंनी आपला कारखाना बंद करून आपली जागा तुकड्या तुकड्यांनीं भारी किफायतीत विकली.

तथापि त्याच्या जादा उत्पान्नावर जबर प्राप्ती–कर बसणार हें पाहून, बुडीत खातीं टाकण्यासाठी ते दुय्यम धंदे शोधू लागले. तेव्हां त्यांनाहि एक हुषार मध्यस्थ भेटला व त्यानें दाखविलें कीं मिस फकरुन्निसा, चंद्रकला, हेमगौरी इत्यादि तारकांच्या चित्रांना जर आर्थिक साहाय्य केलें तर बुडीत खर्चाच्या रकमा कामीं लावून दिल्यासारखें होऊन, किफायत दाखविण्याची कधीं वेळ न येतां पैसा मात्र काम देत राहील. सरकारला एक्सेस प्रॉफिट–टॅक्स् देण्यापेक्षां नुकसानखातीं रकमा टाकून भांडवलहि कारणीं लागतें व दिलहि बहलावतां येतो, हें पाहून शेठ कानजीभाई खुषीनें अनेक चित्रांचें सावकार झाले. आणि अशीं चित्रें शेठ बंकटलाल-कडच्या गहाण स्टुडिओंत भाड्यानें निघत असतांनाच उभय व्यापारपति परस्परांजवळ आले.

सेठियाद्वयाच्या या युतींतून निर्माण झालेली कंपनी म्हणजेच 'बंका पिक्चर्स.' त्यांत शेठ बंकटलाल व कानजीभाई यांच्या नांवाचीं आद्याक्षरें होतीं, इतकेंच नव्हे तर अंकसामुद्रिकानुसार त्यांतील अक्षरांच्या बेरजेचा आंकडा शुभसूचक होत होता. ( त्याखेरीज 'बंका' या शब्दाचें 'बैंक' या शब्दांशीं ध्वनि

साधर्म्य कंपनीचा भक्कमपणा सुचवित होता. )

ही कंपनी रजिस्टर करून, तिचे मॅनेजर म्हणून टाइपिस्ट गुडास्वामी, अकौंटंट म्हणून बिल्क्लार्क खेमराज व निर्मिती-व्यवस्थापक म्हणून दत्ताराम देवठाणकर अशा नेमणुका झाल्या. या सनदशीर अधिकाऱ्यांखेरीज ‘बेटा जमाल’ ऊर्फ बस्तर अबदुल्ला ( मिस् फक्रुन्निसेचा प्रतिनिधी ), डॉक्टर नीरोशास्त्री ( ज्योतिषी, वैद्य, मध्यस्थ व सोबत ), नदिमूर्थी ( इंग्रजी तज्ञ, वकिली सल्लागार, गुप्त व खाजगी कामगिऱ्यांत निष्णात ) असे बिनदप्तरी मंत्रीहि ‘ बंका पिक्चर्स’च्या सल्लागार–मंडळांत होते. या मंडळांतील चर्चेखेरीज बंकाटशेठचा मेहुणा, कानजीशेठचा बाजारमास्तर, असे बिनसरकारी सूचनाकारहि कंपनीच्या धोरणाबाबत आत्मीयतेनें शेठ लोकांना वेळोवेळीं सुचेल तें सांगत होते.

‘ महाभारत ’ हें चित्र कंपनीनें प्रथम काढण्याचा विचार केला तो अशासाठीं कीं मिस् फकरून्निसा यांना द्रौपदीचें काम करण्याची फार हौस होती. हें त्यांचें हृद्गत प्रथम बेटा जमालनें व नंतर स्वतः मिस् फकरुन्निसेनें शेठ कानजीभाई यांना सांगितलें. त्यांनीं वेळ पाहून शेठ बंकटलालला सुचविलें. बंकटशेठनीं मूसा तबलजीकरवी बाई नर्मदासी यांची संमत्ती (आपल्यालाहि काम मिळून दोन नाच व तीन गाणी वाटचाला येतील या त्यांच्या अटीवर) मिळविली. मुनशि ताझीम झिंदाबादी यांना निरोप गेला व त्यांनीं महाभारताच्या गोष्टीद्दल चौकशी करण्यास सुरुवात केली.

महाभारताचा अफसाना, किस्सा किंवा हकिकतनामा काय, तो पत्ता काढून सुमारें आठपंधरा दिवसांत मुनशी ताझीम चारपांच साजिंद्यांसह ‘ न्यू मार्टगेज स्टुडिओज ’ मध्यें ‘ बंका पिक्चर्स ’च्या कचेरींत दाखल झाले. त्यांच्याबरोबरच्या ताफ्यांत: फारोक फत्तेपुरी (लिहून घेणारा), सुरिंदर चिनसुरा (पद्यलेखक), मंडरू मुलतानी (संवाद–दिग्दर्शक) व पंडित पियारसिक मस्त (हिंदी तज्ञ ) अशी मंडळी होती. ‘ महाभारत ’ चित्राचें कथानक शेठ लोकांपुढें व सल्लागार – मंडळापुढें ठेवण्यांसाठीं मुनशी ताझीम यांना हा ताफा जरूरच होता. मुनशींनीं स्टोरी सांगण्यास सुरुवात केली

कीं फारोकनें योग्य वेळीं 'वाह वाह' म्हणायचें, सुरिंदर यानें एकदम 'गाण्याची जागा!' असें ठरलेल्या ठिकाणीं उद्‌गारावयाचें, मुनशी जरा थांबले कीं मंडरूने 'कमाल है!' 'तुफान है'! क्या ड्रामा है'! असें चकित चेहेरा करून पुटपुटायचें, आणि पंडित मस्त यांनीं पाकिस्तानी शब्दांना हिंदवानी शब्द सुचवायचे, असें पद्धतशीर तंत्र मुनशी ताझीम झिंदाबादी व त्यांचा ताफा यांनीं मिळून बसविलें होतें. 'बंका मिक्चर्स'च्या शेठ–जोडीला व त्यांच्या प्रभावळीला 'स्टोरी सुनाना' या मोहिमेसाठीं याप्रमाणें ताफा तयारीनें आला होता. मुतशीजींच्या नाटयपूर्ण निवेदनाची यथातथ्य कल्पना देण्यास एक स्वतंत्र नाटकच लिहावें लागेल, पण तें लिहून होईपर्यंत येथें निवेदनाचा केवळ संक्षिप्त गोषवारा सांगणें प्राप्त आहे.

महाभारत हा मुनशींच्या मतें 'दर्द–इ–दरुपदि' असा ड्रामा होत होता. त्याची सुरुवात द्रौपदीच्या स्वयंवरानें होऊन त्यांत पांडवांना आपापसांत चढाओढ कयणाऱ्या उमेरवारांच्या भूमिका होत्या. कथानकाच्या सोईसाठी पांडव हे एकेकटे परागंदा होऊन या स्वयंवरांत परस्परांना नकळत एकत्र आले होते. त्याच सोईच्या दृष्टीनें सुभद्रेची ओळख अर्जुनाशी अगोदरच झालेली असून, तिच्याशी प्रणयकलह झालेला अर्जुन स्वयवरांत नवी प्रिया जिंकायला उभा राहिला होता. ऐन वेळी द्रौपदी 'सूतपुत्र' म्हणून कर्णाला हिणवते व तो जाऊत सुभद्रेला सांगतो की, 'तुझा अर्जुन दुसऱ्या स्त्रीसाठी स्वयंवरांत उमेदवार आहे.' द्रौपदी विजयी अर्जुनाच्या गळयांत माळ घालण्याच्या मोक्याला मडपांत सुभद्रा येऊन 'थांबा!' म्हणून ओरडते.

(मिस फकरून्निसा हिला द्रौपदीच्या कामाला भरपूर 'स्कोप' ठेवूनहि बाई नर्मदासी यांना सुभद्रेच्या कामांत कसब दाखविण्याची संधी या स्वयंवरांतील व्यत्ययाच्या निमित्तानें दिली असल्याचा मुनशीजींनी खुलासा केला व सर्वांनीं पसंतीदर्शक माना डोलविल्या.

आपल्या डोळयादेखत आपला प्रियकर दुसरी राजकन्या उडवून नेत आहे, हें पाहून सुभद्रा स्वयंवराच्या मंडपांत आपलें

'मोहिनीनृत्य' सुरू करते, अर्जुन तिच्याजवळ जातो व तें पाहून रागावलेली द्रौपदी भीमाला माळ घालते, आणि त्याबरोबर धर्मराज नकुल व सहदेव प्रकट होऊन भीमाच्या बाजूला उभे राहतात.

( येथें द्रौपदीचा नाच व त्याच्या मागें पांडवाचा कोरस, या देखाव्याला जागा असल्याचें मुनशींनीं दाखवून दिलें. )

द्रौपदी जिंकली अर्जुनानें, तिनें माळ घातली भीमाला, आणि पांचहि बंधूंची बायको म्हणून तिचा पालक झाला धर्मराज, या 'सिच्युएशन' वर 'मै क्या किया, मै क्या करू' हें 'हिट्' गाणें 'फिट्' बसत असल्याचा निर्वाळा येथें सुरिंदर चिनसुरा यानें दिला.

द्रौपदी अर्जुनावर रागावली, पण भीमाला माळ घालून ती पांडवांचीच झाली या घटनेनें चिडलेला कर्ण आता दुर्योधनाकडून सुभद्रेला बळरामाकडे मागणी करवितो. हें द्रौपदीला कळतें, व यादव पांडवांच्या पक्षाकडे रहावेत यासाठी स्वार्थत्याग करून ती अर्जुनाला माफी मागायला पाठवते. ( या 'ट्विस्ट' मुळें दोन्ही 'हिरॉइन्स' ना उठाव मिळतो हें पंडित पियारसिक मस्त यांनीं शेठ पक्षाच्या नजरेस आणलें. )

बंकटशेठनी सूचना केली की अर्जुन व कर्ण यांची एक मारामारी येथे ठेवावी. मुनशीजीनी या सूचनेचा गौरवपूर्वक स्वीकार केला. द्रौपदी पांडवांना मिळाली, सुभद्राहि अर्जुनाला मिळाली, हें पाहून चिडलेला कर्ण कौरवांना भारतीय युद्धाला प्रवृत्त करतो. मुनशी-जींच्या मतें, भारतीय युद्धाचा संक्षेप कौरव-पांडवांच्या द्यूतानतरच्या दंगलीत होऊं शकत होता. म्हणजे तें असें योजिले होतें की, 'द्रौपदी व सुभद्रा दोघीहि पांडवांनी अन्यायानें जिकल्या आहेत, तरी त्यांनी एक कोणती तरी सोडावी,' अशी खोडसाळ सूचना कर्णाच्या प्रोत्साहनानें दुर्योधन करतो. या मुद्यावर आपण युद्ध करण्यास तयार नसल्याचें धर्मराज जाहीर करतात. तेव्हां द्यूताने काय तें ठरवावें असें कर्ण सुचवतो व द्रौपदी–सुभद्रेसाठी कौरव–पांडवांचें केवळ द्यूत–युद्ध होतें. त्या युद्धांत धर्मराज द्रौपदीस हरतात, पण दुर्योधनाची अशी छद्मी सूचना येतें कीं, 'द्रौपदीबदली पांडव जरी सुभद्रा हरले तरी आपल्याला पुरें आहे.' यावर अर्जुन उसळून

उठतो, व प्राण गेला तरी सुभद्रेला अंतर देणार नाहीं हें जाहीर करतो. त्यावर द्रौपदी फणकाऱ्यानें उठते व कौरवपक्षाकडे जाऊं लागते. पण भीमसेन तिला खेंचून परत आणतो. यावर कौरव गिल्ला करतात व द्यूतसभेंत कौरव–पांडवांची मारामारी सुरू होते.

येथें भीम व दुर्योधन यांच्यामध्ये ' चंद्रलेखा ' बोलपटासारखी तलवार–लढाई ठेवावी ही कानजीशेठची कल्पना मुनशींनीं आनंदानें मजूर करून घेतली.

द्यूतयुद्धाच्या गडबडींत कर्ण द्रौपदीला रथावर घालून पळवून नेतो. त्यावेळी अर्जुन व सुभद्रा यांचें बागेंत एक 'डयुएट' चालू असतें, भीम व दुर्योधन यांचें गदायुद्ध जुंपतें व तें थांबवण्यास धर्मराज मध्यें पडलें असता त्यांना घाव लागतो, विदुर सर्वांची निर्भर्त्सना करतो आणि कौरव–पांडवांत समेट होतो–तेव्हांच द्रौपदी व कर्ण बेपत्ता असल्याचें सर्वांच्या लक्षात यतें.

इकडे कर्णाच्या तावडीत सांपडलेली द्रौपदी गोपालकृष्णाचा धांवा करते व कित्येक 'ट्रिकसीन्स' नंतर सुदर्शन चक्र द्रौपदीभोंवती फिरतांना दिसतें. तिला धरू पहाणारा कर्ण त्या चक्रांत सांपडून गरगरा फिरू लागतो.

हा सगळाच ' सिकवेंन्स ' टाळ्यांचा असल्याबद्दल फारोक व मदरू या दोघांनी ग्वाही दिली मुनशी विनयाने ' आदाब अर्ज ' करून पुढे म्हणाले की, अर्जुन व सुभद्रा यांच्यामध्यें खुद्द भगवान प्रकट होतात व अर्जुनाची थट्टा करून त्याला कर्णाकडून द्रौपदीला आणावयास पाठवतात. तसेंच पुढे जाऊन श्रीकृष्ण कौरव–पांडवांत जाऊन समझोता करवून देतात व त्याप्रमाणें कौरवांना कुरुस्तान व पांडवांना पाडुस्तान हे हिस्से मिळून सर्वांचें 'आमन हो आमन' हें समगीत होतें.

ही स्टोरी शेठझ्याला एकदम पसंत पडली व तिच्यावर पिक्चरहि निघालें. एवढेंच की सेन्सारच्या जाचामुळें त्याचें 'महाभारत' नांव बदलून 'झगडेका नतेजा' असें ठेवण्यांत आलें. तें कोठतरी लागूनहि गेलें आहे.

◆◆ ◆◆

: १४ :

# तीर्थाच्या घागरी

( ही गोष्ट माझे जुने मित्र श्री. गो. ल. आपटे यानीं अगोदरच लिहिली आहे; ती एक हकीकत म्हणून माझ्या कानावर आली तेव्हा मीही गोष्ट लिहिली—व वाङ्मयचौर्याचा आरोपी बनलो. )

' मी तुला आश्वासन देतो (माझा मित्र बन्या म्हणाला ) की मी तुला स्टेनलेस स्टीलचं एकही भांड विकण्याचा प्रयत्न करणार नाही, मी तुला दुसरीच एक गंमत सांगायला आलो आहे. '

असें म्हणून बन्या धूर्तपणें गप्प बसला पण मी थोडीदेखील जिज्ञासा न दाखवितां टेबलावरचें मासिक चाळू लागलों. बन्याच्या सद्हेतूबद्दल मला विश्वास नव्हता असें नाही, पण त्यानें बरोबर आणलेल्या बॅगवर " बी. कोशीसकर, वि शेफील्ड जयपूर स्टेनलेस स्टील युनियन् 'चकाचक' पोलादी भांडी " हा गजकूर पाहून मी सावध राहिलो होतो.

वाचकांस माहितच आहे कीं, सध्या महाराष्ट्रात स्टेनलेस स्टीलच्या भांड्यांच्या गिऱ्हाइकापेक्षां विक्रेतेच अधिक असल्याचा भास होतो. जवाहिऱ्यापासून किराणदारापर्यंत सर्व व्यापाऱ्यांच्या दुकानीं हीं भांडी विकायला आहेत यांत नवल नाहीं. पण कारकून, मास्तर–मास्तरणी, नर्सबाया, कामगार. भटजी, फार काय प्रोफेसर,

वकील, डॉक्टरदेखील या भांड्यांचे प्रतिनिधी आहेत अशी कुजबूज सर्वत्र ऐकू येते.

खुद्द पुढारी स्टेनलेस स्टीलचे फिरते विक्रेते नसावेत, पण त्यांचे नातलग, संबंधी, भगत (व प्रसंगीं त्याच आडनांवाचे लोकही) हीं भांडी विकण्याचा प्रयत्नकरतात असें मात्र म्हणतात. वीर सावरकर आणि भाई डांगे यांची सुटका झाल्यानंतर त्यांना बातमीदारांच्याही अगोदर स्टेनलेस स्टीलच्या 'धडाडी' सेल्समननें गांठलें ही बातमी जरी अतिरंजित वाटली तरी इतकें मात्र खरें की, एका नामांकित वाङमय संघांत चिटणिसाकडून सभासदांवर स्टेनलेस स्टीलचीं भांडीं खरेदी करण्यासाठी फाजील दडपण येतें या सबबीवर निम्या अधिक सदस्यांनीं एकदम राजिनामे दिले.

साहजिकच बन्याच्या बॅगवरची धोक्याची सूचना पाहून मी हुशार राहिलों होतों. आतां त्याला हकीकत सांगायची सुरसुरी आली होती ही गोष्ट वेगळी. हकीकत ऐकून घेण्याची माझी तयारी होती– म्हणूनच तो काय सांगणार यांत आपल्याला यत्किंचितहि गोडी नाही असें दाखवीत मी त्या मासिकांतले चुटके शोधीत होतों.

काल रात्री नागपूर एक्स्प्रेसला पाय शिरकवण्यापुरती जागा मिळाली तेव्हां पुष्कळ झालं असं वाटलं. ( बन्या सांगू लागला ) पण वर्धेस एक मारवाडी, त्याचे तेवीस लहानमोठे डाग आणि पांच आबालवृद्धांचा परिवार यांसह जेव्हां उतरून पडला, तेव्हां तर मला एक मबध वरची फळी खाली मिळाली. गाडी सुटेपर्यंत मी लेटूनदेखील दिलं

गाडीतल्या अर्धवट झोपेंत मला थोडथोडीं स्वप्नं पडत होतीं आणि माझं मलाच आश्चर्य वाटत होतं की,–मला हीं स्वप्न कां पडताहेत ? मी कथा ऐकायला बसलो आहे, तर कधी पुराण ऐकायला उभा आहे, कधी कीर्तन चाललं आहे आणि देवळांतल्या भाविकांच्या गर्दीत मीहि आहे. अशी त्रोटक स्वप्नें मला पडतील असं कोणी सांसितलं असतं तर मी हसलों असतों, कारण १० व्या १२ व्या वर्षानंतर मी कधी कथाकीर्तनालाच काय पण देवळांत- देखील गेल्याचं आठवत नाही मला. जर कधीं देवळांत गेलोंच तर

प्रदक्षिणा कोणत्या बाजूनें कुणीकडे करायची हें सुद्धां मला नक्की सांगतां येणार नाहीं.

—आणि मला तर अगदी धार्मिक स्वप्नं पडत होती !

विशेषत: स्वप्नांत एक कीर्तनकार श्रद्धेबद्दल बोलत होता आणि बोलतांबोलतां तो जोर देऊन म्हणाला, "श्रद्धाहीन, आज काल सगळे श्रद्धाहीन झाले आहेत !" मी जागा झालों आणि डोळे किलकिले करून पाहिलें पगडी डगला या पोषाखांत एक व्यक्ति डब्यांतल्या बाकीच्या प्रवाशांना ( त्यांनी कांही एक खोड काढली नसतांना) फुटकळ प्रवचन ऐकवीत होती.

दिवस फटफटत होता, गाडी नादगांवला थाबली व मी उतरून तोंडबिड धुवून परत येऊन खालच्या बाकावर एका कोपऱ्यांत जागा मिळाली तिथें बसलों. पगडीवाल्या गृहस्थाच्या सर्वसाधारण बोलण्यावरून ही स्वारी भुसावळला डब्यात आली हें कळल व माझ्या पहांटेच्या भाविक स्वप्नांचा उलगडा झाला. माझ्या कोपऱ्यातून मी त्या माणसाला निर्वेधपणें बारकाईनें न्याहाळून पाहिले.

डोक्याला चकचकीत पगडी, गुलछबू चेहरा, लाल कांठाचं घडीदार उपरणं, पांढरा लॉंग कोट, काळ जाकीट, शर्टला सोन्याचीं बटणं आणि एका बोटांत अर्ध्या सुपारीएवढचा पिवळ्याजर्द खड्याची आंगठी. स्वारीची चौकस नजर सगळीकडे फिरत होती, व मधूनमधून श्लोक, भजन, निरूपण अशा कार्यक्रमाबरोबरच दोनतीन माणसांशी संवादहि चालला होता.

"आज मनुष्यप्राण्याच्या ठायी श्रद्धा उरली नाही ! सर्वत्र नास्तिकता बोकाळली आहे, देवाचं नांवहि कुणाला आठवत नाही, मोक्षाचा मार्ग तर दूरच ! मग आतां साखर महागली तर तक्रार का करतां ? पुण्यमार्गानें चला आणि तोंड गोड करून घ्या !

"अमच्या गुरुमहाराजांच्या वाढदिवसाला थाडंथोडकें नाही, साडेचारशें पान जेवलं महाराज अगदी पंचपक्वान्नाचं जेवण! इतकी साखर कुठें मिळाली असेल म्हणतां ? ऐका ! श्रद्धेनें मणोगणती साखर तयार केली ! भक्तांनी गुरूमाउलीवर डोळे मिटून विश्वास टाकला आणि त्यादिवशीं आचाऱ्यांना सहा पोतीं साखर बिनबोभाट मिळाली !"

हळूहळू गृहस्थाच्या बोलण्यावरून (व बोलत असतां त्यानें मधूनमधून कान धरून जीभ चावणें, डोळे मिटून हात जोडणें, 'सद्‌गुरू सद्‌गुरू' असें नामस्मरण करणें अशा तपशिलावरून) असं लक्षांत आलं कीं, 'सदरहू गृहस्थ अनन्तकोटी ब्रह्मांडनायक श्री १८० सद्‌गुरूशिरोमणि मोतीबुवां'च्या मठसंस्थानचे कारभारी, महाराजांचे पट्टशिष्य, सल्लागार आणि भक्त आहेत. त्यांचे गुरू अद्‌भुत राजयोगी, दैवी देणगीचे वारसदार, चमत्कारकर्ते आणि बड्या शिष्यवर्गाचे सत्ताधीश आहेत. त्यांचा बादशाही आश्रम—

'पुण्य क्षेत्रच साधुवास रखडी ओहोळिकेच्या तटीं
स्वामी श्री गुरू मोतिराज प्रभुची मूर्ति जिथें गोमटी'

रखडी येथे असून मनमाडवरून तिकडे जाता येतें.

'कोणीही येऊनी। धरा गुरुपाय। त्वरित उपाय। संकटांचा॥
मोती महाराजा। सकळांच्या काजा।
धावे जैसा गजा– हांकें हरी॥'

असा भक्तिरसानें ओथंबलेला प्रचार त्या माणसानें भुसावळ-पासून मनमाडपर्यंत अव्याहत चालवला होता. त्याची हरदासी कथा, श्लोक, ओव्या, साक्या, दिंड्या, फटके, कटाव, आरत्या अशा सर्व काव्यगायनप्रकारांचे नमुने दाखवीत गाडीच्या बरोबरीनें दौडत चालली होती. एकदां तर त्यानें 'सौभद्र' नाटकांतल्या 'कोण तुजसम साग गुरुराया कैवारी सदया' या पदालादेखील वेठीला धरण्यास कमी केलें नाही!

पण जेव्हा गृहस्थानें बरोबरचा गडी गहेनाजी यालाही गुरुभक्तीचें एक पद म्हणायला लावलें तेव्हां मात्र डब्यांतले सोशीक लोकदेखील बिघडले 'आ–आ–आ–आ–मुझे किसीसे प्यार होगया' या आजतागायत चालीवर—

'या–या–या–या– गुरुवरास शरण जाऊं या' अशा प्रकारचें भक्तिगीत भसाड्या आणि ठार संगीतशून्य आवाजांत ऐकून सह-प्रवाशांच्या सहनशक्तीचा अगदी कडेलोट झाला. इतका वेळ गप्प बसून बचावाचें धोरण ठेवणारे मुशाफर आतां तोंड उघडून चढाईचे डावपेच करूं लागले. गाडीनें मनमाड नुकतंच सोडलं होतं आणि

'आतां नाशिकला गाडी थांबणार' ही माहिती, इतका वेळ मुळींच न बोललेल्या एका माणसानं सर्वसाधरण डब्याला उद्देशून जोरांत सांगितली. त्याबरोबरच इशारा मिळाल्याप्रमाणें इतर प्रवाशांनीं आपलाही बोलण्याचा हक्क शाबीत करून एकाच माणसाची मक्तेदारी बंद करून टाकली.

"कुठून आलेत भटजीबुवा ?" इतका वेळ भाविक चेहऱ्यानें निमूटपणें बसलेल्या एका भूमिजनानें थोडें तिरसटपणें विचारलें.

'भटजीबुवा' या शब्दानें थोडा गुर्मीत येऊन गृहस्थ जरा आढ्यतेनें म्हणाला, "क्षेत्राहून"

"यात्रेला गेला होतां वाटत?" अडत्यासारख्या दिसणाऱ्या एका इसमानें जांभई देत देत चौकशी केली.

"या दिवसांत तिकडे कुठली यात्रा?" दुसऱ्यानें शंका काढली.

"तीर्थांना गेलों होतों, हरिद्वार, काशी, प्रयाग, " ही नांवें घेत असतांना गृहस्थानें हलकें तोंडांत मारून घेतल्याचा अभिनय केला.

"मग काय आणलं तिथून ! कांही प्रसादबिसाद आणला असला तर द्या कीं ! आपल्यासनी पुन्य लागेल."

"तीर्थ आणलं महाराज ! गंगा आणली—साक्षात् गंगामाई" गृहस्थानें कान उपटून घेतल्याचा अविर्भाव केला.

"नाहीं तर मग ह्ये जाम तोंड बद केलेले घडे कसले समजलेत ?" त्याच्याबरोबरचा भाविक गडी गहेनाजी यानं विजयी स्वरांत विचारलें. खरोखरच गृहस्थाचं मुख्य सामान म्हणजे पत्र्याच्या झांकणांना डाक लावून पक्क्या बंद केलेल्या बऱ्याच घागरी होत्या.

"का हो शास्त्रीबुवा, इतकी गंगा ?" एकानें आश्चर्यानें विचारलें.

'शास्त्रीबुवा' या संबोधनानें खुलून गृहस्थ म्हणाला,

"मठांत सगळे मला दिवाणजी म्हणतात. इतकी गंगा म्हणतां ? ही कांहीं नाहींच—प्रसगी याच्या तिप्पट गंगा नेलेली आहे मी रबडीला ! त्याशिवाय नर्मदा, कधीं तुंगभद्रा, एकदां तर सिंधूदेखील गुरुमहाराजांसाठीं अष्टोदरशे घागर वाहून नेली आहे. जिथें

महाराज, नाथांच्या घरीं प्रत्यक्ष श्रीहरीनें कावडी भरल्या, तिथें माझ्यासारख्या पामरानें महाराजांसारख्या अवतारी पुरुषासाठीं घागरी वाहिल्या तर त्यांत काय झालं ? या वेळेला तर अवघ्या सहा घागरी– गहिन्या, सहा घागरी दिसत नाहीत रे ? एक दोन ...पांचच दिसताहेत–?"

गहिनाजी घागरी मोजायला उभा राहिला आणि सहावी घागर मिळाली. तिच्यावरच तो बसला होता.

"हात वेड्या, त्याच्यावरच बसला होतास होय ? आणि त्या घागरीच्या तोंडावर चुंबळ कसली बांधली आहेस ? "

"कांही नाही जी मुंडासं घेतलं होतं बसायला–" गहिन्या गडबडून सांगू लागला, आणि तें सोडवायचा प्रयत्न करूं लागला.

"काढून टाक, काढून टाक तें ! गाढवा, गंगेच्या तोंडावर मुंडास बांधून वर आणखी बसतोस ? छे, छे, श्रद्धा नाही वेड्या अजून तुला !"

"नाही जी दिवाणजी शरधा मोप आहे. म्हूनतर जिवापाड संभाळून आणलं नव्हं का ह्ये हंडे ?"

"बरं बर त्या नीट बसव घागरी सगळ्या, हेंदकाळणार नाहीत अशा." इतर प्रवाशांकडे तोंड करून दिवाणजी गंभीरपणें म्हणाले, "अहो गंगा ती ! आपोआप उचंबळून येते. आणि आतां तर काय आपण नाशकाच्या जवळ यायला लागलों; गोदेच्या परिसरांत गंगामाईला उनावर भरतं येतं. भजबूत डबल डाक देऊन साऱ्या घागरीच्या तोंडावर पत्रे बसवले आहेत म्हणून ठीक, नाहीतर काय सांगावं महाराज–

गोदावरिच्या निकटी येतां
जैशी उफाळते गंगा ।
तैसा श्रीगुरुचरणी भक्तांचा
संघ घालितो पिंगा ।।

"आमचे गुरुमहाराज गंगाजलाखेरीज पाणी घेत नाहींत. त्यांच्या भेटीला साधूसंत येतात. त्यांच्या प्रकृतीच्या मानानें त्यांना दुसऱ्या महानद्यांचीं तीर्थ द्यावीं लागतात. श्री मोतीबुवांच्या रबडी मठाला

खुद्द गंगाजलाचा तर अखंड पुरवठा आहे. मी तर तिमाहीला काशी प्रयागाची वारी करतो श्रीमान् ! अधिकारी पुरुष आहे मडळीं, मठाजवळच्या ओहोळी नदीत देखील स्वामींनीं एकदां गंगेचा ओघ आणून दाखवला होता."

दिवाणजी आपल्या गुरुच गुणगान करीत असतां व सगळे कंटाळलेले प्रवासी दगडी चेहरा करून ऐकत असतां, एकामागून एक सगळ्यांचीं नाकें किंचित वर जाऊन एक दोनदां वास घेतल्या सारखें करूं लागली. एक कडवट आंबूस उग्र दर्प सुटला होता.

"कसली घाण सुटली आहे हो ?" कोणीतरी म्हणाला, सर्वजण त्याला दुजोरा देऊं लागले.

"छे छे, घाण कुठली आली आहे घ्या, घ्या, हे अत्तर लावा" म्हणून दिवाणजींनी कानांतला फाया काढून भराभर सांपडेल त्याच्या हाताला कसलेसें कुजट भपकारा देणारे स्वस्त अत्तर फासण्याचा सपाटा सुरूं केला.

"कांहींतरी नासल्यासारखा वास आहे" अत्तराच्या गुदमरवून टाकणाऱ्या धुपामधूनही एक चिवट चिकित्सक म्हणाला.

"बरोबर आहे, नाशकाची दारूभट्टी जवळ येत आहे. तिचा वास असेल" दुसऱ्यानें तर्क केला.

"वा राव, ती तर केव्हांच बंद झाली ! बाकी, वास तीन फुली छापासारखा आहे खरा" कोणी अभ्यासू उद्गारला. खरो-खरच डब्यांत जो वास सुटला होता तो 'मुरारजीपर्वा' आधी चालू असलेल्या पापयुगात गुत्त्यांच्या बाहेर येत असे तसा होता.

दिवाणजी आतां श्रोत्यांचा नाद सोडून गडबडीनें गंगेच्या घागरीची तपासणी करीत होते. डब्यांतले बाकीचे लोक आपा-पल्या परीनें वासाची चर्चा करीत असतां दिवाणजी गहेनाजीवर डोळे वटारून त्याला कांहींतरी हलक्या आवाजांत दरडावीत होते.

गहेनाजीला हलक्या आवाजांत बोलतां येणें अशक्य होतें. हळूंच बोलण्याइतक्या परिणतावस्थेला त्याची संस्कृति पोहोंचली नव्हती. तो आपल्याकडून हळूं म्हणून जें सांगत होता तें दूर बसून लक्षपूर्वक ऐकणाऱ्या माझ्यासारख्या माणसाला ऐकूं येत होतें.

" काय करू, तहान अनिवार झाली व्हती जी, जीव तडफडत होता अन्ना, म्हून काल रात्रीं खांडव्याहून निघाल्यावर च्याकूनं वाईच् एका बाजूचा थोडा पत्रा उचकाटला—

" ह्य !!"

"—उगाच गागता करापायी इकतं ? पंचपात्रीभरबी म्या प्यालो न्हाई अन ही गंगा लई त्येज द्येवा. जीव कोंडला, घसा जनु भाजून निघाला—नी वास किती ! म्हूनसाठी तर म्या तिच्यावर मुडागाची चुबळी बांधली..."

दिवाणजी चवताळून पुटपुटत गहेन्याला शिव्या देत होता आणि गहेनाजी धीमेपणानें डब्याबाहेर पहात ऐकून घेत होता. डब्यांतली मंडळी जरा हलक्या आवांत कांहीतरी कुजबुजत मधूनमधून हंसू लागली होती. डब्याच्या पलीकडच्या अर्ध्या भागांतून मधल्या चिंचोळ्या वाटेंत येऊन एकदोन लोक कुतूहलपूर्वक आम्हां सर्वांकडे पाहून गेले. पलीकडच्या भागांत तोंडाशींच बसलेला एक धुवट सफेत टोपी कुडत्यातला चष्मा लावलेला आंबट चेहऱ्याचा असामी मधूनमधून रागानें आमच्या बाजूला चष्म्यांतून पहात होता.

इतक्यांत गाडी एका नदीच्या पुलावरून जाऊं लागली पुटपुटत गहिन्याचा शद्धार करीत असलेले दिवाणजी एकाएकीं थांबले. त्यांचा चेहरा तळपला, त्यांनीं डब्याचं दार उघडले आणि गहिन्यानें फोडलेली ती घागर उचलून 'जय गंगे ! जय गोदे !' म्हणून नदींत टाकून दिली !

दार लावून घेऊन उपरण्यानें कपाळावरचा घाम पुशीत दिवाणजी म्हणाले,

" गंगे—गोदेचा संगम करून देणाराला एकशेंआठ गोप्रदानांचं पुण्य आहे, अनायासें लाभलं ! 'भग्न आणि दोष लागलेली गंगा गोदेत टाक' असा गुरुमाउलीचा साक्षात्कार झाला मालक ! धन्य धन्य गुरुराय ! निरंतर सेविन तुमचे पाय ! " दिवाणजीनें डोळे मिटणे, कानाला हात लावणें, तोडांत मारून घेणें, हात जोडणें वगैरे सर्व कवाईत ओळीनें करून टाकली.

पण भोतालचें अश्रद्ध वातावरण कांहीं कमी होत नव्हतें.

मुशाफर एका नव्या कौतुकानें दिवाणजीकडे पाहूं लागले होते.

" तुमचे गुरुजी नेहमी हीच गंगा पितात म्हणतां बुवा ?"

" याला म्हनावं गुरुभगती !"

" किती जोखमीचं काम व्हो ह्ये ?"

दिवाणजी निगरगट्टपणे हसरा चेहरा ठेवून, मधूनमधून गुरुस्तुतीचे तुकडे पुटपुटत, कधीं कधी इतर प्रवाशांना उत्तर देण्यासाठीं उत्सुक असलेल्या गहेनाजीवर खेकसून त्याला गप्प करीत, सर्वांना तोंड देत होते.

बुवाबाजीवर लेख वाचून कुतुहलाने अस्वस्थ असलेला पण इतका वेळ गप्प राहिलेला एक साक्षर प्रवासी चमत्कारिकपणें हांसून म्हणाला

" मग मजा असेल तुमच्या बुवांच्या मठांत ?"

दिवाणजींनीं त्या माणसाकडे बारकाईनें पाहात सहज सांगितलें, " आनंद आनंद ! अवघाची आनंद ! महाराज, भक्तिरसाचा पूर लोटतो नुसता !" चौकस गृहस्थ निरुपायाने चूप बसला.

पण बराच वेळ विचार करीत असलेला एक माणूस म्हणाला, " कांहो बुवा, जर तुमचं ते रबडी कीं कोणचं गांव त्याला मनमाडावरून जावं लागतं तर मनमाडला तुम्ही कां उतरला नाहींत ?"

" श्री स्वारीचा मुक्काम तूर्त पुरुषोत्तम मासानिमित श्रीक्षेत्र पंचवटींत आहे " दिवाणजींनीं डोळे मिटून धन्य मुद्रेनें सांगितलें.

नाशिक स्टेशन आलें. ' गहिन्या, नीट हुशार रहा बरं का बेट्या, मी येतो हमाल घेऊन ' म्हणून दिवाणजी प्लॅटफॉर्मवरच्या लोकांचं निरीक्षण करीत उतरले व गर्दीत लौकरच दिसेनासे झाले. गहिन्या डब्याबाहेर तोंड काढून त्यांची वाट पहात उभा राहिला. पलीकडच्या अर्ध्या डब्यांतला परीटघडी चष्मेधारी खादीपोश असामी उतरून आमच्या डब्याकडे चष्म्यांतून मोठे डोळे करीत पहात गेला.

पांच मिनिटें झालीं. नाशिकला उतरणारे बाकीचे लोक उतरले, तरी गहिन्याचे दिवाणजी हमाल घेऊन येण्याचं कांहीं चिन्ह दिसेना.

इतक्यांत एकाएकी गहिन्याला कांहीं कल्पना सुचून तो गाडीच्या दुसऱ्या बाजूच्या दाराकडे गेला. प्लॅटफार्म नसलेल्या बाजूचं तें दार उघडून तो सरळ खालीं उतरला व आजुबाजूला न पाहतां त्यानें धीम्या चालीनें नाशिकच्या अजिबात उलट दिशेचा रस्ता धरला. बघतां बघतां तो रूळ ओलांडून प्लॅटफार्म चढून जाऊन कुंपणाला वळसा देऊन पलिकडच्या मळ्यांत दिसेनासा देखील झाला.

मी परत वळून पाहतों तो दरम्यान एक नवी घटना सुरू झाली होती. डब्यात दोन पोलीस येऊन सीलबद घागरीची कसोशीनें तपासणी करीत होते व दाराशीच प्लॅटफॉर्मवर धुवट खादीविभूषित महाशय सात्त्विक संतापानें देखरेख करीत होते. आणि दिवाणजी परत आले नाहीत ते नाहीतच. अखेर पोलिस त्या उरलेल्या पांच घागरी घेऊन गेले.

* * *

" मग काय एक फर्स्ट क्लॉस मॉडर्न ॲश ट्रे ठेवू का स्टेनलेस स्टीलचा ? ओनली थरी ट्वेल्व्ह–"

मी दुसरीकडे गेलो. स्वतःच्या चालू धंद्याची आठवण होणें नि ती मला जाणविणें ही बऱ्याची गोष्ट संपल्याची निशाणी होती.

++ ++

## कोंबडा आणि रत्न

उकिरडा उकरीत असता एका कोंबड्याला एक रत्न सापडलें. प्रथम त्याला वाटलें, की यापेक्षा एखादा धान्याचा दाणा मिळता तर अधिक उपयोगी होता; पण पुन्हा त्याला आठवलें, की पुष्कळ माणसें जवळच्या रत्नाचा उपभोग स्वतः न घेता ते बाजारांत विकून आपली उपजीविका करतात. हें लक्ष्यांत येतांच कोंबडा दलालाच्या शोधार्थ निघाला.

तात्पर्य :– कोंबड्याला माणसाचे अनुकरण करण्यांत पुरुषार्थ वाटावा हा युगमहिमा होय !

: १५ :

## महाराष्ट्र औचित्य समिति

ओहो या, वा वा रावसाहेब ! आपलीच वाट पहात होती मडळी !

बाकी सगळे आले का ? आलेच बहुतेक. काय, कसं काय पंत ?

ह्यः ह्यः ! रावही आहेत इथं--

नमस्कार. वा, अण्णासाहेब, मीं पाहिलंच नाही तुम्हाला-काय तात्या ?

नानासाहेब म्हणताहेत कीं होऊंद्या सुरुवात.

ठीक आहे, दाजिबा, अजेण्डा-म्हणतो विषयपत्रिका काढा.

आपलें मूळ पत्रकच वाचतों, म्हणजे समितीचा हेतु व तिच्या पुढचें कार्य याची यादीच सभासदांपुढें ठेवल्यासारखे होईल.

मला वाटतें तेंच बरे; आपण कशाकरतां जमलेले आहोंत त्याची उजळणी झालेली बरी.

वाचा तर मग दाजीबा.

वाचतो— ' महाराष्ट्र औचित्य समिति. मराठी भाषेच्या अभिमान्यांस आग्रहाची विनंति, हें पत्रक मनःपूर्वक वाचा व आपल्या मित्रांस दाखवा. '

पुढें, पुढें-

'जी मराठी ज्ञानराजांनीं आपल्या–'

तो इतिहास वाचून दाखविण्याची कांहीं जरूर नाही मला वाटतें.

'वाचू देत त्याचीहि उजळणी होईल.

अलमुपहासेन, प्रस्तुतमनुसरामः!

'मराठी भाषेचे शिवाजी, विष्णुशास्त्री यांनी ज्या मराठीला–'

तोही परिच्छेद गाळा. अगदीं आजच्या परिस्थितीपासून सुरुवात करा.

'अशी ही मराठी आज सस्कृति-विनाशक, मूर्तिभंजक, पावित्र्य विडम्बक, अश्लील, असभ्य व ग्राम्य लेखकांच्या तावडींत सांपडली आहे. द्रौपदीसारखी ( अहो द्रौपदीसारखी नको ) तिची सुटका करून तिला शुद्ध, श्लील, सभ्य, नागर व सुसंस्कृत बनविण्यासाठी देशांतील विचारी लोकांनीं एकत्र येऊन औचित्याची दिशा सर्वसाधारण जनतेला–'

( हें काय ? सावळारामबुवा टेबलाखालीं सरपटत कां हिंडत आहेत ? )

( ते होय ? सर्वांची वस्त्रे ठिकाणावर आहेत की नाहीं हें पाहण्यासाठीं. )

'–सर्वसाधारण जनतेला दाखविणें अवश्य आहे.'

म्हणून सरस्वतीच्या दरबारांत सभ्यतेची, श्लीलतेची व संस्कृतीची ज्यांना चाड असेल, त्यांनी खालील पत्त्यावर पत्रव्यवहार करावा–

अजून विषयपत्रिका नाही कळली.

यानतर होणाऱ्या चर्चेतच विषय निश्चित होतील.

हं, अण्णासाहेब, करा सुरू तुम्ही.

(ख्यहंम्) सभ्य गृहस्थहो, आतांच आपण ऐकलेल्या पत्रकानुसार पत्रव्यवहार करून साहित्यशुद्धीच्या तळमळीनें आपण एकत्र आलेले आहोंत. आपले विद्वान् अध्यक्ष यांनी सुचविलेलें 'महाराष्ट्र औचित्य समिति' हें नाव आपण एकमतानें धारण करावें असें मीं सभेपुढें मांडतों. अनुकूल एक–दोन–तीन...तेरा; प्रतिकूल–शून्य; ठराव मंजूर, यानतर सभासदांनी आपल्या विधायक सूचना मांडाव्या.

पहिली सूचना—मांडणार मीं सावळाराम महाशब्दे. माझी सूचना साहित्यात ग्राम्य, असभ्य व अश्लील असें जेथें जेथें सांपडेल—

थांबा, साहित्याची व्याख्या काय ?

पाठ्य वाच्य, दृश्य, श्राव्य, अशा सर्व प्रकारच्या साहित्यांत मीं म्हणतों तसले कांहीं प्रकार असतील ते शोधून काढण्यासाठीं समितीनें खास तपासनीस नेमावा. त्यानें अनौचित्याचीं उदाहरणें उघडकीस आणावीं.

अध्यक्षमहाराज, एक शंका विचारतों. उचित नसलेल्या गोष्टींचा शोध करण्यासाठी तपासनिसास स्वतः अनुचितपणें वागण्याची मुभा आहे काय ?

जरा जास्त स्पष्टपणें आपली शंका मांडण्याची मीं सन्मान्य सदस्यांस विनंती करतों.

स्पष्टच बोलायचें म्हणजे, ही सभा सुरू झाल्यानंतर सावळाराम-बुवा टेबलाखालून सरपटत सर्वांच्या पेहरावांची पाहणी करीत होते— तसें वर्तन तपासनिसास क्षम्य आहे काय ?

अध्यक्षमहाराज ! वैयक्तिक—

ऑर्डर ऑर्डर ! मी निर्णय देत आहे. ज्या अर्थी आपण साहित्या-बद्दल बोलत आहोंत व तपासनिसाचें वर्तन साहित्यांत जमा होऊं शकत नाहीं, त्या अर्थी त्याच्या वागणुकीतील औचित्याचा प्रश्नच उद्भवत नाही. सन्मान्य सभासदांनी तपासनिसासाठीं नांव सुचवावें.

सावळारामबुवा महाशब्दे हेंच नांव मी सुचवितों. त्यांना हौसही आहे.

म्हणजे ?

शांत व्हा, शांत व्हा ! तेव्हां तपासनीसांची निवडणूक बिनविरोध जाहीर करण्यांत मला हर्ष होत आहे. समितीतर्फे श्रीयुत सावळाराम महाशब्दे यांनीं जरूर ती इतर सभासदांची मदत घेऊन साहित्यांतील अश्लील, असभ्य व ग्राम्य ठिकाणें शोधून काढावीं व समितीपुढें सादर करावीं.

मग मघांच्या निर्णयाप्रमाणें त्यांच्या शोधांचा उच्चार किंवा पुनरुच्चार वरचेवर करण्यास त्यांना हरकत नाही ?

नाहीं. तसे उच्चार करण्याची संधि मिळणें हें एकच पारितोषिक त्यांच्या निरलस उद्योगाला मिळणार आहे, हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे.

पण असभ्य, अश्लील किंवा ग्राम्य कशाला म्हणायचें हें प्रथम ठरलें पाहिजे.

वेळोवेळीं सभासदांची पोटसमिति नेमून तपासनिसांनी उजेडांत आणलेल्या गोष्टीवर निर्णय देतां येईल.

तथापि स्वतः तपासनिसांनीं अश्लीलता, ग्राम्यत्व किंवा असभ्यपणा या दोषांचा संशय कोणत्या पुराव्यावरून घ्यावा ?

त्या बाबतींत त्यांच्या सारासारविचारावर अवलंबून राहणें अपरिहार्य आहे.

तपासनीस दोषारोप कुठल्या प्रकारच्या कसोटीनंतर करतील ? एखादी गोष्ट असभ्य, अश्लील किंवा ग्राम्य कशी ठरवतील, त्याची आगाऊ कल्पना समितीला आलेली बरी.

तपासनीस म्हणून माझी निवड झालीच आहे; तेव्हां मीच सांगतों; वाचण्यासारख्या साहित्यांत कोठें फाजील अंगलगटीचा प्रसंग आढळला, भाषणसाहित्यांत शरीराच्या झांकलेल्या भागांचा निर्देश आला, एखाद्या चित्रांत कपडे अगदीच कमी अथवा विरविरीत दिसले, किंवा एखाद्या गाण्यांत अगर बोलपटांत सोवळ्याला ओंवळें झाल्यासारखें वाटायला लावणारा प्रसंग असला, तर मी असले सारे प्रकार गोळा करून समितीपुढें सादर करीत जाईन, – पण एका अटीवर—

ही अट निवडणुकी आधी सांगितली असतीन तर बरें झालें असतें—

सांगूद्यात, सांगूद्यात.

अट अशी की, माझ्या संशोधनाचे, माझ्या फोटोच्या ब्लॉकसह अहवाल वेगवेगळ्या नियतकालिकांमधून समितीच्या खर्चानें प्रसिद्ध झाले पाहिजेत.

सूचना पुढील विचारासाठीं तहकूब. संशोधनावरून आपण आतां नियंत्रणाकडे वळूं. असभ्य, ग्राम्य किंवा अश्लील असे प्रकार

आढळांत आणण्याची व्यवस्था तात्पुरती झाली आहे; आतां तसल्या प्रकारांविरुद्ध उपाययोजना?

व्यत्यय माफ असावा अध्यक्षमहाराज, पण अनुचित प्रकारांचा प्रतिकार करण्यासाठी प्रथम उचित काय याची व्याख्या ठरलेली बरी नव्हे काय?

असे प्रश्न म्हणजे व्यर्थ कालक्षेप आहे! अनुचित नव्हे तें उचित ही साधी गोष्ट सन्मान्य सभासदांनी विसरूं नये.

आणि अनुचित म्हणजे?

आपले तपासनीस अनुचित म्हणून समितीपुढें जें जें ठेवतील तें उचित ठरेपर्यंत अनुचित समजण्यांत येईल; तेव्हां पुढें नियंत्रणाबद्दल कोणाच्या कांहीं सूचना असल्यास—

साहित्यांतील असभ्यपणा, अश्लीलता, पावित्र्यविडम्बन किंवा ग्राम्यता यांच्यावर नियन्त्रण कोण व कसें आणणार?

त्याबद्दलही सावळारामबुवा महाशब्दे यांची एखादी योजना असेलच?

आहे, मजजवळ तीही योजना आहे, ऐका.

'तपासनीसानें सर्व प्रकारच्या साहित्यांतील अनुचित प्रकार पोटसमितीकडून मंजूर करून घेतले, म्हणजे त्या प्रकारांविरुद्ध लोकमत जागृत करणें, वर्तमानपत्रे व सभा या मार्गांनी निषेध, टीका, धिक्कार यांची झोड उठवणें–'

यासाठींही एक पोटसमिति हवी.

हें सगळे करून साधणार काय?

अनिष्ट गोष्टी चवाठ्यावर आल्यासारखें होईल.

आणि मग?

मग काय, आपलें कार्य संपलें– लगेच दुसरे बघायचे.

हें करण्यापेक्षां समितीकडून अनुचित साहित्य बनवणाऱ्या माणसाला नुसतें पत्र लिहिलें तर?

नाहीं, तें मुळीच चालणार नाहीं. अनुचित प्रकाराची जाहीर चिकित्सा व्हायलाच पाहिजे. नुसत्या पत्राला कोणी दाद देणार नाहीं.

मग काय तुमच्या सभांना आणि लेखांना देणार आहे?

अहो, सभा—लेखांनीं आपलें एक लोककार्य करीत राहिल्या-सारखें होईल.

अध्यक्षमहाराज, अनुभवावरून असें दिसतें कीं पाठ्य, दृश्य, श्राव्य, वाच्य वगैरे सर्व साहित्यांत निषिद्ध प्रकार करणाऱ्या लोकांना टीका, निषेध किंवा धिक्कार चांगलाच मानवतो. अनुचित प्रकारांच्या जाहीर निषेधानें लोकांचें लक्ष तिकडे अधिकच वेधलें जातें व ते प्रकार करणारा चेवल्यासारखा वागतो. यासाठीं जाहीर निषेधापेक्षां अनुल्लेख व उपेक्षा या मार्गांनींच अनुचित प्रकारांकडे पाहावें, कालान्तरानें ते आपोआप बंद पडतील.

मग ही समिति तरी कशाला ?

दुसरे मार्ग शोधतां येतील.

दुसरे तिसरे कांही मार्ग नाहीत; अनुल्लेख आणि उपेक्षा, वा ! आपण त्यांचा अनुल्लेख केला तर आपला उल्लेख कोण करणार ?

म्हणजे स्वयंप्रसिद्धीसाठी ही समिति आहे की काय ?

तुम्हाला पसंत नसेल तर चालू लागा.

अस्स ? तुम्ही सांगणार कोण ? मारतो सगळ्यांना × × × ×

ऑर्डर, ऑर्डर— तेव्हां नियंत्रणानंतर—

म्हणे अनुल्लेख नी उपेक्षा ! आपल्याला कांहीं करायला नको, आणि—

शान्त व्हा सावळारामबुवा —

ते संतापणारच. स्वतःची टिमकी वाजवायला निमित्त—

अध्यक्षमहाराज, सभेंत व्यत्यय येत आहे.

तुम्ही गप्प बसा.

अरे वा ? स्वतःला कोण समजतां आपण ?

अहो—

तुम्ही मध्यें बोलू नका, का हो, काय झालं तुम्हाला ?

अहो तात्या—

चूप, बाजूला व्हा दाजिबा—

रावसाहेब, नानासाहेब—!

पंत, जरा इकडे पहा !

अहो, सावळारामबुवा–

सोडा, सोडा म्हणतों ना मला–चांगला जोड्याखाली ठणकावतों त्याला !

अहो, हा रुमाल पडला तुमचा–

त्यांना आतां धोतराचीही शुद्ध राहायची नाही–

हां, दुरून बोला–

कां रे ××× च्या ?

अहो अहो ! काय हें ! भांडतांना सुद्धां भाषा जरा–

भाषा ? भाषा गेली–××× त !

असं का ? मग घेच ×××× !

ए-- ××××××××× !

मंडळी-मंडळी, आपण—

चूप बैस रे थेरड्या, होऊनच जाउंदे एकदा–एऽऽ–

राव, नाना, पंत, आबा, दाजी—!

" काय ×× ? !

आवरा, आवरा ! !

तुमच्या ×× तुझ्या ××× !

अग आई ग–ए ××–

मारा मारा ! ठोका या ××× ला !

ओबोबोऽऽ ×× मेलों–!

×××! ××!! ×××××!!!

(सभा गोंधळांत बरखास्त)

✦✦ ✦✦

: १६ :

## धोंडू ड्रायव्हर सर्द

ती चकचकीत, गूबगुबीत, लांबलचक, भपकेदार, मांजरासारखी बिनआवाजी आणि गंभीर खर्जात पोंगा वाजवणारी मोटार जरी माझ्या बाजूला येऊन थांबू लागली, तरी मी नाकासमोर पाहात तिजकडे दुर्लक्ष करीत चालत राहिलों. असली मोटर माझ्यासाठीं थांबणें साधारणपणें असंभाव्यच. ती थांबून त्यांतून ' साहेब, साहेब ' या हांका जरी ऐकूं आल्या तरी त्या मला उद्देशून असणें अशक्य, या विचारानें मीं पुढें जात राहिलों. पण माझ्या नांवानेंच हांक आल्यावर तिकडे पाहणें मला भाग झालें.

" चला साहेब, तुम्हाला कुठें जायचं आहे, मीं पोहोंचवतो " धोंडू ड्रायव्हर खिडकीशीं वांकून अगत्यानें म्हणाला.

" नको, मला इथं तर जायचं आहे, मी चालत जाईन." मी म्हणालों अशा कॅडिलॅक किंवा पॅकार्ड गाडीतून जरी मीं झावबाच्या वाडीतल्या माझ्या चाळीपुढें उतरलो, तरी ड्रायव्हरच्या ओळखीपेक्षां या विक्रमाबद्दल श्रेय मला कोणत्याही शेजाऱ्यानें दिलें नसतें हें मी जाणून होतों. पुन्हां गाडींत मागें मालकासारखें बसणें मला साधलें नसतें व धोंडू ड्रायव्हरलाही तें रूचलें नसतें. आणि त्याच्या शेजारी बसण्यांत चाळकऱ्यांवर रुबाब पडला नसता. तेव्हां

धोंडूचें बोलावणें नाकारणें हाच शहाणपणाचा मार्ग मीं स्वीकारला.

"चला कीं साहेब. गाडीबद्दल आपण पहिल्यापासून बेपर्वा हें माहीत आहे मला, पण ती बेपर्वाई शेठ लोकांपुढें, आपल्या या धोंडूसाठीं तरी चला"

माझ्या निस्पृहपणाची धोंडूनें दखल घेतलेली पाहून जरी मला समाधान झालें, तरी गाडींत बसण्यास मीं उत्सुकता दाखविली नाही.

"तुमच्या मदतीची जरूर आहे साहेब! त्याकरतां तरी आज आलंच पाहिजे" म्हणून धोंडूनें अगत्यानें शेजारचा दरवाजा उघडला. यानन्तर त्याच्या शेजारीं जाऊन न बसणे अनार्यपणा ठरला असता. मीं निमूटपणें त्याच्या शेजारीं जाऊन बसलों. माझी तोकडी विडी त्यानें नाकारली व त्यानें दिलेली 'पाचशेपंचावन' सिगारेट स्वीकारून मीं शिलगावली.

धोंडू ड्रायव्हर माझा जुना स्नेही. ज्यावेळी कापसाच्या गांठी मोजून गिरणीबाहेर पाठवायच्या नोकरीवर मीं कारकून होतों त्यावेळीं धोंडू गांठी नेणाऱ्या लॉरीवर क्लीनर होता. पण तो महत्त्वाकांक्षी असल्यामुळें आज एका मोठ्या सटोडियाचा ड्रायव्हर झाला होता आणि मीं कारकूनच राहिलों होतों. धोंडू खाजगी गाड्यांचा ड्रायव्हर झाल्यापासून त्याचा रुबाब इतका वाढला होता की शेठलोक देखील त्याच्याशी अदबीनें वागत, आणि तो शेठलोकांशीं टर्रेबाजी करू शके. याचें कारण विचारतां 'रात्रीच्या गोष्टी दिवसा विसराव्या साहेब' या मोघम सूक्तांत धोंडूनें मला एकदां उत्तर दिलें. मोटरीत फुकट बसण्याविषयी मी उदासीन आहे हैं पाहिल्यापासून धोंडूला माझ्याबद्दल आदर उत्पन्न झाला होता. आणि तेव्हांपासून मी धोंडूच्या मोटरींत मधूनमधून फुकट वसूं लागलों होतों.

"चला वरळीला जाऊन हवा खाऊ साहेब" धोंडू म्हणाला आणि मीं हरकत नसल्याचें दर्शविलें.

"काल रात्री असा 'शाक' बसला आहे साहेब की तेव्हांपासून मीं चक्करच होऊन गेलों आहे."

मीं त्याच्याकडे प्रश्नार्थक भुंवया चढवल्या.

"मीं जें ऐकलं त्यानं इतका थंड पडलों कीं अच्छेर पुरा प्यालों तरी ठीक होणार नाहीं" तो डोळ्यांच्या कोंपऱ्यांतून माझ्याकडे पाहून म्हणाला. मीं निर्विकारपणें समोर पहात राहिलों.

" * * * !" धोंडू उद्गारला. आणि रस्त्यावरल्या एका निरूपद्रवी पायउतारूला त्यानें थोडक्यांत जीवदान दिलें. "दोन, दोनच रुपये कमी पडताहेत साहेब" तो सचिंत मुद्रेनें माझ्याकडे पाहून म्हणाला. "अरेरे किती दुःखाची गोष्ट !" असा मीं अविर्भाव केला. अखेर धोंडू स्पष्ट बोलला. "ते तुमच्याकडून मिळतील अशी आशा होती शेठ."

मीं समोर पाहात राहिलों.

"मी आज एक अशी हकीकत सांगणार आहे, कीं खुशीनें तुम्हीं दोन रुपये काढून द्याल."

मीं 'असली गोष्ट अशक्य' हें दर्शविणारें तुच्छ हास्य केले.

"गोष्ट विशेष म्हणून नव्हे, तर आपला धोंडू सर्द झाला, अच्छेरानें त्याच्या जिवाला आराम वाटावा म्हणून" तो सावध आशेनें पहात बोलला.

"मला हवं तर सोडून दे इथें, मी घरीं जाईन" मीं त्याला निष्ठुरपणें सांगितलें. त्यानें एक सुस्कारा सोडला.

"अच्छेर राहिला. तुमच्या मर्जीची गोष्ट आहे, पण काय झालं, हें तर ऐकाल ?"

असें म्हणून धोंडू ड्रायव्हरनें आपण सर्द कां झालों तें निवेदन केलें.

तुम्हाला माहीतच आहे, (धोंडू म्हणाला) शेठ वैद्यराज महीश या सिनेमा कंपनीवाल्याकडे मीं सध्यां नोकरीला आहे. माझे पूर्वीचे शेठ सोकरजी सॉलिसीटर यांनीं मुद्दाम मला यांच्याकडे नोकरी लावून दिली. जेव्हांजेव्हां मी जुनी नोकरी कंटाळून सोडतो, तेव्हां तेव्हां माझ्या जुन्या गाडीचे मालक आपुलकीनें मला दुसरी नोकरी पाहून देतात.आणि ती मिळेपर्यंत – आणि कधींकधीं मिळाल्यावरही पूर्वीचा पगार चालू ठेवतात. कारण मला फार गोष्टी कळलेल्या असतात, आणि त्यांचा बभ्रा करण्याची बुद्धि मला होऊं नये असा शेठलोकांचा कटाक्ष असतो. सॉलिसिटर झाला म्हणून काय झालं ?

रात्रीं – जाऊं द्या, मुद्दा हा कीं या महीश साहेबाकडे मीं राहिलों. सिनेमाकंपनीचें मालक! पगार तर दोनतीन महिन्यांत नाहीच. पण जेवायला काय दोनतीन रुपये रोज देतात त्यांत गुजराण करीत आलों. आपली तक्रार नाहीं, पगार सांचत राहतो आहे!

काल रात्रींची गोष्ट. तुम्हीं आमच्या लाइनमध्यें नसल्यामुळें तुम्हांला माहीत नसेल पण मिस् अनंगा म्हणून अक्ट्रेस आमच्या शेठजवळ आहे.

"माहीत आहे" मीं मधेच उत्सुकपणें म्हणालों,

"संसार सोडून ती महीशकडे येऊन राहिली आहे. ती एक नर्स होती, आतां मोठी तारका झाली आहे!"

"आणखीही एक सांगतो, सध्यां तिची डायरेक्टर कुलुंगवारशीं विशेष दोस्ती आहे, आणि ती महीशला सोडणार इथपर्यंत गांवात बातमी आहे!"

मीं कारकून असलों तरी निदान सिनेमासृष्टींतल्या लफड्यांबद्दल माझी माहिती आजतागायत आहे. हें धोंडूला दाखवण्याचा मोह मला आवरला नाहीं. त्यानें भलत्याच आदरानें माझ्याकडे पाहिलें.

"याच्यावर आणखी काय सांगायचं साहेब? पण काल रात्रींची गोष्ट–" म्हणून त्यानें सुरुवात केली, आणि तो सांगू लागला. "अलिकडे बरेच दिवस, आमचें हें 'पलंग वीणा' पिक्चर सुरु झाल्यापासून अनंगा आणि डायरेक्टर कुलुंगवार यांची दोस्ती जरा जास्तच झाली होती. हे दोघे मोटरीतून एकटे केव्हां कसे व कुठें जातात हें सांगण्याचा आमच्या शेठचा मला गुप्त हुकूम होता. (त्यासाठीं तर हें रिष्टवॉच त्यांनीं मला दिलें) आणि त्याच गोष्टी शेठजींना न सांगण्यासाठीं कुलुंगवार डायरेक्टरनें मला ही आंगठी दिली. नटी आणि दिग्दर्शक यांची दोस्ती आमच्या लायनींत कांहीं विशेष समजत नाहींत – नसली तरच लोक हांसतात, पण नटी ही जेव्हां शेठची, असा धारा असतो तेव्हां डायरेक्टरनें कांहीं गडबड करायची नसते.

पण या कुलूगवारानें पलंगवीणा पिक्चरचें शूटिंग करतांकरतां अनंगाबाईशीं कसें सूत जमविलें हें त्याचें त्याला ठाऊक! बाकी

हुषार मनुष्य ! रोज पितो, आणि आपण स्वतः एकदांही खर्च करीत नाहीं.दोनदोनशें रुपयांचे सूट घालतो, पण कधीं छदाम त्या शिष्याला दिला नाहीं. मोटरशिवाय हिंडत नाहीं, तरी स्वतःची मोटर कधीं ठेवली नाहींन पठ्ठयानं !

या पलंगवीणा पिक्चरला सुरुवात झाली, आणि आमच्या शेठचे सर्व ग्रह फिरले. पूर्वी मुलतानी लोक पैसे घ्या म्हणून मागे लागायचे. आतां हुंड्या पटवतां पटवतां बिचाऱ्याचे नाकीं नऊ येतात. तब्येत बिघडलेली, पोटदुखीनें पछाडलेला बिचारा, आणि पिक्चरचं काम तर चालू. सगळं कुलुगवारकडे सोपवून पडून राहिला, तर या अनंगाबाईनें कुलुंगवाराशी दोस्ती मांडलीन्, अन् तीही इतकी कीं त्या गोष्टीची गांवभर चर्चा होऊन खुद्द शेठच्या कानावर गोष्ट गेली. मला वाटतं या प्रकरणाची एकदां काय ती शहानिशा करण्यासाठी शेठनें काल रात्रीं कुलुंगवाराला जेवायला बोलावलं होतं. अनंगा जेवतांना हजर होतीच. शेठला कुलुंगवारशीं जें बोलायच होतं तें बोलायची संधि कांहीं जेवणाच्या वेळी त्याला मिळाली नसावी.

कारण रात्रीं अकरा साडेअकराला मी व्हीलवर डोकं टेकून नेहमीं प्रमाणे बंगल्यासमोर गाडी उभी करून झोपी गेलों होतों, शेठ आणि कुलुगवार बोलतबोलत गाडीजवळ आले.

'धोंडू, ए धोंडू' शेठनें मला हांक मारली, पहिल्या हांकेला ओ द्यायची नाहीं असा आपला नियम आहे. मीं ओ दिली नाहीं तेव्हा शेठ पुटपुटला "झोंपला वाटतं."

"निजू द्या" कुलुंगवार म्हणाला,"आपण इथेच उभे राहून बोलू." आणि ते दोघे माझ्या गाडीजवळ उभे राहून हलक्या आवाजांत बोलू लागले. मला शब्दन् शब्द ऐकू येत होता. पण त्यांना वाटत होतें मला गाढ झोंप लागली आहे.

"ही एवढीच मला उरली आहे, ती तरी तूं घेऊन जाऊं नयेस" महीश म्हणाला. तो माझ्या गाडीबद्दल बोलत असावा. मला वाटलं कुलुंगवाराचा पगार थकल्यामुळे तो ही गाडी घेऊन जायला मागत होता.

"मीं घेऊन जाण्याचा प्रश्नच निघत नाहीं. ती माझ्याकडे येणार हें आपोआपच ठरल्यासारखं झालं आहे." कुलुंगवार म्हणाला.

"पण तिच्या जोरावर मी धंद्यांत उडी घेतली. तिच्या आधारावर मिरवलों, एवढ्या उलाढाली केल्या, इतकं नांव मिळवलं– तू देखील तिच्या निमित्तानेंच माझ्याकडे आलास."

कुलुंगवारानें ही ट्रिक शेटजवळ केली असली तर आश्चर्य नव्हतें. 'ही मोटर विकणार नी नवी घेणार असें ऐकतों' म्हणून त्यानें प्रथम महीशजवळ दोस्ती केली होती—आणि नंतर अनंगाबाईशीं. मोटर विकणारा एजंट होता हा कुलुंगवार डायरेक्टर होण्यापूर्वीं. महाचिकट असतात हे मोटर विकाऊ एजंट.

"पण तुम्हाला ती सांभाळता आली नाहीं. तिला झकपकीत ठेवण्याची ताकद तुमच्यामध्यें राहिली नाही. तुमची तिची भेटही दिवसांदिवसांत होत नाहीं. काय मग तुम्हाला तिचा आणि तिला तुमचा उपयोग ?"

गोष्ट खरी होती. शेट तब्येतीमुळे ( आणि बिलं चुकवण्यासाठीं पण ) कित्येक दिवस घराबाहेर पडला नव्हता. अनंगाबाई आणि कुलुंगवारच माझी गाडी पिक्चरच्या निमित्तानें वापरीत होते.

"माझी स्थिती आज नाहीं उद्यां सुधारेल. तुझ्या पिक्चरवर सारं अवलंबून आहे. पण ती असली तरच माझा धंदा चालू राहील." शेठ अर्जवानें म्हणाला.

"उलट ती माझीच आहे असें आता लोक समजूं लागले आहेत !" कुलुंगवार हांसून म्हणाला, "आणि मीही नाही म्हणत नाही."

"पण तुझ्या अशा करण्यानें माझ्या धंद्यावर परिणाम होईल, ती माझ्याकडून तुझ्याकडे आली, तर मी साफ बुडून जाईन." शेठ विवळला.

"त्याला माझा नाईलाज आहे. मलाही माझा धन्दा पाहिला पाहिजे. तिच्या मदतीनें मला दुप्पट जोरानें काम करायला मिळेल, तुम्ही तर सहा महिन्याचा पगारही देत नाही आणि 'तुम्हांला

पगाराची सूट देऊन बदली तिला घेऊन जातो ' म्हणतो तेंही कबूल करीत नाहीं."

" पगार तुझ्या दिरंगाईमुळें थकला, तिला घेऊन फिरण्यांत तू वेळ घालवलास. माझें नुकसान केलेंस—आणि तिचेंही केलेंस—आतां माझ्यावर उलटलास ! "

" हा एकटया माझ्या मर्जीचा प्रश्न नाहीं."

" म्हणजे ?"

"तिचीही मर्जी पाहिली पाहिजे. तिचा विचार घ्या, ती कोणाकडे जायला तयार आहे तें सांगू द्या—"

मी झोंपेचं सोंग विसरून ताडकन् उठून बसलों. मोटरची कसली मर्जी, तिचा विचार कसला घ्यायचा, असे प्रश्न माझ्या डोक्याला सतावूं लागलें. इतक्यांत मीं जागा झालों हें शेठनें पाहिलें आणि मागचें दार उघडून कुलुंगवाराला आंत बसवीत तो जरा मोठयानें म्हणाला.

" बरं तुम्ही आज जा. उद्यांला नक्की काय तें कळवीन. धोंडू यांना पोचवून दे".

मी गाडी सुरूं केली आणि रस्त्यावर आल्यानंतर सहज मागें वळून कुलुंगवारला विचारलें.

" काय साहेब गाडी तुमच्याकडे येणार काय ? "

" गाडी ? " म्हणून कुलुंगवार खूप मोठ्यानें हांसला.

आणि तेव्हांच माझ्या डोक्यांत जणूं पाण्याचा हबका बसला—आणि मी सर्द झालों !

तेव्हांपासून मी सर्द आहे साहेब. आज सकाळीं शेठनें लगबगीनें अनंगाबाईची उचलबांगडी करून हैद्राबादेला आपल्या मावशीकडे पाठवून दिलं—आणि माझी खात्री झाली कीं काल रात्रीं ते दोघेजण बोलत होते ते मोटरीबद्दल नसून बाईबद्दल बोलत होते !

इतकें बोलून धोंडूनें अर्थपूर्ण नजरेनें माझ्याकडे पाहिलें. मी निमूटपणें पाकिटांतून दोन रुपये काढून त्याच्या हातावर ठेवले...

◆◆ ◆◆

: १७ :

## य या ति

कोण ? कोण रे तूं, पोक्त मनुष्या ?

महाराज, मी आपला मुलगा पुरु.

माझा मुलगा—आणि तुझ्याएवढा ? छे ! मी तरुण आहे अजून ! माझा मुलगा म्हणे ! माझीं मुलं लहानगीं असतात, गोजिरवाण्या पोराबाळांनी माझे हजार वाडे गजबजले असतील, पण तुझ्याएवढा मोठा मुलगा मला कसा असेल ? गृहस्था, तूं मला बाप शोभशील !

बाबा, बापच काय मी आजादेखील शोभतों आहे—चुलत आजा; माझ्या बाकीच्या भावांना नातवंडं झालीं, आपलीं पतवंडं—

बस्स ! पुरें कर. तूं म्हणवीत असशील माझा मुलगा, पण माझीं पतवंडं काढायचं काय काम तुला ? कशाला आला आहेस इथें ?

तात, मला माझं तारुण्य हवं आहे.

मग इथे कशाला आलास ? मी काय जडीबुटी देणारा कोणी वैद्य वाटलों तुला ?

माझं तारुण्य आपल्याकडे आहे.

काय बोलतो आहेस याचा अर्थच कळत नाहीं ! तुझं तारुण्य माझ्याकडे आहे म्हणे ! अरे वा रे वा ! उद्या म्हणशील, तुझी अक्कल माझ्याकडे आहे. बेवकूफ ! चल जा, माझ्याकडे कशाला

तुझं तारुण्य ?

बाबा, नीट आठवा—

ए थेरड्या, खबरदार मला बाबा म्हणशील तर— मला म्हातारा ठरवतोस! तूंच म्हातारा— या सहस्त्र स्त्रियांच्या अंतःपुरांत मला बाप म्हणायला आलास होय, रे कपी? घालवा रे याला धक्के मारून—

( महाराज, हे युवराज— )

जीभ तोडून टाकीन! माझा युवराज नेहमी एक वर्षाच्या आंतला असतो, माहीत नाहीं? माझ्या यौवनाचा बहार पाहवत नाही या बुद्रुक पुरूला— म्हणून आला आहे माझ्या सुखांत मीठ घालायला! माझ्याशीं मुलाचं नातं जोडून मला जरूख म्हातारा बनवायचा घाट घालतो आहे! हाकलून द्या याला—

संभाळा! युवराज पुरूला आपल्या बापासमोर बोलतांना कोण प्रतिकार करील त्याची धडगत राहणार नाही. महाराज—

चूप! चालता हो इथून!

तात—

चल हट्! राणीवशाच्या बाहेर काढा म्हणतों ना याला! वेत्रवती—

बाबा—

आतां थोबाड रंगवीन बर का! चल जा निघ!

ययातिराजा, शुद्धीवर ये!

कोण, कोण म्हणतो आहे मला हे?

हा तुझा पुत्र पुरु, ज्याचं यौवन तूं उसनं घेतलं आहेस आणि जें यौवन पुत्राला परत करण्याची आता वेळ आली आहे—

काय खूळबीळ आहे की काय? काय ग, ए भोगावती, काय म्हणतो आहे हा वेडपट? कां? बोलत कां नाहींस? ए कामिनी, हा मनुष्य एवढा गरम होऊन काय बडबडतो आहे वायु झाल्या-सारखा? अं? कोणी बोलत कां नाही?

कारण, राजन्, हा मीं आपला मुलगा बोलतों आहे आणि आपल्याला आठवण देतों आहे कीं, एक हजार वर्षांपूर्वीं—

आतां तूं पुराण सांगायला लागलास का ?

एक हजार वर्षापूर्वी आपण देवयानीमातेची फसवणूक केलीत–

हां–हां, ती देवयानी–माझी पहिली राणी नाहीं का ?

कुठें असतें ती आताशा ?

( महाराज, महाराज्ञी देवयानी गेलीं सहाशें वर्ष व्रतस्थ राहून जपजाप्य करीत आहेत. )

शर्मिष्ठामातेशीं आपण गुप्तपणें गांधर्व विवाह केला होतात–

खरंच, शर्मिष्ठाहि दिसली नाही नंतर कधी. काय ग ए, कोण आहे–आमच्या दुसऱ्या व तेव्हाच्या आवडत्या महाराणी शर्मिष्ठा यांची माहिती आहे कुणाला ?

( स्वामी, त्याहि चारशें वर्षांपूर्वी निवृत्त होऊन आतां वैराग्यांत दिवस कंठीत आहेत. )

राजा, ही तुझ्या दोन राण्यांची हकीकत– दुसरीसाठीं तू पहिलीशी प्रतारणा केलीस. तेव्हा देवयानीमातेनें पित्याकडे, शुक्राचार्यांकडे, अन्यायाची दाद मागितली आणि त्यांनी क्रोधाविष्ट होऊन तुला वार्धक्य येईल असा शाप दिला.

साफ खोटी गोष्ट ! कांहींतरी रचून सांगत आहेस झालं ! हे पुरु नांवाच्या पुरुषा, संभाळून राहा. कांहीं खोटीं कुलंगडीं मला चिकटवूं नकोस–अरे महामूर्खा, तू म्हणतोस तसा शाप मला शुक्राचार्यांनी दिला असला तर मला वार्धक्य कुठें आलं आहे ? मी तर तरुण आहे–जवान ! आहे की नाहीं, गे स्त्रियांनो ? हसतां काय अशा गुदगुल्या झाल्यासारख्या ? वा पुरु, बघ, माझ्या अंतःपुरांतल्या या सहस्र स्त्रियांच्या जिव्हा शेषासारख्या एकरवाने ग्वाही देतील की, हा ययाति युवा आहे !

उसन्या यौवनावर. कारण वार्धक्याच्या शापानं घाबरून आणि देवयानी–शर्मिष्ठामातांचं निमित्त पुढें करून, बाबा, तुम्ही शुक्राचार्यांपुढें लाचार काकुळतीनं उःशापाची भीक मागितली होतीत.

खबरदार, तोंड संभाळून बोल !

तूं ययातिराजा, तू क्षत्रिय असून सुखोपभोगाच्या लालसेनं ब्राह्मणापुढें जवानीची याचना केलीस.

हं, फार वळवळते आहे जीभ ! पुरु, सांगून ठेवतों आहे—

स्मृतिभ्रष्ट राजा, तूं कोण आहेस हें तरी ध्यानांत धर. दाक्षायणिपुत्र वैवस्वत मनूच्या कुळांतला, इलापुत्र पुरुरव्याच्या वंशाचा, इन्द्रपद पावणाऱ्या प्रतापी नहुषाचा पुत्र, तूं ययाति—

बरं मग ?

तू सासऱ्यापुढे भिक्षा मागितलीस–की, नको, इतक्यांत म्हातारपण नको ! मला अजून विषयांचा उपभोग घ्यायचा आहे–

अलबत ! तारुण्य अमर असो ! मीं तशी व्यवस्थाच केली आहे मुळीं, अंतःपुरांतल्या या माझ्या प्रियसख्या नेहमीं षोडश-वर्षीच्याच असतात–तें वय उलटलं की इथं जागा नाहीं कुणाला. चिरयौवनाच्या या स्वर्गांत मी सदा तरणाबांड राहतों.

बाबा, हेंच तारुण्य शुक्राचार्यांच्या उःशापानं उसनं मिळालेलं आहे. त्यांनी तेव्हा सांगितलं कीं–

केलंस का पुन्हा तुझं गुऱ्हाळ सुरू ? त्या शुक्राचार्यांचं नांव काढू नको ! कुठली त्रेतायुगांतली गोष्ट !

मातामहांनी उःशाप दिला कीं, पुत्रांपैकीं कोणी आपलं तारुण्य तुला दिलं तर तितका काळपर्यंत तुझं वार्धक्य पुढं जाईल.

काय एकेक कविकल्पना काढशील तेवढचा थोडचा आहेत !

माता देवयानीचे पुत्र यदु आणि तुर्वसू यांनी तुम्हाला नकार दिला.

धडपडोत ते यदु आणि तुर्वसू

माझे सख्खे भाऊ शर्मिष्ठापुत्र द्रुह्यु व अनु यांनीहि आपलं तारुण्य तुम्हांला उसनं द्यायचं नाकारलं–

आणि त्यांना कोण दोष देईल ? आपलं तारुण्य आणि तें कुणाला उसनं द्यायच ? इतका मूर्ख सौदा करायला कोण निघेल?

मी निघालों ! माझ्या भावांना तुम्हीं शाप दिलेत आणि मला विचारलंत. पित्याला सुख देणं हें पुत्र म्हणून कर्तव्य मानून मी कबूल झालों, शुक्राचार्यांचं स्मरण करून मीं तुमची शापित जरा घेतली आणि हजार वर्षांसाठीं माझं यौवन आपल्याला दिलं–

फार उत्तम केलंस ! जरी तूं म्हणतोस तें खरं असलं–तें शक्य नाहींच, पण जरी खरं असलं– तरी चूक तुझी आहे. तूंच खुळचट-

पणा करून बसलास– अरे मूर्खा, एकदा मिळालेलं तारुण्य कुणी परत देईल ? बावळट कुठला ! चल जा कुठून आलास तिथें !

बाबा, पुन्हा विचार करा.

गप्प बैस नि पुन्हा मला बाबा म्हणूं नकोस.

असं काय ? बापाला बाप म्हणायला तयार आहे तरी तुम्ही म्हणू देत नाही– कशाला तुमचा मुलगा म्हणवून घ्यायचं आता ?

मुलगा म्हणवून घे एक वेळ, पण तारुण्य परतबिरत मागण्याची भाषा सोड.

तात, अजून तुमची हौस फिटली नाही ? हजार वर्षे तारुण्याचा अनुभव घेऊनहि कंटाळा आला नाहीं ?

कंटाळा ? या यौवनाचा कंटाळा ? पानभोजनादि सुखांनी समृद्ध, मस्तीने धुंद, विलासांनी भरगच्च अशा या जवानीचा वीट ? आनंद, शक्ति, बुद्धि, रूप अशा गुणांचा अखंड झरा हें माझं तारुण्य मला कधींतरी पुरेसं वाटेल ?

पण तें माझं आहे नि तें मला आता परत हवं. बाबा, बऱ्या बोलानं माझी ज्वानी माघारी देणार आहेस की मी आजोबांकडे जाऊं ? शुक्राचार्यांना–

थांब ! त्या खाष्ट म्हाताऱ्याचं नांव काढू नकोस ! पुरु, जरा समजुतीनं घे, असा एकेरीवर नको येऊं, कांही तडजोड काढ़.

मी दुसरंतिसरं कांही जाणत नाहीं; हजार वर्षं पुरी झालीं, माझं यौवन मला परत हवं. पुष्कळ भोगलंत तुम्हीं, बस करा आता—

नको– नको ! अशी घाई करूं नको, मला अजून पुष्कळ भोग भोगायचे आहेत, अजून माझं समाधान झालं नाहीं, अजून कितीतरी विलासशृंगार राहिले आहेत माझे. पुरु, मी तुला तुझ्या बाकीच्या चौघा भांवाचीं राज्यं देतों, पृथ्वीचा स्वामी म्हणून मुखत्यारी देतों, पण मला उपभोगाच्या भरल्या ताटावरून असा उठवूं नकोस ! आणखी निदान हजार वर्ष मला यौवनचे भोग भोगूं दे. विषयांची गोडी अजून अवीट आहे, वासनांच्या ज्वाळा अजून जिभल्या चाटीत चटके देत आहेत.

बाबा, या ज्वाळा उपभोगानं कधींच शान्त होणार नाहींत.

तुपाच्या धारा ओतीत राहाल तसतशी ही आग जास्तच भडकत जाणार, ती विझण्याची आशाच नको.

नसू दे. हा माझा यज्ञ आहे, हा मला चालू ठेवूं दे.

वासनाग्नीला भोगाची आहुति देणारा हा यज्ञ कधीच संपणार नाहीं.

अहाहा ! तसेंच होवो पुरु ! तुझ्या तोंडात साखर पडो !

हरहर ! बाबा, ज्यांच्या सबबीवर तुम्हीं म्हतारपणाची तहकुबी मागून घेतलीत त्या माझ्या वयोवृद्ध आणि वैराग्यशील मातांची तरी लाज ठेवा आणि वयाला शोभेलसे वागा.

नाहीं ! मी तारुण्य परत देणार नाही ! जा, माझ्या स्वाधीन असलेलं यौवन मी सोडणार नाहीं. देत नाहीं ज्वनी माघारी जा काय हवं तें कर !

ठीक आहे.–

स्मरामि पूज्यगुरुं मातामहतीर्थस्वरूपं शुक्राचार्यम्।

अरे, अरे, पण हो, पुरु, दम धर–

तें कांहीं नाहीं, त्याशिवाय तुम्हीं ऐकणार नाहीं. आजोबा, अहो आजोबा, कुठें असाल तिथें ऐका ! अन्याय ! हा पहा माझा पिता नाहुष ययातिराजा हजार वर्षांपूर्वी घेतलेलं माझं यौवन परत देत नाहीं. न्याय करा, आचार्य !

ययाते !

अरे बापरे !

ययाते, लक्ष देऊन ऐक–

आज्ञा, महाराज.

तुझी स्मृति अजून पक्की आहे ?

होय, श्वशुरमहाराज, मी तरुण नाहीं का ?

तुझा शब्द अजून पक्का आहे ?

आचार्य, मी क्षत्रिय आहे.

मग हजार वर्षांपूर्वीचं पुत्राला दिलेलं वचन खरं कर.

पण, महाराज–

आटप लौकर. आशाळभूतपणें उसन्या यौवनांत घोटाळूं नकोस. तुझी वेळ भरली.

नका, नका–

सद्भावनेनं पुत्राचं तारुण्य त्याला परत कर आणि तृतीयाश्रमाला सिद्ध हो.

अरे देवा ! या माझ्या सहस्र षोडशवर्षीया, हे उपभोग, हे विलास, हे उपचार–

लौकर, नाहींतर जागच्या जागीं म्हातारा होशील.

अग आई ग ! नका, आचार्य, माझी अशी प्रकट विटम्बना नको.

मग जा त्या पुष्पवाटिकेंत आणि पुरूचं यौवन विधिपूर्वक त्याला देऊन टाक– एकलंस कीं नाहीं ?

होय.

आणि त्याला राज्यावर बसवून तूं तपश्चर्येला निघून जा.

राज्यावर बसवतों, पण तपश्चर्येला गेलंच पाहिजे का, महाराज ? मीं इथेंच, अऽ– अंतःपुरांत राहिलों तर नाहीं कां चालायचं ?

अजून तुझी आशा सुटत नाहीं ! लालस प्राण्या, तुझ्या यौवनाची मुदत संपली. अंतःपुरांत काय कंचुकी म्हणून राहणार आहेस ? स्त्रियांनो, या राजापुढें दर्पण धरा म्हणजे तरी त्याची खात्री होईल कीं, त्याच्या तारुण्याचं युग संपलं.

नको–नको ! मला पाहवत नाहीं ! नको, मीं अरण्यांत जातों ! घे पुरु, घे बाबा, एकदाचं तुझं तारुण्य. जाऊं दे मला–

आचार्यमातामह, हजार वर्षं पारखं राहिलेलं माझं यौवन आता सुरूं झालं. यौवनतत्त्वाचे अधिकारी शुक्रमहाराज, नवख्या तरुणाला आशीर्वाद असावा– व आज्ञा व्हावी. मलाहि अंतःपुराची जुळवाजुळव सुरू केली पाहिजे.

तथास्तु! यौवन सदा सफल राहो ! (आता ताबडतोब अंतर्धान पावण्यांतच आपली शोभा राहणार आहे. हजार वर्षं तुंबून राहिलेली तारुण्याची उत्कण्ठा पुरी होण्याच्या वेळीं आम्हां आजोबांचं काय) काम इथें ?

✦✦ ✦✦ ✦✦